महाराष्ट्र देशांतील आबालवृद्ध स्त्रीपुरुषांच्या
सत्कालक्षेपाकरितां

# श्रीरामचरित्र.

[ केवळ सरळ गद्यात्मक कथन. ]

मूळ श्रीरामविजयावरून.

दत्तात्रय वासुदेव जोगळेकर
यांनीं लिहिलें

तें

सर्व प्रकारच्या हक्कांसह घेऊन

नारायण रामचंद्र सोहनी
यांनीं
आपल्या " जगदीश्वर " छापखान्यांत छापिलें.

आवृत्ति तिसरी.

सन १९०५ इसवी.



किंमत १। रुपया.

# श्रीरामचरित्र.

---

श्रीरामचरित्र जरी पुष्कळजणांनीं पुष्कळजणांस सांगितलें आहे, तरी [illegible] सर्वांत मूळ श्रीरामचरित्र वर्णन करणारा कवि वाल्मीकीनामक [illegible]षि होय. वाल्मीक, नामप्रतापानें भवबंधांतून मुक्त झाला.

हा वाल्मीक ऋषि पहिल्यानें ब्राह्मणपुत्र असतां किरातांच्या (को-[illegible]ांच्या) संगतीनें वाटपाड्यांचा धंदा करीत असे. अर्थात् तो ब्राह्मण्या-[illegible]नही भ्रष्टच झालेला होता. तो एका भयंकर अरण्यांतील पर्वताच्या [illegible]ंत आपलें राहण्याचें स्थल करून राहिला होता व तेथेंच त्यानें आ-[illegible] परिवारही मोठा वाढविला होता. तो आपल्या ठिकाणापासून आस-[illegible] बारा कोस पर्यंत वाट मारणारे चोर लोक पाळथीवर ठेवून प्रवासी यात्रेकरू यांजवर अकस्मात घाला घालीत असे. त्यानें किती जी-[illegible]ा नाश केला होता याची गणतीच नाहीं. असें करितांना जरी तो [illegible]क्याला पोंचला होता; तरी त्याचे दुष्टगुण यत्किंचित्‌ही कमी झाले [illegible]ते. त्याला त्याच्या प्रमाणेंच भयंकर कर्में करणारे पुत्रही झालेले होते.

एके दिवशीं वाला (वाल्मीक) आपल्या परिवारांत आनंदानें बसला [illegible] तों; त्याच्या पूर्वपुण्याईमुळें कित्येक ऋषींसह नारद त्याच्या हद्दींतून [illegible]ण करीत असल्याची वर्दी त्याच्या पाळेगारांनीं त्याला दिली. [illegible] चालले आहेत, असेंच जेव्हां त्यानें ऐकलें; तेव्हां शस्त्र न घेतां [illegible] भयंकर दंड (काठी) हातांत घेऊन तो त्यांजवर गेला आणि [illegible] क्षणांत त्यानें सर्व महर्षींस दटावून अडविलें आणि उभें केलें.

[illegible] मारे ज्योम्यांनीं, मा
[illegible] पाणी पाजवें त्यां. नाहींतर व्यर्थ माणाल
[illegible] नारदजी पुढें झाले आणि त्याला म्हणाले
[illegible] ब्राह्मण; आम्हांला अडवून तुला क
[illegible] ! आम्हांला मारून व्यर्थ पातकांचे भर टाकशील
[illegible] झाला आहे. आजपर्यंत तूं असंख्य पातकें
[illegible] यमधर्मांजवळ तुला जबाब द्यावा लागेल. असंख्य पाप
[illegible]लेली संपत्ति मात्र तुझा परिवार वांटून घेईल; परंतु तुझ्य
[illegible] कोणीही विभागी होणार नाहीं. तूं म्हणशील कीं, माझे पु
हेत, कन्या आहेत; आप्त आहेत पण यमधर्मराजा ज्या वेळेस अ
बद्दल शासन करूं लागेल, त्यावेळेस तुला कोणीही सोडविणार
प्राणी जीं जीं कर्मे करितो, तीं तीं सर्व देवता अवलोकन करितात
परलोकीं चित्रगुप्त जेव्हां वही काढितो तेव्हां साक्ष देतात. यमध
पातक्यांस अनेक प्रकारें दंड करितो. ताम्राच्या तप्तभूमीवर लो
असिपत्र वनांतून हिंडविणें, शस्त्रांनीं प्रत्येक अंग टोंचणें, तप्त
भाजवळ बांधणें, इत्यादि अनेक प्रकार आहेत. त्या नरकयातना
व्र वर्णन कराव्या ? तर आतां असें कर. तूं वाटसरांस मारून पा
[illegible] जो परिवार रक्षण करितोस, तो तुझ्या [illegible] वि
आहे; किंवा स्त्री, पुत्र, आप्त, मित्र इत्यादिकांतून कोणी तुझ्या
[illegible] विभागी आहे, याचा आधीं शोध करून ये नंतर पाहिजे त
आम्हांला मार. ”

[illegible] यमधर भाषण ऐकतांच त्या [illegible]
[illegible] उत्पन्न झाला; तरी त्यांस तसेंच उभें करून तो [illegible]

[illegible] पीतुनसीमध्यांत विचार लागला की, " मायबापकरून आ- [illegible] पातकें घडली आहेत, त्याला कोणी वाटेकरी व्हाल " असें ऐकतांच सर्वांनी कानावर हात ठेवून सांगितलें की, [illegible]ी तुझ्या पातकांस विभागी नाहीं. तूं आपलीं पापें एकटाच भोग. [illegible] सर्व तुझ्या भाग्याचे भागीदार आहोंत " असें ऐकतांच वाल्या [illegible]त झाला; त्याच्या मनाला फार खिन्नता आली आणि कांहीं सुचेनासें त्यामुळें तो तसाच नारदऋषींकडे परत आला. मार्गानें चालत असतां [illegible]च्या मनाला असें वाटलें कीं, पूर्वपुण्याईनें मला उत्तम नरदेह मिळाला [illegible]तां मी आत्महित मुळींच केलें नाहीं. असो तो नारदाजवळ येऊन, [illegible]ष्टांग नमस्कार घालून व नेत्रांत अश्रु आणून ह्मणाला—"महाराज ! [illegible] तुह्मांला तनुमनधनेंकरून शरण आहें, आपण आपल्या कृपेची [illegible]का करून मला या भवसागरांतून तारा. आजपर्यंत वासनेच्या जा- [illegible]ळांत सांपडून अहंबुद्धीनें अनेक पातकें केलीं, तीं सर्व भूत पातकें [illegible]मच्याप्रमाणें मला झोंबत आहेत, आपण पंचाक्षरी व्हा आणि त्यांपासून [illegible] सोडवा " असें बोलून अष्टभावानें सद्गदित झालेला पाहतांच दयाळू [illegible]सून नारदास त्याची दया आली आणि जरी तो अनधिकारी होता; [illegible] तारक राममंत्राचा त्यांनीं त्यास उपदेश केला. ऋषींच्या उपदे- [illegible]चा अगाध महिमा आहे. त्या वाल्यास उपदेश होतांच तो राममं- [illegible] जप करीत त्याच ठिकाणीं बसला. त्याला देहाचेंही भान राहिलें [illegible]. त्याच्या अंगावर वारूळ वाढलें आणि त्याच्या हातांतील शुष्क [illegible] हिरवा होऊन त्याला शाखा व पर्णें आलीं.

[illegible] कित्येक काळ लोटल्यावर नारदऋषि जेथें वाल्या रामनाम [illegible] करीत होता, त्याच मार्गानें आले व त्याच्या त्या [illegible]

वाल्या त्या सर्वांस ह्मणूं लागला— " अरे भद्रोग्यांनों, माझा आणि आपल्या मार्गानें चालते व्हा. नाहींतर व्यर्थ प्राणाला मु असें ऐकतांच नारदऋषि पुढें झाले आणि त्याला ह्मणाले – बाबा, आह्मीं अकिंचन ब्राह्मण; आह्मांला अडवून तुला का होणार आहे ? आह्मांला मारून व्यर्थ पातकांत भर टाकशील. तुझा वृद्धापकाळ झाला आहे. आजपर्यंत तूं असंख्य पातकें त्यांचा यमधर्माजवळ तुला जबाब द्यावा लागेल. असंख्य पापा मिळविलेली संपत्ति मात्र तुझा परिवार वांटून घेईल; परंतु तुझ्य कांस कोणीही विभागी होणार नाहीं. तूं ह्मणशील कीं, माझे पु हेत, कन्या आहेत; आप्त आहेत पण यमधर्मराजा ज्या वेळेस अ बद्दल शासन करूं लागेल, त्यावेळेस तुला कोणीही सोडविणार प्राणी जीं जीं कर्मे करितो, तीं तीं सर्व देवता अवलोकन करितात परलोकीं चित्रगुप्त जेव्हां वही काढितो तेव्हां साक्ष देतात. यमध पातक्यांस अनेक प्रकारें दंड करितो. ताम्राच्या तप्तभूमीवर लो असिपत्र वनांतून हिंडविणें, शस्त्रांनीं प्रत्येक अंग टोंचणें, तप्त ल भाजवळ बांधणें, इत्यादि अनेक प्रकार आहेत. त्या नरकयातना वर वर्णन कराव्या ? तर आतां असें कर. तूं वाटसरांस मारून पा श्रमानें जो परिवार रक्षण करितोस, तो तुझ्या वैभवाचाच वि आहे; किंवा स्त्री, पुत्र, आप्त, मित्र इत्यादिकांतून कोणी तुझ्या काचा विभागी आहे, याचा आधीं शोध करून ये नंतर पाहिजे त आह्मांला मार. "

नारदऋषींचें धर्मपर भाषण ऐकतांच त्या वाल्याच्या मनाला ताप उत्पन्न झाला; तरी त्यांस तसेंच उभें करून तो आपल्या

ला आणि स्त्रीपुत्रादिकांस विचारूं लागला कीं, " माझ्याकडून आ-
पर्यंत असंख्य पातकें घडलीं आहेत; त्यांला कोणी वांटेकरी व्हाल
य ?" असें ऐकतांच सर्वांनीं कानावर हात ठेवून सांगितलें कीं,
आह्मी तुझ्या पातकांस विभागी नाहीं. तूं आपलीं पापें एकटाच भोग.
आह्मीं सर्व तुझ्या भाग्याचे भागीदार आहोंत " असें ऐकतांच वाल्या
खेदित झाला; त्याच्या मनाला फार खिन्नता आली आणि कांहीं सुचेनासें
झाल्यामुळें तो तसाच नारदऋषींकडे परत आला. मार्गानें चालत असतां
त्याच्या मनाला असें वाटलें कीं, पूर्वपुण्याईनें मला उत्तम नरदेह मिळाला
असतां मी आत्महित मुळींच केलें नाहीं. असो तो नारदाजवळ येऊन,
साष्टांग नमस्कार घालून व नेत्रांत अश्रु आणून ह्मणाला-"महाराज !
मी तुह्मांला तनुमनधनेंकरून शरण आहें, आपण आपल्या कृपेची
भिक्षा करून मला या भवसागरांतून तारा. आजपर्यंत वासनेच्या जा-
ळांत सांपडून अहंबुद्धीनें अनेक पातकें केलीं, तीं सर्व भूत पातकें
प्रमाणें मला झोंबत आहेत, आपण पंचाक्षरी व्हा आणि त्यांपासून
मला सोडवा " असें बोलून अष्टभावानें सद्गदित झालेला पाहतांच दयाळू
ब्रह्मपुत्र नारदास त्याची दया आली आणि जरी तो अनधिकारी होता;
तरी तारक राममंत्राचा त्यांनीं त्यास उपदेश केला. ऋषींच्या उपदे-
शाचा अगाध महिमा आहे. त्या वाल्यास उपदेश होतांच तो राममं-
त्राचा जप करीत त्याच ठिकाणीं बसला. त्याला देहाचेंही भान राहिलें
नाहीं. त्याच्या अंगावर वारूळ वाढलें आणि त्याच्या हातांतील शुष्क
दंडाचा वृक्ष होऊन त्याला शाखा व पर्णें आलीं.

नंतर कित्येक काळ लोटल्यावर नारदऋषि जेथें वाल्या राममंत्र
जपत बसला होता, त्याच मार्गानें आले व त्याच्या त्या दंडाच्या

वृक्षाखालीं येऊन उभे राहिले, तों वारुळांतून मंजुळ " राम ! असा ध्वनी येत आहे. वाल्मीकानें जीं असंख्य पातकें केलीं हो नामप्रतापानें दग्ध झालीं. नारदमुनीच्या कानीं तो ध्वनी त्याला वाल्मीकाचें स्मरण झालें. त्यांनीं अंतर्ज्ञानेंकरून झाला आहे, असें जाणून युक्तीनें त्याच्या अंगावरील वारूळ आणि त्याला बाहेर काढून सावध केलें. तपःसूर्य नारदऋषीं तांच वाल्मीकानें साष्टांग नमस्कार घातला आणि हात जोडून राहिला. नंतर त्यांस विचारूं लागला–" महाराज ! आत आपला काल कसा क्रमावा ? हें सांगावें. " असें ऐकतांच नारद त्याला आज्ञा केली कीं, " तूं रामचरित्र वर्णन कर. आजपासू वर्षांनीं दशरथांदरीं विष्णूचा अवतार होणार आहे. त्याचें भ शतकोटी श्लोकांनीं वर्णन कर. तूं ज्याप्रमाणें जन्मकाल व ली न करशील. त्याप्रमाणें प्रभु आपलें अवतारवर्तन ठेवील. " अ तांच वाल्मीकानें शतकोटि रामचरित्र वर्णन केलें. तेव्हां त्रैलोक्यांत वाद पडला आणि तो न्याय शिवापाशीं गेला. ते करांनीं ती रामकथा तिन्हीं लोकांत सारखी वांटून देऊन " राम " हीं दोनच अक्षरें उरलीं तीं आपल्या कंठीं धारण आणि कालकूटविषप्राशनजन्यदाह जो मस्तकीं चंद्र व गंग चिताभस्मलेपन, नागभूषणें, गजचर्मप्रावरण इत्यादिकांनीं शां न्हता तो शांत केला. इतकी कथा प्रथमाध्यायांत आहे.

---

# अध्याय २ रा.

पूर्वी ब्रह्मदेवापासून तपःसूर्य पौलस्तीनामक ऋषि उत्पन्न झाला. ाला चारी वेद मुखोद्गत होते. त्या ऋषीला तृणबिंदुनामक ऋषी- कन्या देववर्णीनामक होती ती दिली होती. तिजपासून विश्रवा- मक विख्यात पुत्र झाला. त्या विश्रव्याला भारद्वाजाची कन्या ी होती, तिच्या पोटीं कुबेर जन्मला. हा विश्रव्याचा पुत्र, ह्म- ा याला वैश्रवण ह्मणत असत. त्यानें तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला न करून घेतलें. त्याला पांहतांच हा आपला पणतु आहे, असें ाजून ब्रह्मदेवानें त्याला हृदयाजवळ धरिलें आणि लंकापुरीचें रा- देऊन त्याची सागरोदरांत ( बेटांत ) स्थापना केली. ही लंका ी ब्रह्मदेवानेंच निर्माण केलेली असतां; दानवांनीं बलात्कारानें घे- ी, तेव्हां देवांनीं युद्ध करून सोडवून मग कुबेराला अर्पण केली. ार कांहीं कालानें पातालवासी निशाचर सुमाळी विप्रवेषानें पृथ्वी- भ्रमण करीत असतां त्यानें लंकानगरी पाहिली आणि आवेशांत ून बडबडूं लागला कीं, ही आमची राक्षसांची लंका, पण याठिका- आतां कोण राज्य करीत आहे बरें! पुढें शोध करितां त्याला सर्व मान कळलें. त्यानें कुबेराचें सुंदर रूप पाहून विचार केला कीं, च्या पित्याला आपली कन्या द्यावी आणि त्याजपासून तिला जे ा होतील, त्यांला राक्षसांनीं साह्य करून लंकानगरी हरण करावी. ा विचार करून तो दुरात्मा कपटी राक्षस आपली कैकसीनामक ्या बरोबर घेऊन विश्रव्याजवळ आला आणि ह्मणूं लागला—"मी कंचन दरिद्री ब्राह्मण आहें, तर हें कन्यारत्न आपण अंगिकारावें"

असें बोलून त्यानें विवाहविधीनें ती कन्या विश्रव्यास अर्पण केली. नंतर एके दिवशीं ती राक्षसकन्या सूर्यास्तसमयीं होम चाललेला असतां ऋषी जवळ भोग मागूं लागली, तेव्हां ऋषीला महत्संकट पडलें. संध्याकाळीं स्त्री गर्भिणी झाली तर महातामसी प्राणी निमार्ण होतो. बरें, स्त्री ऋतुमती असतां तिला इच्छितसमयीं भोगदान न दिलें तर बालहत्येचा दोष लागतो, असें जाणून ऋषि विवंचनेंत पडला आणि " होम देऊन तुझी इच्छा पूर्ण करतों, असें ह्मणूं लागला; पण ती दुराचारी त्याला होम देण्यासाठींही जाऊं देईना. तेव्हां संतापानें तिचा अंगसंग करून ऋषि ह्मणाला–" हे पापरूपे तामसी ! तूं ब्राह्मणाची कन्या नव्हेस, राक्षसी आहेस: तर तुझ्या पोटीं दुराचारी ब्रह्मराक्षस उत्पन्न होतील. असें ऐकतांच तिनें पतीचे चरण धरून एक तरी सुपुत्र असावा ह्मणून प्रार्थना केली. नंतर तिच्या पोटीं रावण, कुंभकर्ण आणि बिभीषण हे तीन पुत्र झाले. त्यांत पितृवरेंकरून बिभीषण मात्र भक्तराज साधु उत्पन्न झाला. ताटका व शूर्पणखा ह्या त्यांस बहिणी झाल्या. कुंभकर्णानें जन्मकाळीं टाहो फोडला, त्यामुळें भूगोल थरारला आणि सर्व जीवांस प्रलय होतो असें भासलें. असो. जसा पूर्वी दैत्यांत प्ऱ्हाद तसाच या वेळीं ह्या खळसंततींत बिभीषण जन्मला. नंतर तिघांनींही गोकर्ण क्षेत्रीं जाऊन अनुष्ठानें आरंभिलीं. रावणानें शिवाची उपासना केली. कुंभकर्णानें चतुराननास आराधिलें आणि बिभीषणानें विष्णूला स्तविलें. तपांतीं ब्रह्मदेवानें येऊन तिघांसही वरदानें दिलीं, तीं अशीं:– रावणाला माग ह्मणतांच त्यानें मागितलें कीं, मला जगांतील सर्व संपत्ति अनुकूल असाव्या, सर्व विद्या प्राप्त व्हाव्या, मी देवांस बंदिशाळेंत घालावें, त्या देवांनीं माझ्या आज्ञेंत वागावें आणि संततीसह मी

ल कला प्रवीण व्हावें. याप्रमाणें रावणानें वर मागितल्यावर कुं-
र्ण अपेक्षित मागण्यास तयार झाला, तेव्हां सर्व देवांस चिंता प-
ी. तो काय चराचर भक्षण करीन ह्मणणार, किंवा भूगोल गिळूं
ह्मणार, कीं ऋषिमंडळीला दाढेखालीं घालीन ह्मणणार, हें कांहींच
ळेना; ह्मणून सर्वांनीं सरस्वती [ वाग्देवता ] ची प्रार्थना करून ति-
ा त्याच्या जिव्हाग्रीं स्थापिलें आणि संपूर्ण लोक सुखी राखण्यासाठीं
या दुष्टाला भ्रांति घालायाला सांगितलें. त्याप्रमाणें ती जिव्हाग्रीं
सल्यावर त्या मदांधराक्षसास भ्रम पडला आणि ब्रह्मदेवानें माग
सें ह्मणतांच त्यानें "मला संपूर्ण निद्रा दे, मी अक्षय शयन करीन."
मागणें मागतांच ब्रह्मदेवानें "तथास्तु" ह्मटलें. ब्रह्मदेवाच्या मुखां-
 "तथास्तु" हीं अक्षरें निघतांच तो राक्षस मंदराचलाप्रमाणें आडवा
न घोरूं लागला, त्यामुळें सर्व दिशा घुमूं लागल्या. कित्येक भयंकर
श्वदें त्याच्या श्वासोच्छ्वासाबरोबर घ्राणेंद्रियांत प्रवेश करीत व भयानें
रडत बाहेर पडत. असा तो सुषुप्तींत मग्न झालेला जाणून त्याच्या
त्याला चिंता पडली व पुत्र फुकट गेला, असें वाटूं लागलें.
व्हां त्यानें ब्रह्मदेवाची आराधनाकरून मागून घेतलें कीं, षण्मासांतीं
ावध होऊन यानें सर्व सुखानुभव घ्यावा. असो. नंतर बिभीषणास
व्हां विधि वर देण्यास सिद्ध झाला, तेव्हां त्या सत्वशीलानें अनेक
कारेंकरून मला विष्णुभक्तीचा लाभ असो, हें मागणें मागितलें आणि
ह्मदेवानें मोठ्या आनंदानें तें कबूल करून सांगितलें कीं, तुला
ीरामचंद्र भेट देईल आणि शशिमित्र आहेत तोंपर्यंत तूं चिरंजीव
होवेंस, ह्मणून वर देईल. याप्रमाणें तिघांस वर देऊन ब्रह्मा आप-
या ठिकाणीं गेल्यानंतर रावण, कुंभकर्ण अपार राक्षससैन्य जमवूं

लागले. प्रहस्त व महोदर रावणाचे प्रधान झाले. त्याचप्रमाणें विद्युज्जिव्ह, जंबुमाळी, वज्रदंष्ट्र, विरूपाक्ष, खर, दूषण, त्रिशिरा, विद्युन्माळी, माल्यवान्, मत्त, महामत्त, शुक, सारण इत्यादि अनेक राक्षस रावणाभोंवतीं जमले आणि सर्व मिळून लंकेवर जाऊन युद्ध करूं लागले. पण वैश्रवण त्यांना आटोपेना; तेव्हां रावणानें बापाचें पत्र कुबेराला आणून लाविलें, त्यांत लंकापुरी रावणाला अर्पण करावी, अशी आज्ञा होती. तें पत्र पाहतांच मस्तकीं वंदून पित्राज्ञेप्रमाणें त्यानें आपली सर्व संपत्ति पुष्पकविमानांत भरली आणि तो ब्रह्मदेवाकडे निघून गेला. तेव्हां ब्रह्मदेवानें मेरूच्या पाठारावर अलकापुरी निर्माण करून तेथें कुबेराची स्थापना केली.

रावणाला लंकेचें राज्य मिळाल्यानंतर मयासुरानें आपली कन्या मंदोदरी त्याला दिली आणि एक अभेद शक्तिही अर्पण केली. दीर्घज्वाला नामक बळीची नात होती ती कुंभकर्णाला दिली आणि सरमानाक एक गंधर्वकन्या होती ती बिभीषणाची स्त्री झाली. रावणाच्या धाकानेंच पृथ्वीवरील सर्व राजे रावणास शरण गेले. रावणानें सर्व देश जिंकले आणि गौ ब्राह्मणांस दाढेखालीं घालून रगडण्याचा सपाटा चालविला. तेव्हां अलकावतीहून कुबेरानें रावणाला सांगून पाठविलें कीं, तूं महाज्ञाता, वेदांचीं खंडें करणारा ऋषिपुत्र आहेस, असें असतां गाई व ब्राह्मण यांचा छळ करितोस हें नीट नव्हे. असा निरोप ऐकतांच रावणाला फार राग आला व राक्षससैन्य सिद्ध करून त्यानें एकारात्रींत अलकापुरीवर छापा घालून कुबेराची सर्व संपत्ति व पुष्पकविमान हरण करून आणिलें. नंतर कुबेर इंद्राला शरण गेला, तेव्हां त्यानें त्याला आपला कोशपति क-

न जवळ ठेविलें. याप्रमाणें उत्तरोत्तर उत्कर्ष चालला असतां रावणा- प्रथमच मेघनादनामक पुत्र झाला. नंतर ऐशीं हजार स्त्रियांपासून क लक्ष पुत्र व सवा लक्ष पौत्र अशी विशाळ संतति रावणापासून त्पन्न झाली. त्याचें वैभव इतकें वाढलें कीं, अठरा अक्षौहिणी ।जंत्रें रात्रंदिवस त्याच्या दारापुढें गर्जत राहूं लागलीं. सर्व पृथ्वीचे पाळ हात जोडून अष्टौप्रहर दारांत उभे राहूं लागले. सूर्यास्त होतांच आठ हजार राक्षस कर्पूरदीपिका लावून त्याच्या समोर असूं लागले. याप्रमाणें ऐश्वर्य भोगीत असतां इंद्रापासून भय पावलेले पर्वत रावणाला शरण गेले आणि "इंद्र वज्रानें आमचे पक्ष छेदन करितो तर तूं आमचें रक्षण कर." असें ह्मणूं लागले. तेव्हां रावणानें त्यांस अभय देऊन त्यांस गज होण्याची आज्ञा दिली. त्याप्रमाणें ते मदोन्मत्त वारण होऊन रावणाच्या सेवेंत राहिल्यावर तो राक्षससैन्य बरोबर घेऊन इंद्रा- वर गेला आणि देवांबरोबर युद्ध करूं लागला. त्या युद्धांत मेघनादानें इंद्राला ऐरावतासह पाडलें व हजार वेळ जिंकून पाशांत बांधून घेऊन चालला; तेव्हां ब्रह्मदेवानें येऊन त्याला अपेक्षित वर दिला आणि इंद्राला सोडविलें; तेव्हांपासून मेघनादाला इंद्रजित् ह्मणूं लागले. नंतर रावणानें सर्व देव सेवक करून ठेविले. इंद्रानें नित्य माळा कराव्या, चंद्रानें छत्र धरावें, वरुणानें पाणक्याचें काम करावें, अग्नीनें वस्त्रें धुवावीं, सूर्यानें द्वारपाळाचें काम करावें, ब्रह्मदेवानें नित्य पुराण सांगावें; बृहस्पतीनें पांडित्य करावें आणि कुबेरानें वायूला बरो- बर घेऊन सडासंमार्जन करावें, अशीं सर्वत्रांस कामें नेमून दिलीं. नारद तुंबर नित्य गायन करूं लागले. इतकें झाल्यावर एके दिवशीं रावण पुष्पकविमानांत बसून कैलासीं गेला व शिवाच्या भेटीची

इच्छा करूं लागला. तेव्हां महाद्वार रक्षण करणाऱ्या नंदीनें त्याल सांगितलें—हे लंकेश्वरा ! पुढें जाऊं नको. शिवउमा एकांतीं आहेत असें ऐकतांच रावणाला राग आला व मी तुझें बैलाचें ऐकावें काय असें ह्मणून जाऊं लागला. त्यावेळीं नंदिकेश्वरानें त्याला शाप दिल कीं, तूं महामूढ व उन्मत्त आहेस; तर नर आणि वानर तुझा रणां संहार करतील. मूर्खा ! त्वां दहा रुद्र केले आहेस, पण अकरावा रु मारुती वानररूपानें प्रगट होऊन तुझें गर्वमोचन करील. याप्रमाणें शा देतांच रावण अत्यंत क्रोधाविष्ट होत्साता हा कैलासच उपटून लंके नेईन असें मनांत आणून त्यानें पर्वताखालीं हात घातला, तें जाणून शिवानीं किंचित् पायाचा भार त्या पर्वतावर टाकला; त्यामुळें रावणाच हात त्या पर्वताखालीं अडकला व त्याच ठिकाणीं तो हजार वर्षेपर्यंत आक्रंदत राहिला. नंतर शिवाचें स्तवन करून त्यानें आपला हात काढून घेतला आणि परत लंकेस गेला. पुढें कांहीं कालानंतर रेवाती रावर रावण शिवलिंग पुढें घेऊन ध्यान करीत बसला असतां रेवानदीचें पाणी उलट चढूं लागलें. याचें कारण सहस्रार्जुनानें हजार हात लावून नदीचें पाणी अडविलें होतें. रावण ध्यान करीत बसला होता तो गळ्यापर्यंत बुडाला, तेव्हां सावध झाला आणि सहस्रार्जुनाजवळ धांवत जाऊन "तूं कोणरे दुरात्मा रेवाजल कोंडणार ?" असें विचारूं लागला. तेव्हां सहस्रार्जुनानें त्याची मानगोटी धरिली आणि त्याला बळेंच नेऊन बंदिशाळेंत ठेविलें. ती बातमी कांहीं कालानंतर पुलस्त्य ऋषीला समजली, तेव्हां त्यानें सहस्रार्जुनाजवळ भिक्षा मागून रावणाला सोडविलें. नंतर एकेवेळीं रावण मुद्दाम बळीच्या नगरांत गेला आणि तेथें प्रत्यक्ष त्रिविक्रम बळीचा द्वारपाळ होऊन राहिला होता त्याला सांगूं लागला कीं,

ळीला बोलावून माझ्या भेटीसाठीं आण; नाहीतर हें नगर उचलून समुद्रांत पालथें घालीन. असें ऐकतांच वामनानें त्याला सांगितलें– बळीचा पराक्रम जाणत नाहींस, तर आंत जा आणि जें बोलायाचें असेल तें बोल. असें ऐकतांच रावण बळीच्या सभेंत गेला आणि आपलें थोरपण सांगून मी तुजबरोबर युद्ध करण्यासाठीं आलों आहें, असें म्हणूं लागला. तेव्हां बळीनें त्याला सांगितलें. माझ्या पणज्याचीं कुंडलें नृसिंहाच्या गदाघातानें तुटून पडलीं आहेत, तीं आधीं उचल आणि मग माझ्याबरोबर युद्धाला ये. असें ऐकतांच रावण त्यांतील एक कुंडल उचलूं लागला; पण तें वीस हात लाविले तरी उचलेना, त्यामुळें लज्जित झाला. इतक्यांत बळी आपल्या संध्यावळी नामक पत्नीबरोबर सोंगट्या खेळत होता, तों तिच्या हातांतील फांसा दूर उडाला, तेव्हां बळी रावणाला म्हणूं लागला–अरे ! तेवढा फांसातरी उचलून आण. डाव पुरा करून तुजबरोबर लढेन. रावण तो फांसा उचलूं लागला; पण तोही त्याला हालेना. तेव्हां दोघेही खदखदां हसूं लागलीं; त्यामुळें अपमान पावलेला रावण परत जाऊं लागला. इतक्यांत बळीच्या सेवकांनीं येऊन त्याचीं वस्त्रें व शस्त्रें हरण केलीं. त्याच्या तोंडाला तेलांत खललेलें काजळ लावलें आणि त्याचे वीस हात मागें बांधून त्याला दारोदार हिंडवूं लागले. कोणी त्याच्या अंगावर शेण व माती टाकूं लागले. कोणी दाढी उपटूं लागले आणि कोणीकोणी तर मौजेनें त्याजकडून उठाबशा करवूं लागले. अशा विटंबनेला कंटाळून रावण पळून जाण्याचा विचार करूं लागला; पण वामन द्वारपाल त्याला नगराबाहेर सोडीना. क्षुद्रद्वारें व मोठमोठाल्या मोऱ्या पाहून त्यांतून पळून जावें असें त्यानें मनांत आणावें व तशा ठिकाणींही डोकें घालतांच द्वारपाल वामनानें त्याला दंडकाष्ठानें

मारावें, याप्रमाणें सर्वतोपरी निरुपाय झाल्यावर रावण बळीच्या अश्वशाळेंत राहिला व घोड्यांचे चणे पडलेले वेंचून खाऊन आपला निर्वाह करूं लागला. एखादे वेळीं त्यानें दारोदार फिरून कोरान्न मागावें आणि मी खंडोबाचा कुत्रा आहें ह्मणून लोकांला सांगावें. बळीच्या दासांनीं त्याला कौतुकानें धरून कक्षेंत दाबावें आणि तो काकुळतीला येऊं लागला ह्मणजे त्याला सोडावें; याप्रमाणें कित्येक दिवसपर्यंत यातना भोगल्यावर ती बातमी विश्रव्याला कळली व तो बळीकडे धांवत येऊन पुत्राची भिक्षा मागूं लागला. तेव्हां बळीनें त्याला शपथपुरःसर सांगितलें कीं, येथें कोणालाही बंधन नाहीं, आपण त्याला शोधून न्यावें. असें ऐकतांच विश्रव्यानें त्याला शोधून वामनाचा स्तव करून रावणाला सोडवून नेलें. नंतर एके वेळीं रावण वाळीला जिंकण्यासाठीं पुष्पकांतून उतरला आणि वाळी समुद्रतीरीं ध्यानस्थ असतां त्याजपुढें जाऊन उभा राहिला; पण वाळीनें सावध होतांच त्याला धरिलें व कक्षेंत दाबून धरून चतुःसमुद्रांचें स्नान केलें. नंतर किष्किंधेस येऊन अंगदनामक आपल्या पुत्राच्या पाळण्यावर खेळण्याऐवजीं रावणास उफराटें बांधून ठेविलें. त्या ठिकाणीं क्षणोक्षणीं अंगद रावणाची दाढी वारंवार बाललीलेनें उपटीत असे. नंतर विश्रव्यानें वाळीजवळ येऊन पुत्रप्रेमास्तव पुनः भिक्षा मागितली, तेव्हां वाळीनें त्याच्या तोंडाला काळें लावून तंगडी धरून लंकेंत भिकावून दिलें.

याप्रमाणें वारंवार अपमान पावल्यामुळें खिन्नांतःकरणानें तो कांहीं दिवस स्वस्थ राहिला होता. नंतर एके दिवशीं रावण ब्रह्मदेवाला विचारूं लागला—आमचा मृत्यु कोणाच्या हातानें होणार ? हें सांगावें. असें ऐकतांच ब्रह्मदेव ह्मणाला—अ [illegible]

नामक पुत्र होईल; त्याच्या हातून तुला मरण आहे. असें ऐकतांच राव-
ानें प्रतिज्ञा केली कीं, मी दशरथालाच मारून टाकीन. इतक्यांत इकडे
ारथाचें कौसल्ये बरोबर लग्न मांडलें, तेव्हां नारदानें अजराजाला सांगि-
लें कीं, दशरथ कौसल्येचें फार चांगलें रक्षण कर. कारण सोहळ्यांत
वण अकस्मात् घाला घालील. असें ऐकतांच अजराजानें वधूवरांस जहा-
ांत घालून पुत्राचें लग्न समुद्रांत आरंभिलें. ही बातमी रावणाला कळली
त्याचा ऐनविवाहाचा समय गांठून रात्रीं त्या लग्नांत विघ्न आणिलें.
ासे आकाशचारी पक्षी येतात, तसे चोहोंकडून अकस्मात् राक्षस आले
ाणि पर्वत टाकून त्यांनीं लग्न बुडविलें. रावणानें तशा गडबडींत रूप-
ती कौसल्येस धरिलें आणि तिला पेटींत घालून एका मीनाच्या हवालीं
ेलें. नंतर ही वस्तु फार जतन कर व माझ्याशिवाय कोणालाही देऊं
को, असें सांगून रावण लंकेस आला.

इकडे मच्छानें रावणाजवळची पेटी घेऊन ती समुद्रांतील एका
टांत नेऊन ठेविली आणि तो आपल्या कार्यासाठीं निघून गेला. नंतर
ुडतां बुडतां हातीं फळी लागून दैवयोगानें वांचलेला दशरथ त्याच
टाला येऊन लागला आणि फिरूं लागला, तों अकस्मात् ती पेटी त्या-
्या दृष्टीस पडली व त्यानें ती सहज उघडली, तों आंत कौसल्या.
तला पाहतांच दशरथाचें मन वेधून गेलें. तों अकस्मात् त्रिकाळज्ञानी
ारदमुनि त्या ठिकाणीं येऊन उभे राहिले. त्यांनीं दोघांचें लग्न लाविलें
ाणि तुमचे पोटीं ईश्वर अवतार घेईल, भिऊं नका ! असा वर दिला
ाणि दोघांसही त्याच पेटींत बसवून गमन केलें.

इकडे लंकेंत रावणानें सभेंत ब्रह्मदेवाला सांगितलें कीं, कौसल्या

व दशरथ यांचें लग्न मी बुडविलें. तेव्हां त्यानी सांगितलें की, दशरथ कौशल्येचें लग्न झालें. रावण ह्मणाला– तसें कधीं होणार नाहीं. असें असतांही झालें असेल तर एकवेळा मी तुमचें इच्छित पूर्ण करीन. असें बोलून त्यानें मच्छाला सांगून पेटी आणविली आणि ब्रह्मदेवाला सांगितलें यांत काय आहे पहा. असें ऐकतांच ब्रह्मदेवानें पेटी उघडली तं आंत दशरथ व कौसल्या ! ! ! त्या उभयतांस पाहतांच रावणाला पहिल्यानें आश्चर्य वाटलें; पण क्षणैक विचार करून तो शस्त्र घेऊन उभयतांचा वध करण्यासाठीं उठला व पुढें आला. त्याची मुद्रा पाहतांच कौसल्या भयाभीत झाली. तेव्हां दशरथानें तिला धीर दिला. तो ह्मणाला– तूं भिऊं नको ! या मशकाचीं मी दाही शिरें तोडीन. तों ब्रह्मदेवानें रावणाचा हात धरून आधीं माझें इच्छित पूर्ण कर. असें सांगितलें आणि त्यानें "माग" असें ह्मणतांच या उभयतांचें जीवदान दे. असें सांगितलें. इतक्यांत मंदोदरी तेथें आली व तिनेंही रावणाला सांगितलें कीं, आपण आपलें वचन पूर्ण करावें, यांस माराल तर आतांच अनर्थ होईल. असें ऐकतांच रावणाची बुद्धि पालटली आणि त्यानें त्या दोघांस ब्रह्मदेवाच्या हवालीं केलें. ब्रह्मदेवानें त्या दोघांस अयोध्येस पोंचविलें, तेव्हां सर्वांस अत्यानंद झाला. नंतर इंद्रानें दशरथास राज्यावर बसविलें आणि दोघेही आपापल्या स्थानीं गेले.

एके दिवशीं रावण पुष्पक विमानांत बसून जात असतां एक सुंदर देवस्त्री त्याच्या दृष्टीस पडतांच, त्या मदांधानें खालीं उतरून तिचा हात धरिला आणि अविचार करण्याची इच्छा करूं लागला; परंतु जेव्हां ती आकांत करूं लागली, तेव्हां त्यानें तिला सोडिलें. ती ब्रह्मदेवाकडे गेली आणि गाऱ्हाणें सांगू लागली, तेव्हां सत्यलोकवासी ब्रह्मदेवानें त्याला

दिला कीं, आजपासून जर तूं परस्त्रीवर बलात्कार करशील तर
ञ शंभर तुकडे होतील.

रावणाला तो शाप कळला व त्यानें परस्त्रीवर बलात्कार करणें
ाडिलें, परंतु गोब्राम्हणाला त्रास देणें, यज्ञयागादिकांचा उच्छेद करणें
यादि पापें आरंभिलीं; तेव्हां धेनुरूपी पृथ्वी आणि सर्व ऋषि ब्रम्हदे-
ला शरण गेले आणि सर्व रावणाचें गाऱ्हाणें सांगूं लागले. कोणी
गतो—रावणानें आमचे यज्ञ मोडिले. कोणी सांगतो—कुंभकर्णानें आमचीं
ढूंबें भक्षण केलीं. याप्रमाणें कोणी ताटका, सुबाहु, मारीच इत्यादिकां-
च्यीं सांगूं लागले. तेव्हां सर्व देव ऋषि आणि पृथ्वीसह सर्व प्रजा घेऊ-
ब्रम्हदेव क्षीरसागरतीरीं आले आणि शेषशाई नारायणाचें स्तवन करूं
गले. तेव्हां क्षीरसागरांतून ध्वनि उठली कीं, देवहो! भिऊं नका!
ारथराजा व कौसल्या अदिति कश्यप आहेत, मी दशरथाकडे रामाव-
र घेतों. शेष लक्ष्मण होईल, शंख चक्र भरत शत्रुघ्न होतील, हे माझे
तार; कमला जनककन्या होऊन मला वरील. तुम्ही सर्व देव वानररूपें
ा. शंकर हनुमंत होईल, ब्रम्हदेवानें जांबुवंत ऋक्ष व्हावें; धन्वंतरी सु-
ा होवो, बृहस्पतीनें अंगद व्हावें. सूर्य सुग्रीव होईल. अग्नि व वायु नल
ल होतील आणि यमानें ऋषभ वानर व्हावें. याप्रमाणें आज्ञा होतांच
ांनीं जयजयकार केला व सर्व आपापल्या ठिकाणीं गेले.

---

साठीं फिरतच होता. शेवटीं थकून एका सरोवराचे तीरावरील वृक्षावर
धनुष्याला बाण लावून सावजाची चाहूल ऐकत टपत बसला.
राजा लक्ष्यपूर्वक चाहूल ऐकत आहे; तों त्या मार्गानें श्रावण आपल्या-
वृद्ध मातेस व जनकास कावडींत घालून फिरवीत असलेला त्या सरो-
वर सन्निध आला. श्रावणाचीं आईबापें फारच वृद्ध व अशक्त होतीं;
त्यांस दिवसा मार्गांतील उन्हाचा ताप सहन होत नसे; म्हणून तो त्यांस
रात्रीं कावडींत बसवून, खांद्यावर घेऊन तीर्थयात्रा करीत हिंडत असे.
सरोवराचे तीरासन्निध पोंचत आहे, तों त्या वृद्धांनीं त्याला
सांगितलें-श्रावणा! तृषा लागली! उदकपान करीव! असें ऐकतांच
त्यानें कावड खालीं ठेविली; हातांत कमंडलु घेतला आणि उदकासाठीं
त्या सरोवरांत प्रवेश केला. दैवयोग! दशरथराजा चाहूल ऐकत होता,
त्यानें पाणी हालतांच लक्ष्यपूर्वक निर्वाण बाण सोडला; तो सनक
येऊन सपक श्रावणाच्या हृदयांत भरला. बिचारा श्रावण! त्याच्या
हातांतील कमंडलु खालीं पडला व तो धाडकन पडून अस्ताव्यस्त लोळूं
लागला. त्याला प्राणांतिक वेदना भासूं लागल्या. अर्थात् त्या असह्य
बाणप्रहारामुळें तो दीनवाणी ओरडला. दयाळु राजा मनुष्याचा शब्द
कानावर पडतांच घाबरून वृक्षावरून खालीं उतरला आणि धावत त्या
च्याजवळ आला. तोंपर्यंत श्रावण धडपड करून शेवटीं शुद्धांत:करणा
म्हणत होता अहाहा! कोणा सभाग्य क्षत्रियाचा बाण नामस्मरण क
आला आणि त्यानें माझे प्राण निरविले. असें बोलून तो रामस्म
करीत आहे, तों राजा त्याच्या जवळ आला आणि त्यानें ती मरणा
स्थिति पाहून शोक करीत आधीं आपल्या दुर्दैवाला दोष देऊन आप
वर अकस्मात हत्या पडली म्हणून आपल्याला शापून घेऊं लागला. तेव्हां

णानें सांगितलें—राजा! आतां शोक करून कांहीं उपयोग नाहीं.
ी वृद्ध माता व जनक मार्गांत उदकपानासाठीं तळमळत आहेत,
ा आधीं उदक नेऊन दे. मग मी सुखानें प्राण सोडीन. त्यांच्या
ा आतां कोणी नाहीं म्हणून तो फार गांहवरला. तो पुनः म्हणाला—
ीं त्यांजपाशीं जा आणि न बोलतां उदक दे व मग हें सांग. असें
कतांच निरुपायास्तव त्यानें योग्य वचनांनीं शांतवन करून राजा उदक
न, त्या वृद्धांजवळ गेला. त्याचा पायरव ऐकतांच तीं म्हणतात—बा
श्रावणा! तूंरे एवढें कां रे केलें. राजा न बोलतां त्यांस उदक
लागला; पण तीं म्हणूं लागलीं—बाळा! कां रे बोलत नाहींस? ए
ा रात्रीं उदक मागितलें म्हणून रागावलास काय? पण असें कधीं
ार नाहीं. असें म्हणत तीं दोघे त्यानें बोलावें म्हणून गहिंवरून
नेक प्रकारें त्या पुत्राचे गुण गाऊं लागलीं आणि शेवटीं त्यांनीं सां
ल कीं, जर तूं न बोलशील तर आम्ही पाणी न पितां प्राणत्याग
याप्रमाणें निश्चयपूर्वक भाषण ऐकतांच राजानें सर्व वर्तमान
ा सांगितलें. तें ऐकतांच त्या दोघांनीं पुनः पुत्राचे गुण आठवून
फार शोक केला आणि प्राणांतीं राजास "तूंही पुत्रवियोगामुळें आ
पा प्रमाणेंच (पुत्र पुत्र) करून प्राण सोडशील" असा शाप देऊन
यांनीं प्राण सोडल्यावर राजानें त्या तिघांचें यथाविधी अंत्यकर्म केलें
णि विचार अंतीं यांच्या शापानें तरी मला पुत्र होईल, असें मनां
णून आनंद मानीत तो अयोध्येस आला व नगरांत येतांच त्यानें तें
मान गुरूला सांगितलें.

नंतर वृषपर्वा नामक दैत्यानें मेघ बंदींत टाकले, त्यामुळें बारा वर्षे
त अवर्षण पडलें आणि सर्व प्रजेसह गोब्राह्मणांस फार त्रास झाला.

मेघ बंदींत टाकण्याचें कारण, मेघवर्षाव झाला तर धान्यें होतील
ब्राह्मण यज्ञ करून देवांस बलवान करतील; तसें न व्हावें हें
त्याला शुक्रानें साह्य करून देवांवरोबर संग्राम आरंभिला. देवांचा
अपजय होऊं लागला. तेव्हां नारदानें इंद्राला सांगितलें कीं,
वर राजा दशरथ पराक्रमी आहे. तो आपल्या हस्तलाघवानें या
दैत्यांचा पराभव करील. असें ऐकतांच इंद्रानें रथासह मातली
सारथी दशरथास नेण्यास पाठविला. त्यानें येऊन राजाला असा
कारण सांगितलें आणि रथांत बसण्याविषयीं विनंती केली. त्या
राजाची आवडती स्त्री कैकयी जवळ बसली होती. ती म्हणाली-
नाथ! मी तुमचें युद्ध पाहीन. आजपर्यंत त्याच्या गोष्टी ऐकतें, पण
पाहण्याचा प्रसंग आला आहे; तर मला बरोबर न्यावें. राजा
...लें कोमल आहेस; भय वाटेल याप्रमाणें तो अनेक प्रकारें ...
...ला, तरी तिचा विशेष आग्रह पडला. तेव्हां तो तिजसहवर्तमान
बसून निघाला. मातलीनें रथ पक्ष्याप्रमाणें जो आकाशांतून
विला, तो युद्धांतच नेऊन उभा केला. इंद्रानें राजाला पाहतांच
...न देऊन युद्ध करण्याची आज्ञा केली. मग काय! पराक्रमी
च तो! त्यानें आपल्या हस्तलाघवानें पर्जन्याप्रमाणें बाणांचा व...
करून कोट्यावधि दैत्यांचीं शिरकमलें भूमिवर वाहिलीं. आपल्या
सैन्याचा पूर्ण पराभव पाहून शंबरी आला व कपटयुद्ध करूं लाग...
पण राजानें त्याचाही विरस करून पळविलें. शेवटीं दैत्यांचा गुरु
चार्य स्वतः युद्धास आला व अनेक प्रकारें युद्ध करूं लागला. राजा
च्या बरोबरीला टिकला होता. इतक्यांत त्यानें एक विशेष बाण

कृत्य कैकयीनें पाहिलें आणि पर्वतामारखा रथ आपला भुजदंड त्या ठिकाणीं घालून सांवरून धरिला. तों राजानेंही निर्वाण बाणेकून शुक्राच्या रथाचा चुगडा उडविला आणि दुसरा अर्धचंद्राबाण सोडून केवळ त्याचे प्राण मात्र रक्षण केले व कापल्य मुगुट करून त्याला भयभीत करून रणांतून पळविलें. तेव्हां सर्व देवांजयजयकार केला. दैत्य पळूं लागले व राजानें धनुष्याची प्रत्यंचा न पाहिलें तों कैकयीनें आपला रथ आपल्या बाहूवर सांवरून धरला आहे. तो प्रकार पाहतांच दशरथानें रथाखालीं उडी टाकली आणि प्रियस्त्रीला प्रेमालिंगन देऊन दोनवेळ इच्छित वर माग, म्हणून मालें. तेव्हां कैकयीनें स्मितवदनानें सांगितलें कीं, मला गरज लागेल तेव्हां मी आपल्याजवळ मागेन.

कैकयीला महायुद्धांत यश आलें याचें कारण ही कुमारी असतां हिमातेनें एके दिवशीं एका तापसाला आपल्या घरीं राहविलें आणि कैकयीला त्याची सेवा करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तिनें गंधपुष्पादि सर्व पुजोपचार सिद्ध करून दिले, तें पाहतांच ऋषि अनुष्ठानाला बसला. त्यानें पूजा केली आणि जेव्हां प्राणायाम करून ध्यानस्थ बसला तेव्हां कैकयीनें काजळ आणून त्याच्या तोंडावर माखविलें; पण ध्यान विसर्जन करून ऋषिनें तो प्रकार जाणतांच तिला शाप दिला कीं, तूं पुत्रद्वेषामुळें साऱ्या जगांत काळतोंडी ठरशील. हें वर्तमान जेव्हां या मातेला कळलें, तेव्हां तिनें त्या तापसाचे चरण धरून उःशाप मागितला. तेव्हां तो म्हणाला—ज्या हातानें पूजासाहित्य दिलें, तो हात तेवढा यशस्वी होईल व रणांत पतीला यशस्वी करील. हा प्रकार पुढें राजानें कैकयीला वरिलें.

असो. राजाला जयप्राप्ति झाल्यामुळें इंद्र आणि बृहस्पति यांनीं त्याचें अनेक प्रकारें यश वर्णन करून त्याला वस्त्रें व अलंकार दिले. कैकयीला दिव्यमणी दिला. तो परम प्रकाशवंत मणी तिनें आपल्या वेणींत घातला. नंतर बृहस्पतीनें राजाला संतति काय आहे, ह्मणून विचारितांच त्यानें सांगितलें कीं. मी अजून पुत्रमुख पाहिलेलें नाहीं. असें ऐकतांच देवगुरूनें त्यास आशीर्वाद दिला कीं, राजा! तुझ्या उदरीं ज्याचें ध्यान नीलकंठाला लागलें आहे, तो त्रिभुवनपति अवतार घेईल. तूं ऋष्यशृंगाला आणून पुत्रेष्टि कर. तो विभांडकाचा पुत्र हरिणीगर्भसंभूत आहे. त्याला आजपर्यंत मनुष्याचें दर्शन नाहीं; त्यानें स्त्रियांचें वदन आजपर्यंत पाहिलें नाहीं. तो शब्दविषयानें मोहित होईल. त्याच्या आश्रमासन्निध स्त्रियांनीं जाऊन गायन करावें आणि त्याला मोहित करून आणावें. असें ऐकतांच इंद्रानें रंभा, उर्वशी, तिलोत्तमा इत्यादि रूपसंपन्नस्त्रिया शृंगऋषीस मोहित करण्यासाठीं पाठविल्या व दशरथ इंद्राची व गुरूंची आज्ञा घेऊन अयोध्येस आला.

अरण्यांत श्वापदांचें भय ह्मणून विभांडकऋषीनें आपल्या पुत्रासाठीं एक उंच गोपुर बांधिलें होतें व त्यावर त्याला वेदाध्ययन करीत बसवीत असे. तो नित्य प्रातःकालीं पुत्राला पाठ देऊन अनुष्ठानासाठीं गंगातीरावर जात असे. एके दिवशीं विभांडक आश्रमांत नाहीं, अशा वेळीं देवांगना त्या अरण्यांत आल्या आणि नानाप्रकारचीं सुस्वर वाद्यें वाजवून नृत्य गायन करूं लागल्या; त्यांचें तें मोहक नृत्य, गायन, ऐकतांच शृंगीचें मन वेधलें व तो गोपुरावरूनच त्यांच्याकडे पाहूं लागला, तों त्या हावभाव दाखवूं लागल्या, ते त्याला गोड वाटत; पण हे मला धरतील, असें मनांत आणून तो क्षणभर लपत असे व पुनः स्वरांला

मोहित होऊन धैर्यानें येई व त्यांजकडे पाही. विभांडकाची येण्याची वेळ होतांच देवांगना ऋषीच्या शापभयानें निघून गेल्या. नंतर विभांडक आश्रमांत आल्यावर शृंगी त्याला सांगू लागला कीं, या ठिकाणीं कित्येक ऋषि आले होते; पण मला त्यांचें भय वाटलें, ह्मणून मी लपून बसलों होतों. असें ऐकतांच विभांडकानें त्याला सांगितलें कीं, आपल्या आश्रमांत जर कोणी अतिथि आले, तर त्यांचा पूजासत्कार करावा. असें सांगून दुसरे दिवशीं प्रातःकाळीं विभांडक स्नानानुष्ठानाला गेल्यावर शृंगी त्या केव्हां येतील ह्मणून चिंता करीत आहे, तों लागल्याच सुरांगना पूर्वदिवसाप्रमाणें तेथें येऊन नृत्य गायन करूं लागल्या व शृंगीला पाहतांच त्याला खुणावून कामचेष्टा करूं लागल्या. तेव्हां आधींच स्त्रीचिंतनानें वेडा झालेला ऋषिपुत्र त्यांचेजवळ येऊन बसला व त्यांनीं नानाप्रकारचीं मिष्ट फळें दिलीं तींहीं त्यानें आनंदानें घेतलीं. नंतर तो त्यांस अज्ञपणानें विचारूं लागला. तुमचीं नांवें काय? तुमच्या वक्षस्थलावर हीं गलंडें काय ह्मणून? असें ऐकतांच त्यानीं सांगितलें—आमचें नांव गलंडऋषि. जसें तुमच्या मस्तकावर शृंग, तशींच हीं आमचीं गलंडें; हीं फार सुख देणारीं आहेत. इत्यादी अनेक प्रकारें बोलून त्या देवांगनांनीं शृंगऋषीला भुलविलें आणि आपल्या बरोबर अयोध्येस आणलें. राजा दशरथानें त्यास पाहतांच नमस्कार करून आपली शांतानामक बाळगलेली कन्या त्याला विवाहविधीनें अर्पण केली. नंतर वसिष्ठांनीं महाज्ञाते अनेक ऋषि बोलावून आणले व पुत्रेष्टीला आरंभ केला. इकडे अरण्यांत विभांडकानें आपला पुत्र नाहीं असें पाहतांच अंतर्ज्ञानानें जाणलें कीं, पुत्रास स्त्रियांनीं चाळवून नेलें. तो ऋषि मनांत फारच कोपला आणि तसाच

अयोध्येस आला; पण सर्व महर्षीत त्याचा बहुमान झालेला पाहून त्याचा कोप कांहींसा शांत झाला होता. शिवाय सुनेला पाहिल्यामुळें थंडच झाला; इतक्यांत दशरथानें येऊन त्याच्या चरणांवर मस्तक ठेवलें. तेव्हां त्यानें आशीर्वाद दिला कीं, तुला चौघे पुत्र होतील. यज्ञ चालल्याच होता. पूर्णाहुतीं झाल्यावर प्रत्यक्ष अग्निनारायण हातांत पायसपात्र घेऊन कुंडांतून बाहेर आला. ज्याला चार शृंगें, दोन शिरें, तीन चरण व सात हात, त्या वरद अग्निनारायणाला पाहून सर्व ऋषिमंडळीस अत्यानंद झाला. अग्नीनें पायसपात्र शृंगऋषीच्या हातांत दिलें आणि समविभाग तिन्हीं राण्यांस हें द्यावें; असें सांगून तो गुप्त झाला. शृंग-ऋषीनें तें पायसपात्र वसिष्ठास दिलें आणि तिन्हीं राण्यांस सम विभाग द्या, असें सांगितलें. वसिष्ठानीं त्याचे तीन भाग करून प्रथम कौस-ल्येस देतांच कनिष्ठ पण आवडती जी कैकयी तिला राग आला. ती मत्सर भावानें अनेक प्रकारें बोलूं लागली. तरी वसिष्ठांनीं तीघींच्या पुढें तीन भाग ठेवून आज्ञा केली कीं, लौकर भक्षण करा; नाहीं तर विघ्न येईल. इतक्यांत कैकयीच्या पुढचा पायसपिंड घारीनें झडपून नेला. तेव्हां मात्र हाहाःकार झाला आणि कैकयी शोकानें भूमीवर पडून आ-पल्या दुर्दैवाला दोष देऊं लागली. तिची ती स्थिति पाहून दशरथ चिंताक्रांत होत्साता कौसल्येच्या मुखाकडे पाहूं लागला, तेव्हां निर्मत्सर कौसल्या व सुमित्रा या दोघींनींही आपापल्या विभागांतून अर्धाअर्धा भाग कैकयीला देऊन तिची समजूत केली; नंतर वसिष्ठांनीं यज्ञावशिष्ट तीर्थ देऊन तिघींस पायस भक्षणाची आज्ञा केली. तों पुनः तें पायस कैकयीच्या घशाजवळ अडकलें व ती कासावीस झाली. तेव्हां वसि-ष्ठांनीं तिजवर तीर्थ शिंपलें व तो पिंड तिच्या पोटांत उतरविला. दश-

थ राजाला अत्यानंद झाला. त्यानें सर्व ऋषींची योग्य संभावना ली व त्यांस निरोप दिला. पुढें कांहीं दिवसांनीं राजाच्या तीन्हीं राण्या गर्भवती झाल्या. तेव्हां मात्र दशरथाला वाटूं लागलें कीं, तां आपलें भाग्य पूर्ण उदयास येणार.

घारीनें जो पिंड झडपून नेला त्याचा वृत्तांतः—केसरी नामक वान-ची स्त्री अंजनी सात हजार वर्षें शिवाची आराधना करीत होती. ांतीं शिव तिला प्रसन्न झाले आणि "वर माग" ह्मणाले—तेव्हां तिनें ागितलें कीं, ईश्वरा! मला परमप्रतापी एक अक्षय पुत्र दे. तो महा-क्त व वज्रदेही असावा. असें ऐकतांच शिवानीं सांगितलें—तुझ्या उदरीं करावा महारुद्र अवतार घेईल. तूं नेत्र मिटून अंजुलीपात्र पसरून वध बैस ह्मणजे वायु तुझ्या हातांत प्रसाद आणून टाकील, तो तूं क्षण कर. असें सांगून शिव गुप्त झाले व ती अंजुलीपात्र पसरून बसली हे तों घारीनें कैकयीच्या पुढचा झडपलेला पिंड सोंसाट्याच्या वाऱ्यानें च्या तोंडांतून सुटला व तो अंजनीच्या हातांत पडला. तिनें शिव-मरण करून तो भक्षण केला व आनंद पावली.

कैकयीच्या पुढचा पिंड झडपणारी घार पूर्वीं देवांगना होती. ती त्य करितांना चांचरली ह्मणून ब्रह्मदेवांनीं तिला शाप दिला होता. चा अंजनीच्या हातांत पायसपिंड जाऊन पडतांच उद्धार झाला.

अंजनी शिवप्रसादानें गरोदर होती; ती मास पूर्ण भरतांच प्रसूत ाली. तिला विद्युत्प्राय कुंडलें व अक्षय कौपीन धारण केलेला तेजस्वी ह्मचारी पुत्र झाला. ज्याच्या कटीला मौंजी, गळ्यांत यज्ञोपवीत, याचें मुख व पुच्छाग्र आरक्त असा बालार्काप्रमाणें वानर पाहून ऋषि-त्या आनंदित झाल्या. त्यांनीं त्याचें नांव मारुती ठेविलें, तों तें बा-

लक क्षुधाक्रांत होऊन चोहोंकडे पाहूं लागलें, तेव्हां अंजनी त्याला पाळण्यांत ठेवून फळें आणावयासाठीं गेली. इतक्यांत त्यानें सूर्यमंडळ पाहिलें व हें उत्तम फळ आहे असें मनांत आणून तें घेण्यासाठीं उड्डाण केलें. त्या बालकाचा सिंहनाद ऐकतांच दिग्गजांचे कानटाळे बसले आणि पृथ्वी कंप पावली. त्याच्या पुच्छाच्या फडत्कारानें पर्वत थरारले, कित्येक वृक्ष अंगवातानें उडून जाऊं लागले. असो. तो चपल अंजनीतनय उड्डाणावर उड्डाणें साधीत क्षणार्ध झालें नाहीं तों सूर्यमंडळापर्यंत पोंचला. आपला पुत्र सूर्यतेजानें आहाळेल, असें मनांत आणून वायु त्याला धरण्यासाठीं धांवत होता; पण त्यालाही तो आटपला नाहीं. तेव्हां तो त्याजवर हिमालयावरील सीतल कणांचा वर्षाव करूं लागला. इतक्यांत मारुती मुख पसरून सूर्याला भक्षण करण्यासाठीं धांवला. तेव्हां सूर्यबिंब भक्षणार्थ टपत बसणारा राहु "माझा भाग हा कोण घेणार?" ह्मणून त्याला आडवा आला; त्याला पहातांच मारुतीनें एका पुच्छघायानें त्याचें तोंड फोडलें आणि पाय धरून भिरकावून दिला. त्याच्या कैवारास्तव केतु आला, त्याला तर एका बुक्कीनेंच त्यानें पळविलें. ते दोघेही इंद्राकडे धांवत गेले आणि त्या पुच्छधारी नूतन राहूचें गाऱ्हाणें सांगूं लागले. तेव्हां इंद्र सूर्याला सोडविण्यासाठीं देवसेना घेऊन त्या ठिकाणीं आला; तों इकडे अंजनीतनय सूर्याला भक्षण करण्यासाठीं धरून, हात भाजल्यामुळें हें फळ नव्हे. ह्मणून मर्कटभावानें वारंवार टाकीत आहे व सूर्य थरथर कांपतो आहे असें करीत असतां सहज त्यानें मागें पाहिलें, तों इंद्राला घेऊन येत असलेला राहु त्याच्या दृष्टीस पडला. राहूला पाहतांच मारुतीनें त्याला इंद्राच्या देखत ताडन करण्याचें काम आरंभिलें. तो जेव्हां आक्रोश करूं लागला. तेव्हां ऐरावतासह इंद्र मारुतीवर चालून

ा. मारुतीनें त्याला पाहिलें मात्र आणि लागलेंच उड्डाण करून त्या-
ा गंडस्थळावर इतकें ताडण केलें कीं, तो घाबरून सैरावैरा धांवूं लाग-
ा. तरी इंद्रानें पुनः त्या ऐरावताला मारुतीवर आणलें. तेव्हां त्या अंज-
ातनयानें त्याचे चारी दांत धरिले आणि इंद्रासह त्याला उलथून खालीं
डलें. त्याचप्रमाणें इंद्राच्या किरीटावर एक चापट मारून तो खालीं
डला. तरी केंस मोकळे सुटलेला इंद्र ऐरावतास आवरण्याकरितां
ांवत त्याच्या मागें लागला. इंद्राची ती दशा पाहून देवसेना भयभीत
ाली. इंद्र गजाला धरून पुनः मारुतीवर घालूं लागला. पण तो
यानें एकही पाऊल पुढें टाकीना. रानोमाळ पळत सुटला; तेव्हां इंद्र
ाबरला, इतक्यांत यमानें आपला दंड मारुतीवर टाकला; तो चुकवून
ारुतीनें यमाच्या वक्षस्थलावर मुष्टिप्रहार केला, त्याला पाडलें आणि
याचाच दंड हिस्कावून त्यानेंच त्याला मारूं लागला. त्या असह्य
ारानें यम त्याला शरण गेला: तेव्हां मारुतीनें त्याला सोडलें. कुबे-
ही भिऊन त्याला शरण गेला. इतक्यांत ऐरावतावर बसून इंद्र पुनः
ाला. त्याला पाहतांच मारुतीनें त्या ऐरावताचें पुच्छ धरिलें आणि
याला तो गरागर फिरवूं लागला. वज्रासह इंद्र खालीं पडला व मारु-
ीनें गजाला आपटलें, तेव्हां मोठा हाहाःकार झाला. तरी इंद्र पुनः
अवसान धरून आला आणि त्यानें आपलें वज्र फिरवून मारुतीच्या
ोंडावर मारलें. तेव्हां मात्र तो मूर्च्छित झाला व कनकाद्रीवरून पर्व-
ाच्या दरींत कोसळला; पण वायु पुत्रस्नेहानें धांवत त्या ठिकाणीं गेला
आणि त्याला हृदयाजवळ धरून रडूं लागला. त्यानें विचार केला कीं,
जर माझ्या पुत्राचा प्राण गेला तर मी सर्व जगाचा प्राण घेईन. असें
मनांत आणून त्यानें आपलें स्तंभन केलें. वायु आहे ह्मणून सर्वांचे

प्राण !! त्रिभुवन जेव्हां कासावीस झालें, तेव्हां ब्रह्मा, इंद्र, विष्णु, शंकर, सर्व ऋषि, देव आणि सर्व प्रजा वायूजवळ आल्या. त्यांस पाहतांच पुत्राला कडेवर घेऊन वायु उभा राहिला आणि देवत्रयास ह्मणाला—माझा पुत्र जर न उठेल तर मी सर्वांचे प्राण घेईन. असें ऐकतांच विष्णूनें पुढें होऊन संतोषानें त्याला वर दिला कीं, तुझा हा पूर्ण पिंडाचा पुत्र ब्रह्मकल्पपर्यंत जिवंत राहील. हा चिरंजीव असो ! शिव ह्मणाला—माझ्या तृतीय नेत्रांतील अग्नि आणि शूलादि आयुधें याला बाधणार नाहींत. ब्रह्मा बोलला—माझा शाप व पाश याला बाधणार नाहींत. इंद्र ह्मणाला—माझें वज्र याला बाधा करणार नाहीं. हा वज्रदेही असो. याच्या हनुवटीला वज्र लागलें आहे, ह्मणून लोक याला हनुमान् ह्मणोत. कुबेर ह्मणाला—याच्या हातानें अनंत राक्षसांचा संहार होईल. यमानें सांगितलें—माझा दंड याला बाधणार नाहीं व याचें नामस्मरण करील त्याला मी दंड करणार नाहीं. वरुण ह्मणाला—याला कधींही श्रम होणार नाहींत. इतकें झाल्यावर विश्वामित्रानें कधींही न सुकणारी दिव्य सुमनांची माळ त्या हनुमंताच्या गळ्यांत घातली आणि सर्व आपापल्या ठिकाणीं गेल्यावर वायूनें मारुतीला अंजनीजवळ आणून दिलें. तेव्हां त्या पुत्रवियोगामुळें दुःखी मातेचें शांतवन झालें व ती त्याला हृदयाजवळ धरून आनंदानें लालन पालन करूं लागली.

---

अध्याय ४ था.



# अध्याय ४ था.

दशरथ राजाच्या तिन्ही पट्टराण्यांचीं गर्भचिन्हें जेव्हां स्पष्ट दिसूं लागलीं; तेव्हां एके दिवशीं सूर्यकुलाचे गुरु वसिष्ठऋषि राजास ह्मणाले—दशरथा! धर्मशास्त्र असें आहे कीं, स्त्रिया गर्भिणी असतां पतीनें स्वतः त्यांना दोहदांविषयीं प्रश्न करावे आणि त्यांच्या इच्छा पूर्ण कराव्या. ह्मणजे गर्भस्थ प्राण्याला आनंद होतो. असें ऐकतांच राजाला संतोष वाटला व आनंदानें तो आपल्या राण्यांस डोहाळे विचारण्यासाठीं निघाला. पिंडभक्षणाचे वेळीं कैकयी रुसली होती, ह्मणून यावेळीं आधीं तिच्याकडे जावें; असें त्याच्या मनांत आलें व त्याप्रमाणें तो तिच्याच मंदिरांत पहिल्यानें गेला. दासींनीं त्याला पहातांच आपल्या स्वामिणीला महाराजांची स्वारी येत आहे; ह्मणून कळविलें. पण ती स्वरूपाच्या गर्वानें फुगलेली कैकयी, त्याला मान देण्यासाठीं जाग्यावरूनही उठली नाहीं. प्रीतीनें दशरथ तिच्याजवळ गेला; तरीही ती उभी राहिना. इतका अनादर पाहिल्यावर मग तो तरी कसा बसेल? तोही उभ्यानेंच प्रिये कैकयी! तुला काय आवडतें? असें विचारूं लागला. तेव्हां ती ह्मणाली—आपण काय माझी आवड पुरविणार? ठाऊक आहे! दशरथानें सांगितलें तूं सांग मात्र. तुझ्यासाठीं मी आपले प्राणही खर्च करीन; पण तुझी आवड पुरवीन. असें ऐकतांच ती ह्मणाली—असेंका आहे? ऐकावें तर. मला वाटतें कीं, आपण माझ्या दोन्ही सवतींच्या पोरांला दूर अरण्यांत घालवून देऊन माझ्या पुत्राला राज्याधिकार द्यावा. लोक यामुळें माझी निंदा करतील तरच मला सुख होईल. अशीं पूर्ण समत्सरभाषणें ऐकतांच, दशरथाच्या काळजांत सुरी मारल्याप्रमाणें वेदना होऊं लागल्या. त्याला खेद झाला व

कांहीं सुचेना. तरी तसाच निघाला तो सुमित्रेच्या मंदिराजवळ येऊन थांबला व तें मंदीर पाहिल्याबरोबर शांत झाला. दासींनीं महाराज येत आहेत! अशी वर्दी देतांच सुमित्रा अष्टभावांनीं सद्गदित होऊन त्याचा सत्कार करण्यासाठीं उठली. तो दारांत पाय ठेवीत आहे; इतक्यांत सुमित्रेनें प्रेमभावेंकरून त्याला पंचारतीनें ओंवाळलें. विनयानें आणून मंचकार बसविलें; त्याची षोडशोपचारेंकरून पूजा केली आणि हात जोडून सलज्ज अधोवदनानें त्याच्यापुढें उभी राहिली. इतका प्रकार होईपर्यंत राजा कैकयीवचनोद्भवदुःख पूर्ण विसरला आणि निःसीम प्रीतींतील लडिवाळपणानें तिला आपल्या वामांकावर बसवून हनवटीला हात लावून, प्रिये! तुला डोहाळे काय होतात? हें विचारण्यासाठीं आज मी मुद्दाम येथें आलों आहे. तर तुला कोणती आवड आहे हें मला सांग बरें? असें विचारूं लागला. तेव्हां ती सुशीला स्मितवदनानें ह्मणाली— प्राणनाथ! कोणती गोष्ट कमती आहे? ह्मणून इच्छेनें सैरावैरा धांवावें. आपल्या पायांच्या कृपेनें सगळ्या इच्छा उद्भवतांच तृप्त होतात. तरी विचारणेंच होतें; ह्मणून सांगतें कीं, थोरल्या बाईच्या मुलाची माझ्या मुलानें सेवा करावी. हें मला आवडतें. त्यांचा वडील मान आहे आणि कित्येक ऋषींनीं सांगितलेलेंही आहे कीं, प्रत्यक्ष परमेश्वर त्यांच्या उदरीं येणार आहे तर त्याची सेवा माझ्या मुलानें केली ह्मणजे तो कृतार्थ होईल व मलाही सुख वाटेल. अशीं अमृतासारखीं भाषणें ऐकतांच दशरथराजानें तिला आलिंगन दिलें आणि सांगितलें, प्रिये! तुझ्या पुत्रावरून मी आपलें राज्य ओंवाळून टाकीन. सुकुमारे! तुझ्या स्तुत्य इच्छा खरोखर पूर्ण होतील. इतकें बोलून राजानें तिजकडून याचकांस दानें करविलीं आ[णि] तिच्या इच्छेप्रमाणें अनेक मंगल समारंभ करून [...] तिचा निरोप घेतला

त्रिभुवनपतीची भावी माता ज्ञानकला कौसल्या सर्व तुच्छ व्यवहार
हून ब्रह्मानंदांत निमग्न आहे तों राजा तिच्या मंदिराजवळ आला
सेवकांस बाहेर ठेवून त्यानें अंतरगृहांत प्रवेश केला; पण ज्ञानांजन
लागल्यामुळें सर्व चराचररूप जो राम तद्रूप झालेली कौसल्या त्याला
ोठेंही दिसेना. तो स्थूल ओसरीवर पहिल्यानें गेला, पण तेथें आपली
िया नाहीं असें पाहतांच फिरला व सूक्ष्ममाजघरांत शिरला. तेथेंही
याला कौसल्या दिसेना, तेव्हां कारण—कोठडी पाहूं लागला, तों तेथें
ळाच अंधकार. तो पाहून शेवटीं राजा महाकारण गच्चीवर चढला.
ण तेथेंही जेव्हां त्याला ती दिसेना; तेव्हांमात्र आश्चर्यचकित झाला.
वटीं जेव्हां त्यानें परात्पर घरांत प्रवेश केला; तेव्हां निर्विकल्प वृक्षा-
ळीं समाधिस्थ असलेली कौसल्या त्याच्या दृष्टीस पडली. तिची
ष्टि अंतर्यामीं मुरडली होती व ब्रह्मानंदीं निमग्न असल्यामुळें ती आपलें
मरूपही विसरलेलीच होती. योगीसुद्धां स्वरूपीं रमले ह्मणजे त्यांचें
न अलीकडे राहतें. असो. दशरथ तिचें अवर्णनीय तेज पाहतांच
दिपला आणि तिच्यापुढें थबकून उभा राहिला. ती खरोखर देहावर
नव्हती, पण राजाला वाटलें ही रुसली आहे, ह्मणून बोलत नाहीं. तो
स्नेहानें तिच्याजवळ बसला आणि तिचें अनेकप्रकारें समाधान करूं
लागला. पण जिला मी स्त्री कीं पुरुष ह्याचीही शुद्धि नाहीं. ती काय
लणार ? जिची, अलंकार नव्हेत सर्व सुवर्णच, तरंग नव्हेत, सर्व
ेकच उदक; अशी स्थिति झालेली आणि जिला खरोखर महद्भूतानें
झडपलें होतें; ती जेव्हां कांहींकेल्या शुद्धीवर येईना; तेव्हां राजा तिला
भूत झोंबलें असें मानूं लागला आणि देव, ऋषि व सिद्ध पुरुषांनीं
आशीर्वाद दिला आहे कीं, तुझ्या उदरीं श्रीराम येणार तें खोटें होतें

काय? असें ह्मणूं लागला. रामनाम ऐकतांच कौसल्येनें डोळे उघडले. तेव्हां राजा तिला प्रेमानें विचारूं लागला—कुरंगनेत्रे! तुझ्या इच्छा पुरविण्यासाठीं आज मी आलों आहें. तुला काय प्रिय आहे तें सांग बरें? तूं अशी भ्रमलीस कां? असें ऐकतांच कौसल्या गर्जना करून बोलूं लागली—मजपाशीं तूं मी हें अज्ञान नाहीं. मी जगदात्मा राम आहें, तरी स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण या चार देहांतून निराळा; द्वैताद्वैत महाद्वैताहून वेगळा; सर्वसाक्षी सच्चिदानंदपरब्रह्म आहें! तिचें असें भाषण ऐकतांच राजा दचकला आणि हिनें ओळखही सोडली कीं काय पहावें, ह्मणून विचारूं लागला. प्रिये! मी कोण आहें पहा ओळख; तुला तुझे डोहाळे विचारण्यासाठीं आलों आहें. असें एकतांच ती ह्मणाली—ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान, आटून गेलें आहे; स्त्री, पुरुष किंवा नपुंसक नव्हे, मग मी तूंपण कशाचें? हे शब्द ऐकतांच राजा घाबरून ह्मणाला—अरे रे! हिला महद्भूतानें घेरलें आहे. तरी लहानपणच्या कांहीं गोष्टी विचाराव्या; असें मनांत आणून विचारूं लागला. "प्रिये! लहानपणीं आपलें लग्न रावणानें बुडविलें होतें; हें तुला आठवतें काय"? इतकें बोलला मात्र, तों कौसल्या दंड थोपटून उभी राहिली आणि मोठ्यानें ह्मणाली—अरे! धनुष्यबाण आणून दे त्या दुष्ट रावणाचीं दाही शिरें मी छेदून टाकीन. आधीं ताटकेला मारून ऋषीचा याग सिद्धीस नेईन आणि युद्धांत भयंकर राक्षसांचा संहार करून व पण जिंकून विश्वामित्राला आनंदित करीन. शिवचाप मोडीन, जनकतनयेला वरीन. ती माझी शक्ति आहे! परशुरामाचा गर्व घालवीन. मी पितृभक्त आहें; त्याच्या वचनासाठीं अरण्यवास पत्करून जनस्थानवासी त्रिशिराखरदूषणांचा वध करीन. मी एकपत्नी व्रती आहे! तिच्यासाठीं रीस वानरां-

या हातीं लंका घेववीन! माझा वज्रदेही मारुती तिला जाळील. मी
ागरावर पाषाणांचा सेतु बांधून तेथें जाईन आणि भयंकर रण माजवून
ावण कुंभकर्णादि खलांचा वध करून सीतेला देवांसह सोडवीन आणि
त बिभीषणाला लंकाधिपत्य देऊन अयोध्येस येईन. मी माझ्या
जेला आधिव्याधिजराभयरहित करीन! मी पूर्णब्रह्मसनातन आहें!
जपाशीं भेदाभेद नाहीं! मी अज अजित सर्वेश्वर अनंत अवतार धरून
ल्लों आहें! सर्व जग माझ्यांत व मी सर्व जगांत आहें! अशी चमत्का-
रिक बडबड ऐकतांच दशरथ ह्मणाला—खरोखरीच भूत झोंबलें ह्मणून ही
शी बडबडते. त्यानें ताबडतोब अनेक पंच्याक्षऱ्यांस व वसिष्ठ गुरू-
ंस बोलावण्यासाठीं जासूद पाठविले आणि गुरूजी येतांच तिची
थिति सांगितली आणि ह्मणाला—महाराज! खरोखर हिला पिशाच झों-
लें! वसिष्ठ असें कधींच होणार नाहीं असें बोलून कौसल्येजवळ आले,
ं त्याला ती धनुष्यबाणमंडित आजानुबाहू, आकर्णनयन, पीतांबरधारी,
मूर्ती दिसली व अष्टभावांनीं प्रेमानंद दाटून गेल्यामुळें तेही देहभान
सरले; पण दोघांचीही सारखी स्थिति पाहून दशरथ घाबरला आणि
ं महाभूतें आपण निरपराधी श्रावण मारल्यामुळें मेलेलीं वृद्धें असतील
सें ह्मणून शोक करूं लागला. त्यांतच वसिष्ठासारख्या महर्षीलाही
पिशाचानें घेरलें! असें मानून आश्चर्यही पावला. इतक्यांत वसिष्ठांनीं
आपली स्वानंदलहर जिरवून डोळे उघडले; तेव्हां राजाला बुडत्याला हात
मिळाल्याप्रमाणें वाटलें. नंतर तो वसिष्ठगुरूजींस ह्मणाला—महाराज!
आपणासारख्या माहात्म्यासही भूत झोंबलें, याचा मला विस्मय वाटतो.
असें ऐकतांच वसिष्ठ ह्मणाले—राजा! वेडा आहेस. जो नीलग्रीवहृदयरत्न,
ब्रह्मदेवाचा पूज्य देव, सनकादिक ज्याचें ध्यान करितात; तो शेषशायी

नारायण कौसल्येच्या उदरीं येत आहे. तो चाररूपांनीं तुझा पुत्र होणार व त्या पुण्यश्लोकाचें यश सुर, भूसुर गाणार! आह्मीं त्या ब्रह्मस्वरूपाचें ध्यान पाहिल्यामुळें आत्मानंदीं क्षणभर मग्न होतों. आतां तुला ह्मणून सांगतों ऐक. हा पूर्णब्रह्मजगद्गुरु माध्यान्हीं पुष्यनक्षत्राचा योग साधून अवतरेल, असें ऐकतांच दशरथास परम आनंद झाला व त्यानें तीं भाषणें आपल्या हृदयरूपी पेटींत सांठवून ठेवलीं.

नंतर नवमास पूर्ण भरतांच जेव्हां कौसल्येचा प्रसूतिसमय आला; तेव्हां वसंतऋतूंतील चैत्रशुद्धनवमी रविवारीं दोनप्रहरीं पुष्ययोग साधून श्रीरामचंद्रानें कौसल्पोदरीं अवतार घेतला. त्यावेळेस देवांनीं दुंदुभी वाजविल्या व पुष्पवर्षाव केला. त्याचा प्रकारः—कौसल्या एकांतीं बसली असतां अकस्मात् तिनें आठ वर्षांची मनोहर मूर्ति पुढें उभी राहिलेली पाहिली. ज्या बाळकाचें तेज चंद्रसूर्यांच्या तेजास लोपविणारें, ज्याच्या पदकमलांचा मकरंद सेवनासाठीं प्रत्यक्ष लक्ष्मी भ्रमरी झालेली, त्या पदांची शोभा काय वर्णन करावी? ध्वज, वज्र, अंकुश व पद्माकर, उर्ध्व रेखांकित शोभायमान पदकमलें, त्यांत तोडर व नूपुरें; नील पोटऱ्या, कर्दळीचे स्तंभाप्रमाणें जानुजंघ, पीतांबरधारी, मेखला व श्रीवत्सांकित वैजयंतीसह मुक्तमालांनीं मंडित, सर्वांगाला अष्टगंधाची उटी लावलेली, कंबुकंठावर सुहास्यवदन, अद्भुत सौंदर्यवान् असा तो बाल्वेष पाहतांच त्या अजातप्रभूला कौसल्या आनंदानें ह्मणाली—देवा! आतां तूंच बालक होऊन माझ्या पोटीं अवतार घे. तुला लोक कौसल्यानंदन ह्मणोत. असें ऐकतांच भगवंतानें बालरूप धरिलें आणि कौसल्झेला पुत्र झाला ह्मणून जिकडे तिकडे आनंदवाद्यें वाजूं लागलीं. अयोध्येवर आकाशांतून देवांनीं पुष्पवृष्टि केली. देवांसहित इंद्र हर्षानें जयजयकार करूं लागला.

यांतच देव दुंदुभी वाजवूं लागले. त्यामुळें आकाश दुमदुमून गेलें. गल्लोगल्लींतून सुवासिनी हरिद्राकुंकुमानें तबकें भरून धावूं लागल्या; त्या कौसल्येच्या मंदिरांत येऊन भरल्या. चोहोंकडे मंगलतुरें वाजूं लागलीं. ब्राह्मण धांवत राजाला आशीर्वाद देण्यासाठीं आले; त्यांसह पुत्रजननवार्तेनें संतोष पावलेला राजा दशरथ पुत्रमुख पाहण्यासाठीं निघाला. त्यावेळेस भांडारखाना फोडून याचकांची तृप्ति करा, अशी त्यानें आज्ञा केली. नंतर स्नान व पुण्याहवाचनपूर्वक सूतिकासदनांत जाऊन त्यानें पुत्रमुखावलोकन केलें आणि त्याच्या तोंडांत मधुबिंदु घालून मधुकैटभारीस संतोषविलें. श्रीरामवदन न्याहाळून पाहतांच दशरथाला अत्यानंद झाला. नंतर त्यानें गाई, भूमि आणि रत्नें यांचीं दानें देऊन दैवज्ञजोतिषांस पुत्राचें जातक वर्णन करा, ह्मणून विनंति केली. राजाच्या सातशें स्त्रिया धांवत कौसल्येच्या मंदिरांत आल्या; त्यांनीं तिला रत्नजडितमंचकावर बसविलें आणि पुत्रास तिच्या मांडीवर देऊन सर्व तिच्या सेवेसाठीं तिच्या सभोंवती उभ्या राहिल्या. तिच्या दासीजनांपैकीं कोणी तिजवर चौऱ्या उडवूं लागल्या आणि कोणी पिकपात्र पुढें करण्यासाठीं तें घेऊन उभ्या राहिल्या. नंतर वसिष्ठ पुढें होऊन जातक वर्णन करून राजाला सांगूं लागले—राजा! हा क्षीरसागरविहारी निजजन तारण्यासाठीं कौसल्येच्या पोटीं अवतरला आहे. हा बारा वर्षांचा होतांच एक ब्राह्मण तुझी प्रार्थना करून याला यज्ञरक्षणासाठीं नेईल. मार्गांत हा ताटकेचा नाश करील. नंतर शिवचापारोपणाचा पण सिद्धीस नेऊन स्त्री वरील व अयोध्येस परत येतांना एका महायोद्ध्या ब्राह्मणाला गर्वहत करून हा तुझा पुत्र महाप्रतापी ह्मणून जगांत गाजेल. हा राज्यावर बसण्याचे वेळीं एक अरिष्ट येईल व सर्व प्रजा

कष्ट भोगील. तरी हा पितृभक्त स्त्रीसह चौदावर्षें अरण्यांत राहील. तेथें याच्या स्त्रीला एक राक्षस चोरून नेईल. हा तिला शोधीत असतां रीस व वानरांच्या साह्यानें सागरावर सेतु बांधून जाईल व एका शरणागत रजनीचरास राज्य देण्यासाठीं कोट्यावधि दुष्टांचा संहार करून स्त्रीसह देवांचें बंदिमोचन करून अयोध्येस येईल. नंतर अक्रा हजार वर्षें राज्य करून ही अयोध्या वैकुंठास नेईल. याप्रमाणें जातक वर्णन होत असलेलें पाहून राजा दशरथ संतोष पावला आणि स्तनपान करीत असलेला ईश्वरही हा वाल्मीकाप्रमाणेंच बोलला ह्मणून स्मितवदन करून त्याजकडे पाहूं लागला; इतक्यांत सुमित्रेला पुत्र झाल्याची बातमी आली. ती ऐकतांच सर्वांसह राजा पुण्याहवाचन करून तिच्या मंदिरांत निघाला.

सुमित्रा निद्रिस्त असतां मला पुत्र झाला, असें स्वप्न पाहून जागी झाली; तों पुढें सद्योजात मूल खेळत आहे. राजानें त्याचेंही जातकर्म केलें, तों कैकयीला दोन पुत्र झाल्याची वदंता आली; ह्मणून राजा तिसऱ्यानें सर्वांसह पुण्याहवाचनपूर्वक तिच्या मंदिरांत गेला.

कैकयी निद्रिस्त असतांच प्रसूत झाली आणि तिच्यापुढें दोन पुत्र आहेत असें पाहून तिला दासींनीं थोपटून जागें केलें. नंतर राजानें तेथें येऊन त्यांचेंही जातकर्म करून सर्व अयोध्येंत बारा दिवस आनंदोत्साह चालू केले. तेरावे दिवशीं वसिष्ठांनीं नामकरण करवून चौघांचीं नांवें ठेवविलीं. तीं अशीं:—कौसल्येचा राम, सुमित्रेचा लक्ष्मण आणि कैकयीचे भरत व शत्रुघ्न.

---

# अध्याय ५ वा.

दशरथ राजानें आपल्या पुत्रांच्या नामकरणाचा उत्साह कित्येक दिवसपर्यंत चालविला होता. त्या पुत्रांच्या माता प्रेमानें त्यांला पाळण्यांत घालून, जोजो ह्मणून हालवीत असत. राज्यांतील सुशील व सुंदर स्त्रिया अष्टौप्रहर त्या राजकुमारांच्या कौतुकक्रीडेला मोहित होऊन त्याच ठिकाणीं अक्षय वास करूं लागल्या. त्यांचीं नांवें:-शांति, क्षमा, दया, उन्मनि, उपरति आणि सद्विद्या. ह्या स्त्रिया सदोदित पाळण्याजवळ उभ्या असत व प्रभूला जोजो जोजो ह्मणून त्याच्या लीला गाऊन आळवीत असत. निर्वाणदीक्षा, स्वरूपस्थिति, मुमुक्षुता, प्रतीति, लीनता, समाधि, सद्गति, ह्या स्त्रिया प्रभूला गाणीं गाऊन खेळवीत असत. परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी ह्या गाणीं ह्मणण्यांत हुषार होत्या. सरूपता, सलोकता, समीपता व सायुज्यता ह्या चौघी स्त्रिया त्या सूतिकासदनाच्या चारी कोपऱ्यांत सदोदित रामरूप पाहण्यासाठीं उभ्या असत. इतक्या ह्या अगदीं घरांत होत्या; यांच्या शिवाय कांहीं बाहेरही होत्या त्या:-जागृति, सुषुप्ति, स्वप्न, स्थिति, असंभावना, विपरीतभावना, विक्षेपता, गता, आयाता आणि तुर्या इत्यादि अनेक तिष्ठत होत्या; पण प्रभु रामचंद्र त्यांच्या दृष्टीस पडत नसे. असो. नामकरणाचा विधि आटपल्यानंतर कौसल्येनें सर्वांच्या ओंट्या भरल्या. सर्वांस वस्त्रें व अलंकार दिले. नंतर त्या सर्व आनंदानें आपापल्या घरीं गेल्या.

ज्या दिवशीं अयोध्येंत रामाचा जन्म झाला, त्या दिवशींच राक्षसांला विघ्नें जाणवूं लागलीं. प्रळय वीज कडकडून लंकेवर पडली. भूकंपामुळें लंकानगरी कापूं लागली, रावणाचें छत्र उगीच मोडलें, सभा-

जन प्रेतवत् दिसूं लागले, महाद्वारें उलथून पडलीं, रावण सिंहासनावर बसतांच त्याच्या दाही शिरांवरील मुगुट खालीं पडले. इंद्रजीत आरसा पहात होता, त्याला त्यांत मुखच दिसेना. राजमंदिरावर दिवसा दिवाभीतें ओरडूं लागलीं. त्याचवेळीं मंदोदरीला स्वप्न पडलें कीं, मर्कटांनीं येऊन गळेसरी तोडली आणि विधवा स्त्रीनें येऊन धुळीनें ओंटी भरली. तिनें आपल्या कपाळाचें कुंकूं पुसलेलें पाहिलें, तेव्हां रावणाच्या प्राणाविषयीं तिला काळजी उत्पन्न झाली. याप्रमाणें अनेक उत्पात पाहून रावणानें आपले सर्व मंत्री बोलाविले आणि सदोदित सावध राहून लंकानगरीचें रक्षण करा ह्मणून आज्ञा केली.

श्रीरामजननमहोत्सवामुळें अयोध्यानगरी तर प्रफुल्लित झालेली होतीच. तरीही त्यांत त्रिभुवनपतीच्या नित्य निवासामुळें वृक्ष, वल्ली सदोदित प्रफुल्लित राहूं लागल्या; गाई विपुल दूध देऊं लागल्या आणि सर्व प्रजा आधि, व्याधि, जरा, भयरहित झाल्यामुळें कोणासही चिंता, शोक, दरिद्र व दुःख राहिलें नाहीं. भूमीला अपार पीक येऊं लागलें. अज्ञान व पाप तर राज्यांतून पळालें. असो. दशरथाचे चौघेही पुत्र शुक्लचंद्राप्रमाणें दिवसेंदिवस वाढतांना एका मागें एक रांगूं लागले; कांहीं दिवसांनीं एकमेकांचा हात धरून पाचुबंद आंगणांत चालूं लागले आणि मनोहर बाललीला करूं लागले. त्यांनीं एकमेकांकडे पाहून हंसावें आणि बालभावानें कांहीं अस्पष्ट शब्दोच्चार करावे, ते ऐकून त्यांच्या माता व दशरथ, यांस आह्मीं कृतकृत्य आहों असें वाटत असे. कौसल्येनें त्या चौघांसही जेवायाला हांक मारावी, ती ऐकतांच त्यांनीं पळावें आणि त्यांच्या मागून मातेनें धांवत जाऊन, त्यांना धरावें आणि चौघांचींही मुखें स्वच्छ धुऊन त्यांस भोजनास बसवावें. दशरथानें ते

चांगले चालूं बोलूं लागतांच त्यांना लहान लहान धनुष्यें व भाते करून दिले. त्यांच्या प्रमाणें त्यांच्याजवळ खेळण्यासाठीं चिमणे चिमणे सहचर व सेवकही ठेवून दिले. जेव्हां ते आठ वर्षांचे झाले, तेव्हां तर त्यांची आकृति विशेष रमणीय दिसूं लागली आणि बालक्रीडा पुढील चरित्र दर्शवूं लागली. आधीं तीं चिमणीं चिमणीं मुलें, चिमणे पीतांबर नेसून मेखला, मुक्तमाला व पदकें इत्यादि अनेक रत्नालंकारांनीं भूषित झालेलीं पाहतांच सर्वांहून दशरथाचें मन द्रवत असे. श्रीरामचंद्र उन्हांत खेळूं लागला म्हणजे सेवकांनीं मित्रपत्रें ( अबदागिऱ्या ) वर धरावीं व कोणी चामरें वारावीं. श्रीरामचंद्रानें चिमणें धनुष्य सज्ज करून चिमणें ठाण मांडून बाण सोडतांच मागून लक्ष्मणानें सोडावा. त्यांचे बाण सुटून संधानभेद ( निशाण मारणें ) करीत आहेत, तों भरत व शत्रुघ्न यांनीं बाण सोडून त्यांच्याप्रमाणेंच अचुक संधान साधावें. हें कौतुक दशरथानें दडून राहून पहावें आणि मनांत त्यांच्या चपलतेचें आश्चर्य मानावें. त्यांनीं राक्षसांचीं चित्रें करवावीं आणि त्यांचीं शिरें बाणांनीं तोडावीं. असो. दशरथानें वसिष्ठाचें मत घेऊन चौघांचे व्रतबंध केले, त्यांत अनेक प्रकारचीं दानें त्यांजकडून देवविलीं. जो यज्ञभोक्ता नारायण, त्याच्या गळ्यांत ब्राह्मणांनीं यज्ञोपवीत घातलें आणि त्यास गायत्रीमंत्राचा उपदेश केला. नंतर ते चौघेही वसिष्ठ गुरूजवळ वेदाध्ययन करूं लागले. प्रभु रामचंद्राकडून अध्ययन करविण्यांत गुरूला मुळींच श्रम होत नसत. त्याच्याचप्रमाणें त्याचे तिघे सहोदर. असो. बारावर्षें पूर्ण होतांच राम, वसिष्ठ व दशरथाच्या अनुमतानें बंधूंसह तीर्थाटनास निघाला. त्यावेळीं दशरथानें त्यांच्या रक्षणासाठीं सुमंत प्रधानासह असंख्य सैन्य दिलें.

त्याचप्रमाणें तीर्थोतीर्थांचे ठायीं दान करण्यासाठीं अपार संपत्ति दि
नंतर रामानें सर्व तीर्थांचीं स्नानें करून प्रत्येक ठिकाणच्या याचक
गाई, भूमी आणि रत्नें, यांचीं दानें देऊन त्यांची तृप्ति केली. त्या
प्रमाणें त्यानें द्वादश ज्योतिर्लिंगें, सप्तपुऱ्या आणि चार धाम, यां
यथासांग यात्रा केल्या. ठिकठिकाणच्या साधुसंतांचीं दर्शनें घेत
आणि बंधूंसह आनंदगजरानें अयोध्येस येऊन माता पितरांचें दर
घेतलें. तीर्थयात्रा करून आल्यानंतर रामासह चौघेही राजपुत्र विर
स्थितींत योग्याप्रमाणें राहूं लागले.

एके दिवशीं सिद्धाश्रमाहून प्रतिसृष्टि करणारा गाधितनय विश्वामि
अयोध्येस आला. त्या ब्रह्मभक्त राजानें तो येत आहे असें ऐकतां
पुढें जाऊन भक्तीनें त्याला साष्टांग नमस्कार केला आणि सत्कारानें
णून सिंहासनावर बसविलें. नंतर वस्त्रालंकारादि देऊन त्याची पूजा के
व कांहीं इच्छित मागा महाराज ! असें ह्मणून हात जोडून पुढें उभा रा
ला. त्याचा तो विनय पाहून संतोषित झालेल्या विश्वामित्रानें त्या
अनेक आशीर्वाद दिले आणि सांगितलें–राजा! मी अरण्यांत
करूं लागलों, ह्मणजे राक्षस येऊन त्याचा विध्वंस करितात; कुंड वेदि
मोडून यज्ञपात्रें फोडतात; मारीच, ताटका, सुबाहु, इत्यादि येऊन हो
द्रव्यें भक्षण करितात, कोणी अस्थि, मांस आणून यज्ञांत टाकत
आणि कोणी मंडपाला अग्नि लावतात. याकरितां माझ्या यज्ञाचें रक्ष
करण्यासाठीं तुझा पुत्र रामचंद्र मजबरोबर दे. असें ऐकतांच दशरथा
अंगावर विद्युत्पात झाल्यासारखें वाटलें. त्याचा विवेक आणि चातु
नष्ट झाल्यामुळें तो शोकग्रस्त, अधोवदनानें आधीं स्तब्ध झाला. नं
भीत भीत हळूच ह्मणाला–महाराज! राक्षस यज्ञाचा विध्वंस करिता

या ठिकाणीं माझ्या अज्ञान बालकानें येऊन काय करावें? अजून तो धनुर्विद्याही पढला नाहीं. केवळ बालभावानें हातांत लीलाकार्मुक घेऊन कुलांत खेळणारा अज्ञ व कोमल राम मी आपल्या बरोबर अरण्यांत कसा बरें पाठवावा? आणखीं कांहीं मागा. राज्य, संपत्ति, गाई, भूमि जें पाहिजे तें देतों. राक्षस यज्ञास विघ्न करितात, तर मी स्वतः येऊन रक्षण करितों; परंतु रामचंद्राला मागूं नका. असें बोलत असतां राजा अश्रुपूर्ण झालेला पाहून कौशीक रागानें बोलूं लागला—अरे! मी न मागतां मागा ह्मणून मागितलेलें देत नाहींस काय? धिक्! तूं या सूर्यकुलाला कलंक लावतोस. याच वंशांतील हरिश्चंद्र मला राज्यदान देऊन दक्षिणाद्रव्यार्थ डोंबाच्या घरीं विकला गेला, तरी वचनाला ढळला नाहीं. याच वंशांतील शिबि, कपोताच्या भारंभार मांस देत असतां प्राणांत समयालाही डगमगला नाहीं! याच वंशांतील रुक्मांगद एकादशीव्रती वचनासाठीं ज्यानें पुत्राचा शिरच्छेद केला! तसाच श्रियाळ. तूं रामाचा महिमा जाणत नाहींस. हा वैकुंठवासी तुझ्या घरीं अवतरला आहे. वसिष्ठाला विचारून पहा. त्याला बाळ ह्मणूं नको. हा राम पूर्णब्रह्मसनातन असूनही जर तूं मोहानें माझ्या हवालीं न करितां रडत बसतोस तर बैस. मी जातों, त्या रामचंद्राचें कल्याण असो! असें बोलून तो थांबला नाहींच, द्वारा बाहेर गेला; तेव्हां मात्र दशरथ फार घाबरा झाला आणि त्यानें आधीं घरांतच वसिष्ठऋषि होते, त्यांच्या जवळ जाऊन सगळें वर्तमान सांगितलें आणि ह्मणाला—महाराज! रामाशिवाय तो जें मागेल तें द्या आणि त्याची समजूत करा. यावेळेस आधीं रामाला व मग मला जीवदान देणें आपणांकडे आहे. असें ऐकतांच वसिष्ठ ह्मणाले—तो कौशिक महा हट्टी, ज्यानें परमेष्ठीस जिंकण्यासाठीं

प्रतिसृष्टी केली. ज्यानें साठ हजार वर्षें लोहचूर्ण भक्षण करून गायत्री-पुरश्चरण केलें, ज्याला हें त्रिभुवन भीत आहे, त्याला कोपविलेंस तर तो शाप देऊन तुझें कुल भस्म करील. तर आतां असें कर; राम आणि लक्ष्मण त्याला दे. भरत व शत्रुघ्न तुजपाशीं असले ह्मणजे झालें. असें ऐकतांच जेव्हां राजा दीर्घ स्वरानें रडूं लागला, तेव्हां वसिष्ठांनीं त्याच्या मस्तकावर कृपाकर ठेवून त्याला दिव्यचक्षु दिले; तेव्हां आपले पुत्र कोण व कशासाठीं अवतरले आहेत, याचें राजाला ज्ञान झालें आणि तो गुरूला नमून धांवत विश्वामित्राजवळ गेला आणि त्याचे पाय धरून ह्मणाला–महाराज! रामासह लक्ष्मणही न्या, पण मजवर कोप करूं नका. मी अपराधी आहें, क्षमा करा. राजानें दोघे देतों असें सांगतांच विश्वामित्र शांत झाला आणि राजाबरोबर परत सभेंत गेला. तो आसनावर बसल्यानंतर वसिष्ठही बाहेर येऊन बसले; त्यांस पाहतांच विश्वामित्र ह्मणाला–आपला शिष्य रामचंद्र आह्माला दाखवा महाराज! असें ऐकतांच राजानें रामाला बोलावून आणविलें. त्याला पाहतांच प्रेमानें आलिंगन देण्यासाठीं विश्वामित्र पुढें झाला, इतक्यांत रामानें त्याच्या चरणावर मस्तक ठेविलें. तेव्हां विश्वामित्रानें त्याला उठवून हृदयाजवळ धरिलें आणि जन्म घेतल्याचें सार्थक मानलें. राम गुरूसह पित्याला नमून आपल्या स्थानीं बसल्यानंतर विश्वामित्र त्याला ह्मणाला–माझा यज्ञ निशाचर मोडतात; त्याचें रक्षण रामा तुजवांचून कोण करील? असें ऐकतांच राम कमलाप्रमाणें प्रफुल्लित झाला व हास्यवदनानें बोलूं लागला.

---

ह्मणाले—विप्रा ! मायाचरित्राच्या नादीं लागलास ह्मणजे भुलून जाशील. तुझे प्राण कासावीस होतील आणि महा आवर्तांत पडून भ्रमूं लागशील. तेव्हां तुला कोण सोडवील ? असें ऐकतांच गाधि ह्मणाला—असें आहे तर देवा ! तूं मला असा वर देऊन ठेव कीं, जेव्हां मी मायावर्तांत पडून भ्रमेन व शोक करीन; तेव्हां तुझें स्मरण व्हावें आणि स्मरण होतांच तूं येऊन मला मुक्त करावेंस. असें ऐकतांच विष्णु ठीक आहे ह्मणून निघून गेले. नंतर गाधि जान्हवीतीरीं एका अरण्यांत स्त्रीसह राहिला असतां एके दिवशीं सूर्य माध्यान्हीं आल्यावर स्नान करावें ह्मणून गंगा-तटाकीं गेला. गंगेंत प्रवेश करीत असतां त्याच्या मनांत आलें कीं, अजून ईश्वर मला मायेची करणी कां दाखवीत नाहीं ? इतकें मनांत आणून त्या ब्राह्मणानें अघमर्षणार्थ गंगेंत बुडी मारली, तों मायेनें आपलें चरित्र आरंभिलें. गाधीला वाटलें कीं, मला महाव्यथा लागली व मी मरण पावलों. यमदूत आले व त्यांनीं त्याचे प्राणही काढून नेल्याचा भास त्याला झाला. त्याला मारीत मारीत यमाकडे नेलें. यमानें कुंभीपाकांत घालणें, असिपत्रवनांतून हिंडविणें, तप्तलोहस्तंभा-जवळ बांधणें, इत्यादि अनेक प्रकारें यातना भोगविल्या. इतकें दुःख जरी त्यानें भोगलें, तरी तो गंगेंतच उभा होता. मग तो चांडाळयो-नींत जन्मला. त्याचें कटज हें नांव ठेविलें. पंचवीस वर्षेंपर्यंत नानाप्र-कारच्या हिंसा करून व वाटा मारून त्यानें द्रव्यार्जन केलें आणि कुटुंबाचा उत्तमप्रकारें निर्वाह चालविला. नंतर तेथें महामारी आली आणि त्याच्या कुटुंबाचीं सर्व मनुष्यें मरण पावलीं. तेव्हां त्यांच्या शोकानें तो विरक्त होऊन देशोदेशीं हिंडूं लागला. तो केरळ देशांत गेला, तेथील राजा मरण पावला होता व प्रधानादिकांनीं हत्तिणीच्या

सोंडेंत माळ देऊन ती हत्तीण ज्याला माळ घालील त्याला राजा करावा अशा हेतूनें तिला मोकळें सोडलें होतें. कंटजही ती मौज पहाण्यासाठं उभा होता; तों अकस्मात् हत्तिणीनें त्याच्याच गळ्यांत माळ घातली. ते त्यानें सहा वर्षे राज्य करून सगळा देश बाटविला. कित्येक आप सोयरेही केले. एके दिवशीं तो एकटाच बाहेर निघाला असतां प्रधाना दिक तो कोठें जातो ह्मणून त्याच्या मागून लपून चालले. कांहीं दू गेल्यावर त्या गांवचे अनामिक त्याला भेटले. त्यांनीं मद्य प्राशन के होतें. कंटज अकस्मात् दृष्टीस पडतांच त्यांनीं त्याला ओळखलें बोलूं लागले-अरे हा आमचा सोयरा! यानें राज्यावर बसून सगळे लोक बाटविले! त्यांचीं अशीं भाषणें ऐकतांच त्या कंटजानें त्यांल दाबलें आणि ह्मणाला-असें जर पुनः कोणाजवळ बोलाल, तर सग ळ्यांना सुळावर चढवीन. हीं भाषणें ऐकतांच प्रधानादिकांनीं त्य कंटजाला मारून बाहेर हांकून दिलें आणि शास्त्रार्थ काढून सर्वांन देहांत प्रायश्चित्त घेण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें सगळ्या गांवांतील सम जूतदार लोकांनीं अग्निप्रवेश केला. तेव्हां कंटजाला वाटलें कीं, आप ल्या हातून मोठें पातक झालें. त्यानेंही चितेंत प्रवेश केला; पण जेव्ह त्याच्या डाव्या अंगाला अग्नीच्या ज्वाळा लागल्या, तेव्हां त्यानें हा फोडून चिते बाहेर उडी मारली. त्याच्या अंगावर तरतरून फोड आले तों इकडे गाधि ब्राह्मण-ज्यानें गंगेंत बुडी मारली होती, त्यानें हें स स्वप्नाचे परी अनुभवून हांक फोडून डोकें वर काढिलें आणि प्रत्य प्रमाण वामांगाला फोड आलेले पाहून आपलें ब्राह्मण्य बुडालें अ शोक करूं लागला. तो ह्मणाला-मी अघमर्षणाकरितां गंगेंत बु मारून काय अनुभवलें हें? मी मेलों काय? यमानें गांजलें, चांड

योनींत जन्मलों, महापातकें आचरलों, राज्य केलें आणि एक देश भ्रष्ट केला. हें सर्व नाहीं ह्मणावें तर अंगावर फोड आलेले पीडा करीत आहेत व कृतकर्मांची स्मृति आहे. हाय हाय ! बुडालों मी. असा तो मायावर्तांत सांपडलेला ब्राह्मण शोकानें संध्या, अनुष्ठान, सर्व विसरला आणि चिंताग्रस्त होऊन शोक करींत परत आश्रमांत आला. त्याची स्त्री अंगावर फोड कशानें आले ह्मणून विचारूं लागली असतां; हें माझ्यानें सहन होत नाहीं ! असें ह्मणून शोक करूं लागला. कांहीं दिवसांनीं त्याचा गुरुबंधु तीर्थें करीत त्या ठिकाणीं आला व केरळ देशाचें राज्य सहावर्षें कंटज नामक अंत्यजानें केलें आणि तो सारा देश बाटविला. हल्लीं तेथें सर्व वाळकें राहतात. त्यांत मी अन्न घेतलें ह्मणून प्रायश्चित्तार्थ बारा वर्षें तीर्थयात्रा करीत आहें, असें सांगूं लागला. हें ऐकतांच गाधि मनांत चरकला आणि गुरुबंधूस निरोप देऊन स्वतः अनुभव पाहण्यासाठीं आधीं कंटज जन्मला होता तेथें व नंतर केरळ देशांत जाऊन सर्व खुणा पाहून मीच तो महार ! असें ह्मणून अपार शोक करूं लागला. तो आश्रमांत आला व कपाळ आपटून घेऊं लागला आणि तोंडानें मी गौतमशिष्य असतां माझी काय गति ही ! असें ह्मणून भ्रमला.

वसिष्ठ ह्मणतात–रामचंद्रा ! नंतर त्याच्या पूर्वपुण्याईनें त्याला भगवंताचें स्मरण झालें आणि हे इंदिरावरा ! हे वैकुंठनिवासी ! हे पतीतपावना ! हे जगद्गुरो ! धांव आतां; असा जेव्हां तो श्रीविष्णूचा धांवा करूं लागला, तेव्हां त्या ठिकाणीं विष्णु प्रकट झाले आणि त्याला हृदयाजवळ धरून ह्मणाले–पाहिलीस माझी माया ? तुला किंचित् दाखविली. ब्रह्मादिकांसही अतर्क्य, अशी माया जाणणारेही तिच्याच कृतीच्या आश्रयानें राहतात. तूं सर्व जाणता ह्मणवितोस, तर सांग

बरें माया सत्य आहे कीं असत्य आहे ? असें ऐकतांच गाधि ह्मणाला भगवंता ! आतां मला मुक्त कर. तेव्हां भगवंतानें त्याला आत्मबो करून त्याचा उद्धार केला.

याप्रमाणें इतिहास ऐकल्यावर राम ह्मणतात–माया कोठून उत्पन्न झाली ? स्वरूप जर निर्विकार व निर्गुण आहे, तर तेथें स्फुरण क झालें ? पिंडब्रह्मांड, नाना वर्ण, याति, ही सर्व मायेची करणी ज मिथ्या आहे, तर अनामिकांस नाम व निर्गुणास सगुणत्व येण्याचें कारण काय ? असें ऐकतांच वसिष्ठ आनंदानें मान डोलवून ह्मणाले हे चैतन्यघनरामचंद्रा ! तूं जाणून मला प्रश्न करितोस; तर तुझेंच ज्ञा तुला सांगतों ऐक–कोणी पुरुष निद्रेंतून जागृत होतो व जसें त्याला कांहीं कार्य आठवतें; अथवा समुद्रांत जशा अकस्मात् लहरी उत्पन्न होतात; त्याप्रमाणें सर्व ब्रह्मानंद असतां चिदाकाशीं "मी ब्रह्म" असा नाद उत्पन्न झाला, ती जी ध्वनि तीच माया; असें वेदांतशास्त्र गर्जना करीत आहे. तिचें नांव मूळप्रकृति. तिलाच आदिपुरुषाची चिच्छक्ति ह्मणतात. तिनें पतीला शेजेवर निजवून हें सृष्टिकार्य आरंभिलें. तिनेंच हें ब्रह्मांड उत्पन्न केलें. विधि, विष्णु आणि ईशान हीं तिन्हीं बाळकें तिच्या आज्ञेंत आहेत; परंतु त्यांनाही ती डोळे उघडून चित्स्वरूपाकडे पाहूं देत नाहीं. हें सर्व जीव ब्रह्मसुखाच्या समुद्रांत बुडालेले आहेत; परंतु माया कोणालाही किंचित् गोडी लागूं देत नाहीं. त्या मायेनेंच चैतन्याला झांकलें व अरूप होतें तें रूपास आणलें. तिनेंच निर्गुणाला गुण व निराकाराला आकार दिला आणि अनाम होतें त्याला नांव ठेवून जीवित्वाला आणलें. ती महापतिव्रता ! पतीस नकळतां गरोदर झाली आणि हें नानायाति व नानाविकारांनी युक्त ब्रह्मांड प्रसवली.

ोणी जर स्वरूपाकडे मुरडला, तर त्याजवर विनाकारण संकटें उद्भविते किंवा त्याला स्वर्गसुखाची गोडी लाविते. जिनें आत्मानंदाची गोडी दडवून जीवाला विषयरूप मोहभ्रमाची गोडी लाविली आहे, तिच्या इच्छेनें सत्व, रज आणि तम हे तीन गुण उत्पन्न झाले; तेच विष्णु, ब्रह्मदेव आणि शिव. तिनेंच पंचतत्वें उत्पन्न केलीं आणि त्यांचें पंचीकरण करून ह्या जगाची उत्पत्ति केली. पांचांचीं पंचवीस तत्वें करून ही ब्रह्मांडपेंठ जेव्हां तिनें देवीला निर्माण करून दिली; तेव्हां त्यानें चौऱ्यांशीं लक्ष योनी व चार याति निर्माण केल्या. विष्णु भक्तपालनासाठीं दशावतारांच्या चक्रावर बसून पालन करूं लागला आणि सृष्टींत अनेक दोष झाले ह्मणजे तो तमोरूपी पार्वतीरमण तिचा संहारही करूं लागला. विराटरूप जें ह्मणतात, तो शिवाचा स्थूल देह होय. विराटाचें पादतल जें तेंच पाताळ. त्याच्या कटिपर्यंत सप्तपाताळें आहेत. उदरस्थ पोकळी जी, तेंच आकाश. त्याचा जो जठराग्नि तोच वडवानळ. ही भूमी विराटाचा कटिप्रदेश होय. त्याच्या गुह्यस्थानीं नैर्ऋत्य लोक आहे. त्याच्या शिस्नाच्या ठिकाणीं दक्षप्रजापतीचा लोक. विराटाच्या उदरांत सप्त समुद्र आहेत. जें ज्योतिर्लिंग, तें त्याचें वक्षस्थल होय. कंठीं महर्लोक वदनीं जनलोक आणि जिव्हा तोच वरुणलोक जाणावा. त्याच्या दाढा तोच यमलोक; अश्विनौदेव त्याच्या घ्राणांत आहेत. भ्रुकुटिस्थानीं भूलोक व कपाळीं तपोलोक आणि मस्तक तेंच ब्रह्मभुवन, असेंही शास्त्रांचें मत आहे. सूर्य विराटाचे नेत्रीं आहे, ह्मणून तो ब्रह्मांड प्रकाशित करितो. विराटानें नेत्र उघडले ह्मणजे दिवस आणि मिटले ह्मणजे रात्र. त्याच्या उभय हातांत अमरेश राहून सर्व कर्तव्यकर्म करितो. चंद्रमा त्या पुरुषाचें मन होय. सर्व वनस्पति त्याच्या रो-

गावळी आहेत. त्याच्या नाडिस्थानीं गंगा असून पृष्ठभागीं अधोगं आहे. मेरुपर्वत विराटाचें मस्तक, पाषाण ह्याच अस्थि, दहिवर मूत्र व पर्जं रेत होय. दुर्भिक्ष तीं त्याची क्षुधा व अनावृष्टि त्याची तृषा जाणावी. त्या आळस आला ह्मणजे सीतकाळ होतो; निद्रा आली ह्मणजे पर्जं पडतो आणि त्याचें मैथुन तोच उष्णकाळ वृष्टि होण्यासाठीं तापवित झंझाट वायु तें त्याचें धांवणें, त्यानें वायूचें स्तंभन व निरोधन के ह्मणजे उकाडा होतो व तो पूर्णकाम झाला ह्मणजे वृष्टि होते. अस आतां थोडक्यांत सांगतोः—त्याचें अंतःकरण तोच विष्णु, मन चं ब्रह्मा बुद्धि आणि चित्त नारायण जाणावा. देव आणि दैत्य, त्या मुख्य प्राण, दिशा कर्ण आणि वायु त्वचा होय. ज्याच्या वदनीं अ आहे, असा तो विराट् पुरुष सप्तार्णवमय आहे. भूगोलावर त्याच दशगुण जळ पसरलें आहे. उदकाच्या दसपट अग्नि व त्याच्याही द गुण अधिक वायूचें आवरण आहे. वायूच्या दसपट आका आहे व त्या आकाशाच्या दशगुण अहंकारानें त्याला वेष्टिलें आ अहंकाराहून दशगुण महत्तत्व आहे; पण त्यावर त्याच्या दशगुण माय आवरण आहे व त्याच्या पलीकडे जें उरलें तें स्वरूप तें इतकें तित किंवा लहान थोर नाहीं. त्याला व्यक्ति वर्ण नाहीं. वसिष्ठ ह्मणतात रामा! हा तुला खटाटोप सांगितला; आतां याचा शेवट ऐक. वेदश स्त्रादिकांनीं पांच प्रळय वर्णिले आहेत. पिंडीं नित्य प्रळय आहे; जि निद्रा ह्मणतात. तत्त्वांसह स्थूल व लिंगदेह निद्रार्णवीं मग्न होतो. मह प्रळय ह्मणजे मरण, सर्व लोक पाहतात; त्यामुळें स्थूल देहाचा ना होतो. तिसरा ब्रह्मप्रळय चार युगें हजार वेळ गेलीं ह्मणजे ब्रह्मदेवा एक दिवस होतो व त्याला निद्रा लागली ह्मणजे सृष्टिक्रम राहत

त्यावेळेस जलमय होऊन या सृष्टीचा संहार होतो. बत्तीस लक्ष गांवें पाणी चढल्यामुळें हें ब्रह्मांड बुडतें. त्यावेळीं वटपत्रशायी भगवंताच्या नाभिस्थानीं ब्रह्मा निद्रिस्थ असतो. सप्त चिरंजीव बुडतात व सत्यलोकापर्यंत पाणी जाऊन आदळतें. तेव्हां तो कमलोद्भव• जागृत होतो. जल आटतें व यथापूर्व सृष्टिक्रम चालतो असें वेद बोलतात. आतां महाप्रलय सांगतोः—पहिल्यानें हजार वर्षे पर्जन्य न पडल्यामुळें जीवसृष्टीचा संहार होईल नंतर द्वादश मित्र उदय पावतील व वडवानल प्रदीप्त होऊन हें ब्रह्मांड सप्तपाताळांसह जाळील. सप्तस्वर्गही जळतील. नंतर शंभर हजार वर्षेपर्यंत हत्तीच्या सोंडेसारख्या पर्जन्याच्या धारा पडून जशी पाण्यांत चुनकळी विरघळते, तसें हें जग विरघळून जाईल. मग अट्टन वायूला एका क्षणांत आकाश गिळील. त्या आकाशाचा ग्रास तमोगुण करील तमाला रजोगुण ग्रासील आणि रजोगुण सत्वांत लीन होईल. सत्वास महत्तत्त्व गिळून मायेंत मिळेल आणि माया स्वरूपीं लीन होईल. हा क्रम घटीयंत्राप्रमाणें चालणार आहे. ज्या स्वरूपांत माया लीन होईल असें सांगितलें, तेंच जीवाचें स्वरूप. त्या स्वरूपीं जें समाधान आहे, तें बोलतांना वेदशास्त्रेंही मुकीं झालीं आहेत. तेंच तुझें स्वरूप! रामा हें सर्व जग तूं नटला आहेस. तूं सच्चिदानंद परमात्मा सर्वसाक्षि व सर्वांतर्यामी आहेस. ब्रह्मा विष्णु, महेश, हेही चित्स्वरूपीं मिळणार. तरी जें निर्विकार स्वरूप—अच्छेद्य, अभेद्य, अरूप, तें तूं आहेस रामा.

याप्रमाणें स्वरूपनिर्धार होत असतां रामचंद्रानें डोळे झांकले आणि तो ब्रह्मानंदीं लीन झाला; त्याची समाधी लागली! त्याचप्रमाणें वसिष्ठही आत्मानात्मविचाराच्या आनंदांत डोलत बसले. रामचंद्राची शक्ति विराली आणि तो स्वस्वरूपीं अठरा दिवस पर्यंत विश्रांति पावला.

गुरु व शिष्य यांची एक स्थिति पाहून दशरथ आणि विश्वामित्र यांस भय पडलें व हा ईश्वर येथेंच अवतार संपवितो कीं काय? असेंही वाटलें. वसिष्ठाची ज्ञानलहर जिरली तरी राम समाधिस्थच होता. तेव्हां विश्वामित्रानें त्याला ( वसिष्ठाला ) सांगितलें कीं, राम निर्विकार होऊन अवतारचरित्र विसरला आहे, त्याला शुद्धीवर आणावें. असें ऐकतांच वसिष्ठानीं रामाला शुद्धीवर आणलें आणि पुढील कार्याची स्मृति दिली, तेव्हां गुरूला नमस्कार व तीन प्रदक्षिणा करून राम लक्ष्मणासह दिव्य रथांत बसून कौशिकाबरोबर सिद्धाश्रमास निघाला. दशरथ व वसिष्ठ त्यांस गंगा तीरापर्यंत पोंचवीत गेले. मार्गांत जे शुभ शकुन झाले त्यांचा अर्थ वसिष्ठांनीं दशरथाला असा सांगितला कीं, राम विजयश्रीसह आनंदगजरानें लौकरच अयोध्येस येईल.

---

अध्याय ७ वा.



# अध्याय ७ वा.

भागीरथीतीर येतांच कौशिक व रामलक्ष्मण, यांनीं स्नानानुष्ठानें केलीं. नंतर कौशिकानें रामास व लक्ष्मणास सांग धनुर्विद्येचा उपदेश केला. त्या वेळेस मूर्तिमंत शस्त्रदेवता रामास शरण आल्या व त्याच्या अंकित झाल्या. नंतर रामाचें मन पाहण्यासाठीं कौशिक ह्मणाला—या मार्गानें जे सिद्धाश्रमास गेले, त्यांस ताटिकेनें भक्षण केलें; ह्मणून या मार्गाचें मला फार भय वाटतें. असें ऐकतांच राम ह्मणाला—स्वामी ! आपली दया आहे तर काळालाही चिरून टाकीन, मग ताटिकेची काय गणना आहे ? असें ऐकतांच विश्वामित्र दोघांसह रथांत बसून ताटिकेच्याच त्या भयंकर व घोर अरण्यांतून चालला आणि रामास पुनः ह्मणाला—हें त्या ताटिकेचेंच अरण्य. आतां ती मनुष्याचा वास काढीत येईल. इतकें तो बोलला मात्र; तों जिला उन्मत्त दहाहजार हत्तींचें बळ, जी उदरांत पर्वत सांठविणारी, शतांचे शत गो, द्विज आणि गज एकदांच दाढेखालीं घालून रगडणारी, कुंभकर्णाची बहीण ताटिका, तिनें भयंकर गर्जना केली. ती ऐकतांच विश्वामित्र लटलट कांपूं लागला. इतक्यांत रक्तानें माखलेली, आपाद नरशिरांच्या माळा घातलेली, कपाळीं शिंदूर, बाबरझोंटी मोकळ्या, अशी ताटिका बारा गांवें तोंड पसरून बरोबर अपार राक्षससैन्य घेऊन त्या ठिकाणीं धांवत आली. तरी वृक्षांच्या गर्दींत त्यांला स्पष्ट दिसेना. इतक्यांत विश्वामित्रानें रामाला हीच ती ताटिका, अशी सूचना करितांच रामानें धनुष्यावर एक बाण लावून सोडला आणि त्या वृक्षासहित ताटिकेचा अपार राक्षसींसह संहार केला. त्या अंतकाळीं तिनें जो शब्द केला, त्यामुळें ब्रह्मांड गजबजलें. तरी

गुरु व शिष्य यांची एक स्थिति पाहून दशरथ आणि विश्वामित्र यां भय पडलें व हा ईश्वर येथेंच अवतार संपवितो कीं काय? असेंही वाटे वसिष्ठाची ज्ञानलहर जिरली तरी राम समाधिस्थच होता. तेव्हां विश्व मित्रानें त्याला ( वसिष्ठाला ) सांगितलें कीं, राम निर्विकार होऊन अ तारचरित्र विसरला आहे, त्याला शुद्धीवर आणावें. असें ऐकतांच वसि ष्ठानीं रामाला शुद्धीवर आणलें आणि पुढील कार्याची स्मृति दिल तेव्हां गुरूला नमस्कार व तीन प्रदक्षिणा करून राम लक्ष्मणासह दि० रथांत बसून कौशिकाबरोबर सिद्धाश्रमास निघाला. दशरथ व वसि त्यांस गंगा तीरापर्यंत पोंचवीत गेले. मार्गांत जे शुभ शकुन झा त्यांचा अर्थ वसिष्ठांनीं दशरथाला असा सांगितला कीं, राम विजयश्री सह आनंदगजरानें लौकरच अयोध्येस येईल.


ऋषि
राम
ल
अहल्या

# अध्याय ७ वा.

भागीरथीतीर येतांच कौशिक व रामलक्ष्मण, यांनीं स्नानानुष्ठानें केलीं. नंतर कौशिकानें रामास व लक्ष्मणास सांग धनुर्विद्येचा उपदेश केला. त्या वेळेस मूर्तिमंत शस्त्रदेवता रामास शरण आल्या व त्याच्या अंकित झाल्या. नंतर रामाचें मन पाहण्यासाठीं कौशिक ह्मणाला—या मार्गानें जे सिद्धाश्रमास गेले, त्यांस ताटिकेनें भक्षण केलें; ह्मणून या मार्गाचें मला फार भय वाटतें. असें ऐकतांच राम ह्मणाला—स्वामी! आपली दया आहे तर काळालाही चिरून टाकीन, मग ताटिकेची काय गणना आहे? असें ऐकतांच विश्वामित्र दोघांसह रथांत बसून ताटिकेच्याच त्या भयंकर व घोर अरण्यांतून चालला आणि रामास पुनः ह्मणाला—हें त्या ताटिकेचेंच अरण्य. आतां ती मनुष्याचा वास काढीत येईल. इतकें तो बोलला मात्र; तों जिला उन्मत्त दहाहजार हत्तींचें बळ, जी उदरांत पर्वत सांठविणारी, शतांचे शत गो, द्विज आणि गज एकदांच दाढेखालीं घालून रगडणारी, कुंभकर्णाची बहीण ताटिका, तिनें भयंकर गर्जना केली. ती ऐकतांच विश्वामित्र लटलट कांपूं लागला. इतक्यांत रक्तानें माखलेली, आपाद नरशिरांच्या माळा घातलेली, कपाळीं शेंदूर, बावरझोंटी मोकळ्या, अशी ताटिका बारा गांवें तोंड पसरून बरोबर अपार राक्षससैन्य घेऊन त्या ठिकाणीं धांवत आली. तरी वृक्षांच्या गर्दींत त्यांला स्पष्ट दिसेना. इतक्यांत विश्वामित्रानें रामाला हीच ती ताटिका, अशी सूचना करितांच रामानें धनुष्यावर एक बाण लावून सोडला आणि त्या वृक्षासहित ताटिकेचा अपार राक्षसीसह संहार केला. त्या अंतकाळीं तिनें जो शब्द केला, त्यामुळें ब्रह्मांड गजबजलें. तरी

राम विजयी झाला ह्मणून देवांनीं पुष्पवृष्टि केली. विश्वामित्रानें रामा प्रेमालिंगन दिलें. नंतर तो चापपाणी राम विश्वामित्रासह सिद्धाश्रमा आला. जसा वर्षाकाळीं पूर येतो, तसे चोहोंकडून ऋषेश्वर रामदर्शनासाठीं आले.' नंतर विश्वामित्रानें कुंड, वेदिका, यज्ञमंडप, शास्त्रप्रमाणाप्रमाणें तयार करून यज्ञाला आरंभ केला.

ताटिकेचा संहार झाला हें ऐकून अपार राक्षससेनेसह सुबाहु मारीच येऊन प्रळय करूं लागले आणि हे दोघेच यज्ञाचें रक्षण करणार? असें सर्व ऋषींला वाटूं लागलें. तेव्हां रामानें अनंतरूपें त्यांस दाखविलीं आणि बाण सोडून राक्षसशिरांच्या लाखोल्या भूदेवींवर वाहिल्या. नंतर एक निर्वाण बाण सोडून सुबाहूचा वध केला आणि त्या बाणाच्या पिसाऱ्याच्या वायूनें मारीच जो आकाशांत उडाला, तो समुद्रांत पडला. नंतर त्याला राम पाठीस लागल्याचें वेड लागलें व लंकेंत धांवत जाऊन त्यानें तें वर्तमान रावणाला सांगितलें; त्यामुळें रावणही मनांत घाबरला.

यज्ञाचें अनंत राक्षसांच्या तडाख्यांतून रक्षण झालें इतकेंच नव्हे, पण सगळे रजनीचर मरण पावले, असें पाहून ऋषींनीं निर्भय होऊन यज्ञकर्म समाप्तीस पोंचविलें. तों मिथिलेश्वरानें विश्वामित्राला पत्र पाठविलें कीं, सर्व ऋषींसह आपण जानकीस्वयंवरोत्सव पाहण्यासाठीं यावें. विश्वामित्रानें तें पत्र वाचलें, तरी त्याच दिवशीं यज्ञ समाप्त झाल्यामुळें पत्राविषयीं विचार न करितां ब्राह्मणभोजन, दक्षिणा व वस्त्रालंकारांनीं गौरव करणें, यांतच त्याचा दिवस संपला आणि रात्रीं रामलक्ष्मणांस पुढें घेऊन त्यानें शयन केलें.'

मध्यान्हरात्रीनंतर ऋषीस निद्रा लागल्यावर रामलक्ष्मण जागृत झाले आणि आपसांत बोलूं लागले, राम ह्मणाला-मी पियपित्याला केव्हां भेटेन असें मला झालें आहे. माता कौसल्या आपल्या स्मरणानें दुःखी होत असेल. हे शब्द विश्वामित्राच्या कानीं पडतांच त्यानें उठून रामाला हृदयाजवळ धरिलें आणि सांगितलें-जनकाकडून पत्र आलें आहे. उद्यां आपण मिथिलेस जाऊं. तेथेंच तुला दशरथराजा व कौसल्या भेटेल आणि सीताही तुलाच माळ घालील.

दुसऱ्या दिवशीं सूर्योदय होतांच सर्व ऋषींनीं आन्हिक कर्मं आटपलीं आणि रामसौमित्रासह सर्व मिथिलेच्या मार्गानें चालूं लागले ऋषि पायांनीं चालतात ह्मणून रामलक्ष्मणही त्यादिवशीं पादचारीच होते. मार्गांत प्रत्येक ऋषि रामाला आपला आश्रम दाखवून त्याची पूजा व सत्कार करीत असे. राम प्रत्येक ठिकाणीं रमत रमत सर्वांचा उद्धार करीत चालला असतां मार्गांत एक चंडशिळा पडली होती, त्या शिळेवर रामाची पायधूळ उडतांच ती स्त्रीरूप पावली. तो अद्भुत चमत्कार पाहतांच राम विश्वामित्रास ती कोण ? ह्मणून विचारूं लागला; तेव्हां विश्वामित्रानें सांगितलें-रामा ! ही अहल्या परमपवित्रा ब्रह्मकन्या व गौतमपत्नी होय. ही पतिशापानें शिलात्व पावली होती. रामानें विचारिलें-अहल्या कोणत्या कारणानें शिळा झाली, तिला पतीचा शाप होण्याचें कारण काय ? असें ऐकतांच विश्वामित्र सांगतो-

विधीने ब्रह्मांडाची रचना केली, पण त्यांत अहल्येची प्रतिमा कुठी नव्हती. सर्वांहून ती जेव्हां रूपवती झाली, तेव्हां तिला मागण्यासाठीं अनेक वर येऊं लागले. शेवटीं ब्रह्मदेवानें तिचें स्वयंवर

आरंभिलें आणि पण केला कीं, दोन प्रहरांत पृथ्वीप्रदक्षिणा करून जो सर्वांच्या पुढें येईल, त्याला मी आपली कन्या देईन. असें ऐकतांच देव, ऋषि, यक्ष, गंधर्व इत्यादि सर्व आपापल्या वाहनांवर बसून पृथ्वीप्रदक्षिणा लौकर व्हावी ह्मणून धांवूं लागले; त्यांत सर्वां-पुढें अमरेश होता.

त्याच दिवशीं गौतममुनि गंगेंत स्नान करून बाहेर येत असतां त्यानें द्विमुख कपिला पाहिली आणि गायत्रीजप करून तिला तीन प्रदक्षिणा केल्या व सावकाश अनुष्ठान आटोपून तो सत्यलोकीं गेला. ब्रह्मदेवानें त्याला पाहतांच कन्येचें भाग्य धन्य मानून विवाहविधीनें ती त्याला अर्पण केली. त्यांचें पाणिग्रहण झाल्यावर इंद्र त्या ठिकाणीं आला आणि वधुवरांस पाहून संतापला. नंतर तो सत्यलोकनाथास ह्मणाला—तूं असत्यनाथ आहेस; ह्मणून वृद्धाला कन्या दिलीस. असें बोलून त्यानें एकवेळ तरी अहल्येला भोगीन. याप्रमाणें मनांत निश्चय केला आणि रागानें तो आपल्या ठिकाणीं निघून गेला. गौतमही अहल्येसह आपल्या आश्रमांत आला. नंतर अहल्येसाठीं टपत बस-लेला इंद्र, एके दिवशीं सूर्यग्रहणाची वेळ झाली ह्मणून गौतम गंगातीरावर स्नानाला गेला असतां त्याचेंच रूप धरून आश्रमांत आला. ती निष्कपटी अहल्या आश्रमांत एकटीच होती. यानें बाहेरून तिला हांक मारितांच तिनें दार उघडलें, तों त्यानें घाबरून भूमीवर अंग टाकिलें, तेव्हां त्या महासतीनें त्याला शय्येवर नेऊन निजविलें आणि काय झालें? असा प्रश्न केला; पण जेव्हां तो अंगसंग मागूं लागला, तेव्हां दिवस, ग्रहण, इत्यादि अनेक अडथळे तिनें पुढें आणले. तरी माझें वचन तुला प्रमाण आहेना? असें तो तिला उलट विचारूं लागला.

त्यावेळीं निरुपाय होऊन ती त्याच्या शयनस्थानीं गेली व हाच आपल्या पति असें मानून त्याच्याशीं रमली. इतक्यांत स्नानानुष्ठान केलेला गौतम आश्रमीं आला आणि दार उघड ह्मणून अहल्येला हांक मारूं लागला पतीची हांक ऐकतांच तिनें वस्त्र सांवरलें आणि तूं कोण रे दुर्जन ? असें इंद्राला विचारूं लागली. त्यानें मी इंद्र आहें. असें सांगतांच तुझी रति झाली, तूं जा. असें ह्मणून तिनें भीतभीत गौतमाला दार उघडलें. ऋषीनें ज्ञानेंकरून सगळें जाणलें होतेंच. आंत येतांच त्यानें परद्वार पाहणाऱ्या इंद्राला शाप दिला कीं, तुझ्या अंगावर सहस्र भगें पडतील व तूं नपुंसक होऊन वागशील. अहल्या काळवंडून थरथर कांपत होतीच इंद्र पळून गेल्यावर ऋषीनें तिलाही साठ हजार वर्षें शिळा हो असा शाप दिला. तेव्हां ती त्याच्या चरणीं लागली व हें पाप अज्ञानानें घडलें आहे असें ह्मणूं लागली. तेव्हां ऋषि ह्मणाला—न जाणून जर पाप घडलें, तर रति होतांच तूं येथून जा असें त्याला कां ह्मणालीस ? या प्रश्नाला ती जरी निरुत्तर झाली, तरी उःशाप मागूं लागली. तेव्हां दयेनें त्याचें मन द्रवलें आणि त्यानें तिला सांगितलें—पुढें सूर्यकुलांत नारायण अवतार घेईल त्याच्या पदरजांनीं तुझा उद्धार होईल. इतकें तो बोलला मात्र, इतक्यांत अहल्या चंडशिळा होऊन पडली. तेव्हां तिच्या वियोगानें दुःखित झालेल्या गौतमानें ह्या शिळेला जो स्पर्श करील तो मरण पावेल, असा पुनः शाप दिला आणि मार्ग धरिला. तेव्हांपासून ऋषीच्या शापभयानें या अरण्यांतून पशु, पक्षी इत्यादि सर्व निघून गेले. गौतम खेद करीत बदरिकाश्रमीं जात असतां ह्मणाला—इंद्राला कामानें नाडलें आणि मला क्रोधानें नागविलें. दोघांना शाप दिल्यामुळें तपाचा क्षय झाला ! असें बोलून तो अनुष्ठान करीत बसला.

इकडे अनुताप पावलेल्या सहस्रभगांकित इंद्र मयूराचें रूप धरून अरण्यांत हिंडत होता, त्याला सर्व देवांनीं मिळून पुनः गौतमाकडे आणलें आणि त्याचें अनेक प्रकारें शांतवन करून इंद्रासाठीं उःशाप मागूं लागले. तेव्हां प्रसन्नचित्त गौतमानें इंद्राला तूं सहस्र नयनमंडित हो, असा उःशाप दिला; तो मिळतांच इंद्र आपल्या ठिकाणीं गेला. अहल्या तेव्हांपासून जी शिळा होऊन पडली होती, ती आज तुझ्या पदरजसंघट्टनानें उद्धार पावली.

याप्रमाणें अपूर्व चरित्र ऐकून राम आश्चर्य करीत विश्वामित्रास ह्मणाला—मी अशी काय पुण्याई केली आहे! ह्मणून माझ्या पायधुळीनें पाषाण उद्धरतात! विश्वामित्रानें सांगितलें—तो तुझा नव्हे तुझ्या पायधुळीचा महिमा आहे. इतकें ते बोलत आहेत तों दिव्यरूप पावलेली अहल्या येऊन रामाच्या चरणांवर पडली. तरी ब्राह्मणपत्नी वंद्य मानणाऱ्या दाशरथीनें माते! ऊठ असें बोलून जेव्हां तिला उठविलें, तेव्हां ती कोकिळेसारखा मधुर पंचम स्वरांत प्रभु रामचंद्राचें स्तवन करूं लागली. इतक्यांत गौतमानें ज्ञानदृष्टीनें पाहिलें तों आपल्या स्त्रीचा उद्धार झाला आहे. तो धांवतच त्याठिकाणीं आला. रामचंद्रानें त्याला पाहतांच साष्टांग नमस्कारपूर्वक त्याची पूजा केली. नंतर सर्व ऋषींनीं मिळून अहल्या व गौतम यांचें पुनः ऐक्य केलें. अहल्येनें व गौतमानें रामाला आशीर्वाद दिला कीं, जानकी तुला वरील व तूं रावणाला मारून देवांस संतोषविशील. दोघांनींही सर्व ऋषींसह रामाला आपल्या आश्रमांत नेऊन त्याची पूजा केली.

नंतर सर्व ऋषींसह विश्वामित्र रामलक्ष्मणाला बरोबर घेऊन मिथिलेच्या जवळच एका बागेंत जाऊन राहिला; तों शहरांतून वदंता आली

की, जो त्र्यंबकचापाला गुण लावील, त्याला जानकी वरील. ही बातमी ऐकतांच रामानें विश्वामित्राला विचारिलें—जानकीचा जन्म कसा झाला? आणि तिच्या ह्या स्वयंवरांत त्र्यंबकचापारोपणाचा पण लावण्याचें कारण काय? असें ऐकतांच विश्वामित्रऋषि रामाला सांगतातः—

पूर्वी पद्माक्ष नामक राजा होता. त्यानें तप करून लक्ष्मीला प्रसन्न करून घेतलें आणि असा वर मागितला कीं, देवी! तूं माझी कन्या होऊन माझ्या मांडीवर खेळ. लक्ष्मी ह्मणाली—राजा! मी, तुझ्या पोटीं आलें तर तुझें कल्याण होणार नाहीं, दुसरें कांहीं माग. राजा ह्मणाला—माझा त्यांत सर्वस्वी नाश झाला तरी पुरवला; पण तूं माझी कन्या हो असें ऐकतांच ती ह्मणाली—मी श्रीविष्णूच्या आधीन आहें. त्यांची आराधना करून हा वर माग. असें ऐकतांच त्यानें नारायणाची उपासना केली आणि मागून घेतलें कीं, लक्ष्मी माझी कन्या असो. श्रीविष्णूनीं स्मितवदन करून त्याला एक मातुलिंग (महाळुंग) दिलें, तें त्यानें घरांत आणून नवमास ठेवतांच त्यांतून एक कन्यारत्न उत्पन्न झालें. त्या कन्येचें असंभाव्य तेज! अति रूपवती आणि स्वाभाविक सर्वगुणसंपन्न अशी ती पद्माक्षी. राजा लालन पालन करीत असतां जेव्हां उपवर झाली, तेव्हां तिच्या सौंदर्याची कीर्ति ऐकून सगळ्या पृथ्वींतील राजे, ऋषि, देव, यक्ष, गंधर्व, सिद्ध, चारण आणि विद्याधर तिला मागण्यासाठीं आले आणि राजाला सांगूं लागले कीं, कांहीं पण कर. तेव्हां पद्माक्षराजाला कोप आला आणि तो सर्वांस ह्मणाला—ज्याची आकाशासारखी कांति असेल, त्याला मी आपली कन्या देईन. असें ऐकतांच सर्वांस कोप आला आणि ते राजाबरोबर युद्ध करूं लागले. सर्वांबरोबर पद्माक्ष राजा एकटा सात दिवसपर्यंत लढला व आठव्या

दिवशीं सर्वांच्या हातून तो मारला गेला, तेव्हां ते सर्व शहरांत शिरले व लुटूं लागले. हें वर्तमान ऐकतांच पद्माक्षी अग्निकुंडांत गुप्त झाली. राजे व इतर लोकही तिला शोधित होते; पण जेव्हां ती सांपडेना, तेव्हां ग्रामाचा विध्वंस करून त्याला आग लावून ते चालते झाले.

एकेदिवशीं रावण विमानांत बसून जात असतां ब्रह्मारण्यांत ती कन्या सहज अग्निकुंडाबाहेर निघालेली त्याच्या दृष्टीस पडली. तिच्या सौंदर्यावर लुब्ध होऊन त्यानें तिजवर तत्क्षणीं झडप घातली; पण ती त्यात्र अग्निकुंडांत पुनः गुप्त झाली. तेव्हां रावणानें तें कुंड विझवून खणलें, तों त्यांत पांच रत्नें सांपडलीं. तीं त्यानें एका पेटींत ठेवून लं- केस आणलीं व मंदोदरीच्या महालांत ठेविलीं.

एकेदिवशीं मंदोदरीसह रावण एकांतांत असतां रावणानें तिला सां- गितलें—त्या पेटींत अमूल्य रत्नें आहेत, तीं पाहण्याची इच्छा असेल तर पेटी इकडे आण. असें ऐकतांच मंदोदरी ती पेटी उचलण्यासाठीं गेली, पण ती तिला हालेना. तेव्हां हंसून रावण गेला; परंतु त्यानें वीस हात लावले तरी त्यालाही ती पेटी हालेना. शेवटीं प्रधान आणि मंदोदरी यांनीं ती पेटी उघडली, तों आंत षण्मासांचें कन्यारत्न! रावण ती कन्या पाहतांच संतोष पावला; पण मंदोदरी ह्मणाली—प्राणनाथ! आपण हें विनाकारण विघ्न घरांत आणलें आहे. जो मायावरणावेगळा चैतन्यघन असेल त्यालाच ही वरील. हिनें पद्माक्षाचा कुलक्षय केला. तसेच कित्येक राजेही संहारिले आहेत. ही येथें राहिली तर लंकानगरी उरणार नाहीं, तर आधीं हिला लंकेच्या बाहेर काढा. असें ऐकतांच रावणानें ती पेटी तशीच बंद केली आणि सेवकांच्या मस्तकावर देऊन न्या ह्मणून सांगितलें; तों पेटी उचलतां उचलतां तिच्यांतून शब्द निघाला कीं,

रावणाचा सहपरिवार संहार करण्यासाठीं मी आणखीं एक वेळ या लंकानगरींत येईन. हे शब्द ऐकतांच रावण मनांत दचकला आणि आतांच या पोरीला ठार मारितों असें ह्मणूं लागला. तेव्हां मंदोदरीनें त्याचे हात धरून विनविलें कीं, कृपा करा, मुद्दाम उद्यांचें मरण आजच येईल असें करूं नका. असो. सर्वांनीं मिळून रावणाला शांत केल्यावर त्यानें द्वेषानें मुद्दाम ती पेटी मिथिलानगरासन्निध एका शेतांत नेऊन पुरली.

पद्माक्षराजा जो मरण पावला होता, तो ब्राह्मणाच्या पोटीं येऊन मिथिलेंतच राहिला होता. कांहीं कालानंतर जनकराजानें त्याला तेंच शेत दान दिलें आणि जेव्हां तो ब्राह्मण शेत नांगरूं लागला, तेव्हां ती पेटी नांगराच्या दांताला लागली. त्या सन्मार्गी ब्राह्मणानें पेटी दृष्टीस पडतांच उचलून राजाकडे नेली आणि ह्मणाला–जनका ! हें आपलें ठेवणें घे. असें ऐकतांच राजानें ती पेटी उघडली तों आंत पांच वर्षांची सुरूप व सतेज कन्या ! तिला पाहतांच जनकाला मोह उत्पन्न झाला व त्यानें त्या ब्राह्मणापासून ती कन्या मागून घेतली आणि स्नेहानें तिचें पालन केलें. ती जनकात्मजा सीता सौंदर्याचें केवळ माहेरघर ! शुक्लचंद्रकलेप्रमाणें जों जों वाढूं लागली, तों तों जनकाला समाधान वाटूं लागलें. तोही प्रत्यक्ष लक्ष्मीच आहे असें मानूं लागला.

एकेदिवशीं सहज फिरतां फिरतां ज्यानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिया केली, तो परशुराम हातांत त्र्यंबकचाप घेऊन जनकराजाकडे आला असतां; राजानें त्याची पूजा केली आणि प्रार्थना करून भोजनासाठीं त्यास घरांत घेऊन गेला. ते भोजनास बसल्यावर जानकीनें ओटीवर त्र्यंबकचाप होतें, त्याचा सहज लीलेनें घोडा केला आणि ती खेळत

खेळत तें धनुष्य घेऊन दाराबाहेर गेली; इतक्यांत परशुराम भोजन करून आला व धनुष्य न पाहिल्यामुळें कोपून जनकाला ह्मणाला-जें प्रमत्तगजांलाही न हालणारें, तें धनुष्य नेण्याला मनुष्याला शक्ति कोठून आली ? असा तो कोण मनुष्य असावा ? असें एकतांच जनक परशुरामाला घेऊन सहज बाहेर आला. तों सीता चापाचा घोडा करून त्याला झ्यांझ्यां ह्मणून धांवत आहे. तिनें पित्याला पाहतांच संकोचानें चाप टाकून पळ काढिला; पण शिवधनुष्य जें त्या ठिकाणीं पडलें, तें कोणालाही उचलेना ! तेव्हां जनकानें पुनः त्या सीतेला फुसलावून त्या धनुष्याचा घोडा करविला आणि जागच्या जागीं आणून ठेवविलें. तें कृत्य पाहून परशुराम जनकास ह्मणाले-आतां आमचें अवतारकृत्य संपलें. तर हें शिवधनुष्य येथेंच राहूंद्या. जो याला गुण लावील, तोच या तुझ्या सीतेच्या पाणिग्रहणास योग्य होईल. असें बोलून परशुराम बदरिकाश्रमीं गेले. विश्वामित्र ह्मणतात-रामा ! तूं सर्वज्ञ असतां प्रश्न केलास ह्मणून हें सीतेचें जन्मचरित्र व शिवचापारोपणाच्या पणाचें कारण सांगितलें.

---

# अध्याय ८ वा.

जनकराजानें पृथ्वीवरील सर्व नृपतींस स्वयंवरपत्रिका पाठविल्या होत्या, त्याप्रमाणें दशरथासही पाठविली होती; पण तो पुत्रवियोगजन्यदुःखामुळें स्वयंवराला गेला नाहीं.

ऋषींसह विश्वामित्रमहर्षि आले आहेत, असें ऐकतांच जनक मोठ्या समारंभानें त्यांस सामोरा गेला आणि सत्कारानें लग्नमंडपांत घेऊन आला. जेव्हां ऋषीमंडळींत त्यानें रामलक्ष्मणास पाहिलें; तेव्हां हे कोणाचे कोण ? ह्मणून कौशिकास प्रश्न केला असतां विश्वामित्रानें त्याला सांगितलें—हे दशरथराजाचे पुत्र. या रामचंद्राचें चरित्र फार अगाध आहे. यानें मार्गांत ताटिकेचा सहज वध केला; वीस कोटि पिशिताशनांसह सुबाहु एका क्षणांत मारून माझ्या यज्ञाचें रक्षण केलें. इकडे येतां येतां याचे चरणरज पडून अहिल्या उद्धरली. असा याचा पवित्र महिमा आहे.

देशोदेशींचे राजे रामचंद्रास पाहून थक्क झाले व जानकीनें यालाच वरावें, असें आपापल्या मनांत ह्मणूं लागले. जनकही राम जांवई होईल तर बरें, असें मानूं लागला; पण त्र्यंबकचापारोपणाचा पण दुर्धर आहे असें त्याला वाटूं लागलें. इतक्यांत त्या लग्नमंडपांत हत्तिणीवर बसलेली, सखीजनांनीं वेष्टित, जिच्यावर श्वेत चामरें उडतातहेत, अशी लावण्यवती तरुणी सीता तेथें आली. जिच्यापुढें अनंत शक्ति हात जोडून उभ्या राहणार, जिनें आदिपुरुषास भुलविलें, त्या आदिशक्तीच्या रूपाचें वर्णन कोणाच्यानें करवेल ? ती सीता स्वयंवरमंडपांत येऊन सर्व राजांकडे लक्ष्यपूर्वक पाहत असतां तिच्या कोणीही मनास येईना. शेवटीं ऋषिमंडळींत जेव्हां घनश्यामसुंदर राजीवनयन रामचं-

द्रास तिनें पाहिलें, तेव्हां मात्र ती मोह पावली. तिनें विजयानाम सखीस आपलें मनोगत सांगितलें आणि हाच वर मिळो, अशी इच्छा धरून शिवपार्वतीचें स्तवन करूं लागली: इतक्यांत विश्वामित्रा जनकाला सांगितलें कीं:

असें ऐकतांच आठ ... ... ...

नुष्य हजार गज लावून सभेंत ओढून आणलें. त्या चापाकडे पाहतां सर्वराजे मनांत चपापले. कोणी जनकाचा स्नेह ह्मणून आलों व कोणी मौज पाहण्यासाठीं आलों असें ह्मणून आपलें भय झांकूं लागले. सर्व लोक तटस्थवृत्तीनें त्या धनुष्याकडे पहाताहेत, तों मूळ पाठविलें नव्हतें तरी रावण प्रधानांसह त्या ठिकाणीं येऊन उभा राहिला. त्याला पाहतांच हें लग्नांत विघ्न आलें, ह्मणून सर्व भय पावले. कोणी ह्मणे–हा शिवचापारोपण करील! कोणी ह्मणत–हा नवरीला बळेंच उचलून नेईल! याप्रमाणें अनेकांचे अनेक तर्क चालले असतां; रावण जनकाला आपली बढाई सांगून शिवचापाला गुण लावण्यासाठीं उठला. त्याला भर्गचापाकडे जातांना पाहून जानकी घाबरली आणि रावणाची शक्ती हरण होवो, ह्मणून ईश्वरपार्वतीचा व कुलदैवतांचा स्तव करूं लागली. जानकीचा स्तव ऐकतांच सर्व दैवतें गुप्तरूपानें येऊन शिवचापावर भार घालून बसताहेत, तों रावण वस्त्रें सांवरून, दंड थोपटून, धनुष्याला गुण चढविण्यासाठीं उभें करूं लागला. त्याला पहिल्यानें तें हालेचना; तेव्हां एक दोन तीन हात लावतां लावतां त्यानें आपले वीस हात लावून तें चाप उभें केलें; तों जसा एखादा महावृक्ष उन्मळून पडतो, तसें तें चाप कलंडलें आणि अकस्मात् रावणाच्या उरावर पडलें. रावण भूमीवर पडतांच सगळ्या सभेवर धुरळा उडाला, त्याच्या दाही मुखांतून रक्त वाहूं

लागलें आणि तो अत्यंत कासावीस झाला. शेवटीं रावण जनकाला म्हणूं लागला—जनका! माझा प्राण चालला आहे, तरी इंद्रजित व कुंभकर्ण तुझा कुलक्षय करतील. सर्व सभाजन ह्मणूं लागले—असा कोणीही ... प्रमाण दशरथासही पाठविला ह... काढील. जनकानें सर्व ... तरी को... विश्वामित्रानें रामचंद्राला सुचविलें. इशारा पोंचतांच दाशरथी बालवीर राम जो उठला, तो शंका सोडून धनुष्याकडे चालला. राम धनुष्याकडे येत आहे असें पाहतांच सीतेचें मुखकमल प्रफुल्लित होऊं लागलें; इतक्यांत हा कोमल रघुवीर हें कठिण धनुष्य कसें उचलील? असें मनांत येऊन तिला चिंताही पडली. सर्व लोक त्याजकडे चकितमुद्रेनें पहात आहेत तों, दशरथदिग्गजाच्या छाव्यानें रावण करकमलें तुडवीत जाऊन इक्षुरूपी जें शिवचाप तें उभें केलें आणि गुण लावण्यासाठीं वांकविलें; तों भयंकर कडकडाट होऊन तें मोडलें! त्यावेळेस ब्रह्मांड थरारलें, दिग्गजांचे कानठाळे बसले, सर्व सभाजन मूर्च्छित झाले, भूमंडळ डळमळूं लागलें; त्यामुळें भोगेंद्रानें मान सरसावली. आदिवराहानें आपला दंत सांवरला आणि उमेला शिवांनीं आपल्या दशभुजांनीं सांवरून धरिलें. रामानें शिवचाप मोडलें, त्या वेळेस सगळ्या विवाहमंडपांत राम, लक्ष्मण, जनक, विश्वामित्र आणि सीता, हीं पांच मात्र शुद्धीवर होतीं. असो. रामानें शिवचाप मोडून बाजूला टाकतांच अपमान पावलेला रावण अधोवदनानें सभेंतून निघून गेला. नंतर सीतेनें आनंदभरांत येऊन रामचंद्राच्या गळ्यांत वरमाला घातली. त्यावेळेस जिकडे तिकडे आनंद झाला. मंगलवाद्यें वाजूं लागलीं; देवांनीं पुष्पवृष्टि केली आणि जनकाला अत्यानंद झाला. नंतर जनक आणि विश्वामित्र यांनीं निरनिराळीं कुंकुममंडित पत्रें दशरथास पाठविलीं.

लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न हे दशरथराजाचे रामाशिवाय तिघे पुत्र महाप्रतापी आहेत असें जाणून, जनकराजानें दशरथाकडे सांगून पाठविलें कीं, सीता रामचंद्रानें वरिलीच आहे. माझी कन्या उर्मिळा लक्ष्मणास देतों आणि माझ्या बंधूच्या मांडवी व श्रुतकीर्तिनामक रूपगुणसंपन्न कन्या आहेत, त्या भरतशत्रुघ्नासाठीं मान्य कराव्या. हा विचार वसिष्ठानुमतें दशरथाला पसंत पडला आणि दोहोंकडे देवप्रतिष्ठा झाल्या चौघींसही हळदी लावल्या. सीतेची उष्टी हळद रामाकडे आली. त्याच प्रमाणें उर्मिळा इत्यादिकांच्या लक्ष्मणादिकांस आल्या. यथाविधि मंगलस्नानें झाल्यावर दशरथानें, विशेषंकरून त्यांच्या त्यांच्या मातांनीं राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांस वस्त्रालंकारांनीं मंडित केलें. शांति, क्षमा, दया, उन्मनि, सद्बुद्धि, सद्विद्या, तितिक्षा, तुर्या, उपरति इत्यादि वऱ्हाडणी रामसदनीं चमकूं लागल्या. इतक्यांत बोध, आनंद, सद्विवेक, ज्ञान, वैराग्य, परमार्थ इत्यादि वऱ्हाडी बरोबर घेऊन जनकराजा वरांस मूळ आला. त्यानें चौघांची पूजा केली आणि अश्वांवर बसवून लग्नमंडपांत नेलें. रामाचे पांय स्वतः जनक राजा आपल्या हातानें धुऊं लागतांच सुमेधानामक त्याची पत्नी सुवर्णाच्या झारीनें पाणी घालूं लागली. नंतर चौघांस मणिमय चौरंगावर बसवून यथाविधि मधुपर्कविधि केला. तिकडे जोशांनीं लग्नघटी भरत आली, असें सांगतांच अंतःपट धरून चौघीही वधु चौघां वरांसमोर उभ्या केल्या आणि जिकडून तिकडून सुस्वर मंगलाष्टकें सुरू झालीं. सुमुहूर्तानें रामासह चौघांनीं सीतेसह चौघींचें पाणिग्रहण केलें. चौघी सुना सुरूप, सुलक्षण व दिव्य वस्त्रालंकारांनीं मंडित अशा पाहून दशरथ आणि कौसल्यादि स्त्रीवर्गास अत्यानंद झाला. त्याचप्रमाणें चौघेही जामात मदनाकृति चापशर-

ंडित असे पाहून जनकराजा व सुमेधाराणी हीं दोघें संतोष पावलीं. असो. मंगलाकार जो चापपाणि राम त्यानें मंगलभगिनी सीतेला वरि-ल्यांच लक्ष्मणानें उर्मिला, भरतानें मांडवी आणि शत्रुघ्नानें श्रुतकीर्ति यांस वरिलें. त्या वेळेस मंगलवाद्यें वाजलीं, त्यामुळें सर्व आकाश दुम-दुमून गेलें होतें व जिकडे तिकडे आनंदी आनंद पसरला.

विवाहहोमसाठीं बहुल्यावर जातांना, सर्व नवरी कडेवर घेतली पा-हिजे, असें ह्मणूं लागले. तेव्हां रामानें स्मितवदनानें सीतेला कडेवर घेतांच लक्ष्मणादिकांनीं आपापल्या स्त्रिया उचलल्या आणि चौघांनींहीं बहुल्यावर जाऊन लाजाहोम केला. हें उपाध्येपण अहल्येचा पुत्र श-तानंद चालवीत होता. गोत्रिहराची पूजा करण्यासाठीं राम सीतेला क-डेवर घेऊन अंतर्गृहांत गेला. नंतर अंबा शिपला.

सुमेधेनें चोघांही जामातांवरून आपल्या हातानें निंबलोण उतरलें आणि तिघी विहिणींस आणून त्यांची पूजा व वस्त्रालंकारांनीं प्रीतिपुर:-सर गौरव केला. नंतर भविष्यज्ञ राघवानें भविष्य जाणून जनकराजाची विनंति अमान्य करून आपल्या पित्यास सांगून त्वरित अयोध्येस नि-घण्याची तयारी केली आणि वसिष्ठानुमतें जनकाचा निरोप घेऊन दश-रथासह सर्व वऱ्हाड अयोध्येच्या मार्गास लागलें.

कलहप्रिय नारदऋषि जरी या लग्नसमारंभांत येऊन जाऊन होते; तरी राम अयोध्येच्या मार्गास लागल्यावर ते बदरिकाश्रमास गेले, आणि भृगुकुलतिलक परशुरामास चिडविण्यासाठीं सांगूं लागले— भार्गवा! त द्विजकुलांत महावीरेश असून त्या दाशरथी रामानें तुझें धनुष्य मोडून तुला अपेश द्यावें हें मला नीट दिसत नाहीं. तेव्हां परशुरामानें नारदाला सांगितलें कीं, आमचें अवतारकृत्य पूर्ण झालें आहे, तेव्हां आह्मांला

चापाची गरज काय ? असें ऐकतांच नारद त्याला राग यावा ह्मणून अनेक प्रकारें बोलले आणि शेवटीं ह्मणाले—शिवांनीं क्षत्रियांस मारण्यासाठीं तुला एक बाण दिला होता, त्यानें तूं एकवीस वेळ सर्व क्षत्रिय मारलेस; परंतु भार्गवरामा! आतां हा यशस्वी दाशरथी राम तुला सोडणार नाहीं बरें ? असें ऐकतांच भार्गवरामाला फार क्रोध आला आणि विष्णुचाप चढवून तो नारदासह निघाला; तो रामाला मार्गांतच आडवा आला. तो श्यामवर्ण, देदीप्यमान, विशाळनयन, पीतांबरधारी, अंगावर विद्युत्प्राय उत्तरीयवस्त्र घेऊन, कुठारपाणी, जटामुगुटमंडित, भव्य भार्गवराम आडवा येतांच दशरथादि सर्व राजे घाबरले व कांपूं लागले सर्व दळभार थबकून उभा राहिला. तेव्हां गजारूढ राम पुढें झाला आणि आपलाच पूर्वीचा वडील अवतारी जो परशुराम त्यास पाहतांच त्यानें वंदन केलें. त्याची लीनता पाहून परशुरामास कांहींसा संतोष वाटला; तों नारद त्याला चिडविण्यासाठीं पुनः ह्मणाले-पाहिलेंस भार्गवा ! तो दांडगा क्षत्रिय तुला पाहून गजाखालीं उतरला नाहीं. तूं महावीर ! त्यांत ब्राह्मण ! तुला पहातांच यानें मान द्यावा कीं नाहीं ? असें ऐकतांच, परशुरामानें चापावर बाण लाविला आणि रामाला ह्मणाला-कायरे ! तूं क्षत्रियवीर ह्मणवितोस, तर ताटिकेचा वध कसा केलास ? स्त्रीवध निंद्य हे तुला कळलें नाहीं ? स्त्री, रोगी, मूर्ख, बाल, अधम, याचक, अशक्त, वृद्ध, ब्राह्मण, गाय आणि गुरु; यांवर शस्त्र धरूं नये. हें धर्मशास्त्र तुला ठाऊक नाहीं. असें ऐकतांच दाशरथीराम त्याला ह्मणाला—ताटिका कांहीं माझी माता नव्हती. मातृवधाहून दुसरी कोणती अधमता मोठी आहे रे ब्राह्मणा ! तूं श्रेष्ठवर्ण ब्राह्मण स्नानानुष्ठानकर्मं सोडून हातांत शस्त्र घेतलेंस आणि राजांच्या हिंसा केल्यास हें तुला शोभलें वाटतें ! असें

ऐकतांच परशुराम निर्वाण बाण सोडूं लागला, रामानेंही कोदंडावर बाण लाविला होता; पण सोडला नाहीं. परशुरामाच्या बाणाकडे रामानें पाहिलें ह्मणजे ते वितळून जात. याप्रमाणें चमत्कार पाहतांच परशुराम विस्मित झाला आणि आतां मात्र सीमा झाली! हा प्रत्यक्ष शेषशयन अवतरला आहे; असें ह्मणून त्यानें आपल्या हातांतील धनुष्य खालीं ठेविलें, तेव्हां दाशरथीरामानें गजावरून खालीं उतरून त्याला प्रेमालिंगन दिलें. त्यावेळेस परशुरामाच्या मुखांतून अवतारज्योति जी निघाली ती रामवदनसरोजीं मिळाली. नंतर दाशरथी रामानें भार्गवरामाला विचारिलें—मीं जो चापावर बाण लाविला आहे, त्याला कांहीं कारण सांग; हा कोठें टाकूं? असें ऐकतांच परशुरामानें त्याला सांगितलें—या बाणानें तूं माझा मृत्युमार्ग रोधून टाक. असें ऐकतांच श्रीरामचंद्रानें तो बाण सोडला व त्याचा मृत्युमार्ग रोधून त्या भार्गवरामास चिरंजीव केलें. नंतर तो निरोप घेऊन पुनः बदरिकाश्रमीं गेला. जनकही रामाला पोंचवीत आला होता, तो आनंदानें निरोप घेऊन व तिन्ही कन्या वाटेस लावून परतला. नंतर दाशरथी रामानें सीता व चतुरंगदळासह आनंदगजरानें अयोध्येंत प्रवेश केला. दशरथराजानें आनंदेंकरून याचकांस तृप्त केलें. जे जे त्यावेळेस रामाला पाहण्यासाठीं आले, त्या त्यांस रामानें वस्त्रालंकार देऊन गौरविलें. नंतर सीतेसह राम अयोध्येंत वास करूं लागल्यामुळें सर्वत्रांस आनंदाचा भास होऊं लागला. याप्रमाणें येथपर्यंत रामायणानें बालकांड पूर्ण झालें.

---

अध्याय ९वा.



राज्याभिषेकाच्या आदल्यादिवशीं वसिष्ठांनीं रामाकडून उपोषण करविलें; त्याच्या हातून अपार दानें करविलीं आणि राम व सीता यांस रात्रौ व्रतस्थाप्रमाणें कुशासनावर निजविलें. त्याचप्रमाणें रामसीतेकडून वसिष्ठांनीं होम करवून अग्निनारायणाला तृप्त केलें. कौसल्या व सुमित्रा ह्या अत्यानंदानें याचकांस दानें देऊं लागल्या; त्यांच्या चित्तांत आनंद मावेनासा झाला. लक्ष्मणानें दशरथाजवळ जाऊन विनंती केली कीं, मी रामाची सेवा अक्षयी करीन; मला दुसऱ्या कोणत्याही कार्याकडे गुंतवूं नये; असें ऐकतांच दशरथाला आनंद झाला. अयोध्यानगर वेष्टून सर्व मांडलिकराजांच्या सेना उतरल्या आणि आकाशांत विमानचारी देवही राज्याभिषेकोत्सव पाहण्यासाठीं विमानांची दाटी करून राहिले. राज्याभिषेकोत्सवाच्या आनंदामुळें जिकडे तिकडे सुस्वर मंगलवाद्यें वाजूं लागलीं; त्यामुळें सर्व जगत् नादमय होऊन राहिलें; परंतु देवांला चिंता पडली.

इकडे ब्रह्मदेवाकडे इंद्रादिदेव चिंतातुर होऊन सांगण्यासाठीं गेले कीं, दशरथराजा श्रीरामचंद्राला राज्यावर बसवीत आहे; तो एकवेळ राज्यावर बसला म्हणजे रावणाला मारण्यासाठीं अरण्यवास कां पत्करील हो? आमचें बंदिमोचन होत नाहीं असें दिसतें; तर तो तपोवनांत येईल असा कांहीं विचार काढा. असें ऐकतांच ब्रह्मदेवानीं विकल्पाला आज्ञा केली कीं, तूं अयोध्येस जा आणि कैकयीच्या मनांत प्रवेश करून रामाच्या राज्याभिषेकाला विघ्न कर. विकल्प म्हणाला–महाराज! अयोध्येंत आनंद चालला आहे, त्या ठिकाणीं जर मी गेलों तर कित्येकांचा प्राणांत होईल आणि सर्व मला शाप देतील; यासाठीं माझ्यानें तेथें जाववत नाहीं; नाहींतर माझें बळ कमी आहे असें समजूं नका. याप्रमाणें विक-

त्याचें भाषण ऐकून सर्व देव ह्मणाले—यावेळेस राज्याभिषेकाला विघ्न करून रामाला तपोवनांत आणण्यास तुझ्याशिवाय दुसरा कोणीच समर्थ नाहीं. यासाठीं केवळ सर्वांचें बंदिमोचन व्हावें या हेतूनें तूं अयोध्येस जा. या वेळेस जर तूं तेथें न जाशील तर आह्मी रावणाच्या बंदींतून सुटत नाहीं. असें ऐकतांच विकल्प तेथून जो निघाला तो अयोध्येंत आला. तरी त्याच्यानें त्या पुण्यशील अशा नगरींत प्रवेश करवेना. तेव्हां तो त्या नगरीबाहेरच्या उपवनांतील एका शेवरीच्या वृक्षावर बसून राहिला.

कैकयीची आवडती दासी मंथरा पूर्वीपासून रामाचा विनाकारण द्वेष करीत असे. राम देवहत व्हावा ह्मणून तिनें नित्य प्रातःकाळीं तो शेजेवर असतां त्याच्या अंगावर केर उडवावा. ही गोष्ट रामाच्या लक्षांत येतांच त्यानें तिला शाप दिला होता कीं, दुष्टे! तूं कुरूप व सर्वांगीं वक्र होशील. हें शापवचन ऐकतांच ती रामचरणीं लागून उःशाप मागूं लागली; तेव्हां रामानें तिला सांगितलें कीं, पुढील अवतारीं कंसवध प्रसंगीं मी तुझा उद्धार करीन. असो. ती मंथरा रामाला राज्याभिषेक होणार होता, त्याच्या पूर्वदिवशीं सायंकाळीं फुलें वेंचण्यासाठीं उपवनांत गेली आणि ज्या वृक्षावर विकल्प बसला होता; त्या वृक्षाखालीं क्षणभर विश्रांतीस्तव बसली असतां त्यानें तें अत्यंत कुपात्र पाहून तिच्या शरीरांत प्रवेश केला. इतक्यांत तेथेंच एक पक्क कलिंगड तिला दिसलें, तें भक्षण करून ती जेव्हां पुन्हां फुलें वेंचूं लागली, तेव्हां तिच्या मनांत नानाप्रकारचे विकल्प येऊं लागले. तिला कांहीं सुचेनासें झालें व कलह लावण्यासाठीं कैकयीच्या मंदिरीं परत आली.

कैकयीच्या घरीं तर त्या दिवशीं मोठा सोहळा चालला होता. दारांत गगनचुंबित मंडप घातला होता व सर्व लोक चिंतारहित होऊन आनंदानें

फिरत होते; त्यांस पाहतांच मंथरेच्या मनांत द्वेष उत्पन्न झाला. ती तशीच रागानें फणफणत कैकयीजवळ गेली आणि अंग धरणीवर टाकून डांकें बडवीत तिला ह्मणूं लागली—बाईसाहेब ! तुह्मीं अभागी आहां; तुमचें नशीब फुटलें ह्मणून हीं कृत्यें तुमच्या ध्यानांत येत नाहींत. तुमच्या मुलांना मामाकडे पाठवून रामाला राज्यपदीं बसवितात हें तुह्मांला कसें कळत नाहीं ? राम राज्यावर बसतांच तुमच्या पुत्रांला मारवील आणि तुह्मांला आपल्या मातेचें दास्य करायाला लावील. हें तुमच्या ध्यांनात कसें येत नाहीं ? या वेळेस माझ्याशिवाय तुह्मांला बुद्धि शिकविणारी कोणीही नाहीं. बाईसाहेब ! सावध व्हा, अवदसा तुमच्यापुढें येऊन उभी आहे. असें एकतांच कैकयीनें तिला सांगितलें—प्रियसखे ! याविषयीं तूं खेद करूं नको. राम आणि भरत मला सारखेच आहेत. असें बोलून तिनें आपली आवडती दासी आहे असें मनांत आणलें आणि आपल्या गळ्यांतील मुक्तमाला पदकासह तिच्या गळ्यांत घातली आणि सांगितलें—बाई! तुझा तो व्यर्थ भ्रम आहे. आनंदाच्या कार्यांत भलतेंच बडबडून विघ्न आणूं नको. असें ऐकतांच मंथरेनें गळ्यांतील माळ तोडून टाकली आणि राज्य बुडालें ह्मणून आकांत मांडला. तव्हां कैकयीनें स्नेहास्तव तिला हृदयाजवळ धरिलें आणि तिचें शांतवन आरंभिलें. इतक्यांत मंथरेच्या हृदयस्थकलीनें कैकयीच्या हृदयांत प्रवेश केला आणि तिची बुद्धि फिरविली. ती आपलें पहिलें बोलणें विसरली आणि मंथरेला ह्मणाली—बाई ! हें बरेंच तुझ्या ध्यानांत आलें; पण सखे काय करावें ? भरत, शत्रुघ्न येथें नाहींत आणि वसिष्ठासह महाराज, मित्रमंडळ व सर्व प्रजा रामाकडली आहे; ह्मणून माझें कोणीही ऐकणार नाहीं. याला कांहीं उपाय सांग. मंथरा हें भाषण ऐकतांच ह्मणाली—या आणीबा-

णीच्या प्रसंगीं तुझ्या जवळ एक युक्ति आहे. शुक्राच्या युद्धांत राजानें तुला दोन वर देऊं केले आहेत ते यावेळेस मागून घे. भितेस कां ? एका वरानें भरतासाठीं राज्यासन आणि दुसऱ्यानें रामासाठीं चांगला चौदा वर्षें वनवास मागून घे. चौदा वर्षांत तुझा मुलगा चौदा भुवनें जिंकून एकछत्री राज्य करील. राम वनांत निघाला ह्मणजे त्याच्या मागून लक्ष्मण जाईल व त्या दोघांला अरण्यवासी निशाचर भक्षण करतील. त्यांत भरताचें कल्याणच आहे. राम वनांत जाऊं लागला ह्मणजे दशरथराजा प्राण सोडील; तर तेंहीं तुला बरेंच. भरताला राज्यावर बसविण्याला कोणींही अडथळा आणणार नाहीं. राम निघून गेला ह्मणजे त्याचे अनुयायी असतील त्यांला राज्याबाहेर हाकून देऊं; ह्मणजे निष्कंटक राज्य भरताच्या हवालीं होईल व तुला राजमाता ह्मणून सर्वलोक मानतील. याप्रमाणें अनेक प्रकारें बुद्धि शिकवून त्या कुटकीनें कैकयीचें मन हिरावून घेतलें. पहा कलीचा प्रताप! कैकयीनें राजा मंदिरांत येण्याची वेळ साधून अलंकारांचा त्याग केला आणि क्रोधानें केस मोकळे सोडून विगलितवसन होत्साती रडत एका कोपऱ्यांत भुईवर निजून राहिली.

दशरथराजाला रामास राज्याभिषेक करण्याच्या गडबडीचा अत्यानंद होता. त्या आनंदाच्या भरांत नित्याप्रमाणें तो कैकयीच्या मंदिरांत आला व आमची राणी आज कां दिसत नाहीं ? असें मंथरेला विचारूं लागला; तेव्हां तिनें सांगितलें–महाराज ! राणीसाहेब त्या कोपऱ्यांत रडत पडल्या आहेत; त्यांच्या मनांत काय आहे तें कांहीं कळत नाहीं. असें ऐकतांच दशरथ तिच्या जवळ गेला आणि हातानें तिचें तोंड कुरवाळूं लागला. इतक्यांत कैकयीनें त्या भोळ्या पतीला झिडकारून बाजूला लोटून दिलें आणि ह्मणाली–आपण असत्यवादी क्रियानष्ट आहां.

आपल्या मनांतील सगळा खोटेपणा मला कळून आला आहे; यासाठीं दूर व्हा. रामाला राज्यावर बसवून भरताला वनवासी करण्याचे आपले विचार मला कळले आहेत. आपण चौघांनांही सारखे मानून व्यवस्था करावयाची तें सोडून असें कपटमांडलें आहे काय? असें ऐकतांच दशरथाचें हृदय धडधडूं लागलें आणि तो तिला ह्मणाला–प्रिये! या वेळेस तूं रामाच्या राज्याभिषेकाला विघ्न करूं नको. मी तुला जें पाहिजे तें देईन. असें ह्मणून जेव्हां तो तिचे पाय धरूं लागला, तेव्हां ती ह्मणाली–असें आहे तर माझे स्वर्गीचे दोन वर यावेळेस द्यावे आणि मग आपल्याला जें हवें तें करावें. असें ऐकतांच दशरथ "माग" ह्मणाला–तेव्हां तिनें सांगितलें–एका वरांत भरताला राज्याभिषेक करावा आणि दुसऱ्या वरानें रामाला चौदावर्षे वनांत पाठवावें. राम जवळ असला ह्मणजे प्रजा भरताला राज्यावर बसूं देणार नाहीं. यासाठीं भरत राज्यावर बसून चौदा वर्षे झालीं ह्मणजे रामाला पाहिजे तर आणावें अथवा तिकडेच ठेवावें; हें माझें मागणें आहे. हे शब्द ऐकतांच दशरथाच्या अंगावर विद्युत्पात झाल्याप्रमाणें झालें. कैकयीवचनानल त्याचें आयुष्यकानन जाळूं लागला, तरी पुनः नको ग प्रिये रामाला वनवासी करूं; असें ह्मणून, तो तिचे चरणावर पडला. तेव्हां ती ह्मणाली–असा अधमपणा मला आवडत नाहीं. मी जें मागितलें तें यथार्थ आहे. राजा आणखीं एक वेळ तिच्या चरणीं लागला आणि रुदन करीत ह्मणाला–प्रिये! आजपर्यंत राम तुझा आवडता पुत्र होता, असें असतां आजच त्याच्यावर कां क्रुद्ध झालीस? तूं आणखीं कांहीं माग. सगळ्यां पट्टराण्या तुझ्या दासी करून ठेवितों, भरताला राज्यावर बसवितों; पण सुकुमार रामाला अरण्यांत पाठवूं नको. कैकयी ह्मणाली–कार्यसाधु

लोक जे अधम असतात, ते प्रसंगीं पाहिजे तसें बोलून कार्य साधून घेतात. तसें आपण सूर्यकुलाला कलंक लावण्यासाठीं उत्पन्न होऊन मला बुडविण्याचा विचार मांडला आहे; पण तसें कधीं होणार नाहीं. मी मागितलें तेंच खरें. नाहीं ह्मणावें आणि अधःपात करून करावा. असें ऐकतांच दशरथराजा निरुपाय जाणून भार्यापुत्रवियोगामुळें रात्रभर मूर्च्छित पडला.

प्रातःकाळीं सुमंतप्रधान येऊन राजाला नमून सांगूं लागला–महाराज! वसिष्ठाज्ञेप्रमाणें सर्व सामग्री सिद्ध आहे. गुरुजी वाट पहात बसले आहेत; तर आपण रामाला राज्याभिषेक करण्यासाठीं त्वरित चलावें. अरुणोदयाचा संधि जवळ आला आहे. इतकें जरी तो सुमंतप्रधान बोलला, तरी राजानें त्याला उत्तर दिलें नाहीं; तेव्हां चकित होऊन पाहूं लागला. नंतर त्यानें कैकयीला प्रश्न केला. तेव्हां दशरथ स्फुंदस्फुंदून ह्मणाला–प्रधानजी! माझा मरणकाल सन्निध आला आहे; यासाठीं तुह्मीं रामाला येथपर्यंत घेऊन या. हें वर्तमान कोणालाहीं कळवूं नका. असें ऐकतांच तो आज्ञाधारक प्रधान म्लान वदनानें राजाला नमून विचार करीत रामसदनाकडे निघाला. संसारतापानें तप्त झालेला पुरुष जसा संतसदनीं जातो, तसा तो सुमंतप्रधान रामसदनाजवळ येऊन चारी महाद्वारें ओलांडून आंत गेला आणि रामास पाहतांच साष्टांगनमस्कार करून हात जोडून पुढें उभा राहिला; तेव्हां राम त्याला ह्मणाला–प्रधानजी! आपण आमचे मुख्य प्रधान; आह्मांला वडील बंधूप्रमाणें वंद्य आहां. आपले गुण पाहून आह्मांला आनंद होतो. आज प्रातःकाळींच कां आलां बरें? असें ऐकतांच प्रधानानें राजाचा निरोप रामाला सांगितला कीं, महाराजांनीं आपणांस कैकयीसदनीं बोलाविलें आहे.

---

# अध्याय १० वा.

सुमंतप्रधानानें रामाला राजाचा निरोप सांगतांच तो पितृभक्त नवमेघश्- । श्रीरामचंद्र तत्काल उठला आणि रथांत बसून कैकयीच्या घरीं निघाला, या वेळेस छप्पन्न देशींचे राजे व राजकुमार रामवदनचंद्राकडे पाहतांच संतोष पावले आणि त्याच्या रथाबरोबर चालूं लागले. सर्व अयोध्या- वासीजन राममुख पाहून आनंदित होत्सातें रामच राजा असो. असें ह्मणत त्याबरोबर निघाले. पुढें चतुरंग दळभार चालला आहे व नाना- प्रकारचीं वाद्यें वाजताहेत, असा तो श्रीराम मित्रवत सुमंतासह कैकयीच्या मंदिराजवळ आला आणि सर्व सहचरांस बाहेर ठेवून त्यानें लक्ष्मण व सुमंत या दोघांसह मंदिरांत प्रवेश केला. तों दशरथराजा मूर्च्छित पडला होता व त्याच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह निघत होता. रामानें त्याला पाहतांच नमून कैकयीच्या चरणीं मस्तक ठेविलें आणि विचारिलें—माते ! आज महाराजांनीं भूमीवर शयन कां केलें आहे ? असें ऐकतांच कैकयीनें त्याला सांगितलें—पूर्वीं यांनीं मला दोन वर देऊं केले होते; ते आतां जेव्हां मीं मागितले तेव्हां असे रडत बसले आहेत. राम ह्मणाला—माते ! मला सांग; पित्याचें वचन मी सत्य करीन. असें ऐकतांच कैकयीनें रामाला सांगितलें—तूं चौदा वर्षेपर्यंत वनांत जाऊन रहा. बरोबर लक्ष्मणालाही ने. माझा भरत राज्यासनीं बसून राज्य करील. वनांत ईश्वर तुला यशस्वी करील. असें ऐकतांच सीताकांत राम अवश्य ह्मणून तेथून नि- घाला. कैकयीच्या भाषणांचा लक्ष्मणास क्रोध आला होता; पण त्यानें राजाची भीड धरून आवरला. असो. कैकयीला नमून राम आपल्या मातेच्या ( कौसल्येच्या ) मंदिरांत आला. तपोवनांत जाण्यासाठीं ज्याच्या मनाला परमानंद झाला आहे, असा तो राम कौसल्येला नमून

जेव्हां सर्व वर्तमान सांगूं लागला; तेव्हां कौसल्येला एकाएकीं धडकी भरली आणि ती मूर्च्छित झाली. रामानें तिची ती स्थिति पाहतांच नेत्रांत प्रेमाश्रु आणून जेव्हां तिला सावध केलें; तेव्हां ती शोक करीत असतां त्याला सांगूं लागली—बाळा! नकोरे माझा त्याग करून अरण्यवास करण्यासाठीं जाऊं! तुला पाहिजे तर माझ्या उपवनांत गुप्त रहा. कोणाला भेटूं नको. असें ऐकतांच राम ह्मणाला—माते! मला लोकोपचारासाठीं अरण्यांत जावयाचें नाहीं. खरोखर पितृवचन सत्य करणें आहे. जो पित्याचें वचन सत्य करीत नाहीं, तो सत्पुत्र नव्हे; तर शोकातुर न होतां तूं मला आज्ञा दे. असें बोलून राम उभा राहतांच कौसल्या धबाधब वक्षस्थळ पिटून आकांत करूं लागली. राम वनांत जाणार, ही बातमी बाहेर फुटतांच सगळी अयोध्यानगरी आकांत करूं लागली. जिकडे तिकडे आकांत झाला आणि कित्येक लोक मूर्च्छित पडले. तेव्हां लक्ष्मण रामाला ह्मणाला—प्रभो! तूं जर आज्ञा देशील तर मी कैकयीचा शिरच्छेद करीन व सर्वांना संतोषवीन. पहा बरें, तूं वनांत जातांच दशरथराजा प्राणत्याग करील आणि ही राजधानी ओस पडेल. तूं वनांत गेलास ह्मणजे परम प्रेमळ बंधु भरत राज्य करणार नाहीं. जर हिचा वध केला, तर त्यालाही सुखच होईल. असें ऐकतांच रामानें त्याला सांगितलें—लक्ष्मणा! प्राणांतसमय जरी आला; तरी ज्ञात्यानें विपरीत कर्म करूं नये. जशा कौसल्या, सुमित्रा, आपल्या माता आहेत; तशीच कैकयी. तिचा जर वध केला, तर आपल्याला यश कसें येईल बरें? लक्ष्मण ह्मणाला—असें आहे तर मीही तुझ्या बरोबर अरण्यांत येईन. तुझ्या शिवाय एक क्षणभरही मला येथें राहवणार नाहीं. मी आपल्या बरोबर वनांत असलों ह्मणजे फळें, उदक आणि शय्येसाठीं

हृण तरी आणून देईन. याप्रमाणें लक्ष्मण बोलत आहे तों सुमित्रेनेंही रामाला सांगितलें—सुकुमारा वत्सा रामचंद्रा! तूं माझ्या पुत्राला आपल्या बरोबर वनांत घेऊन जा. त्यानें तुझी सेवा केली ह्मणजे मला संतोष आहे. याप्रमाणें त्यांचीं भाषणें चाललीं आहेत तों कौसल्या भावी पुत्र-वियोग आठवून कपाळ बडवून घेऊं लागली. तरी शेवटीं निरुपाय जा-णून तिनें रामाला वनांत शीतोष्ण बाधूं नये आणि कोणाची दृष्ट लागूं नये ह्मणून अनेक मणी, मोहरे व औषधी रामाच्या दंडाला बांधल्या आणि रामाचें वनांत रक्षण करावें ह्मणून तिनें हात जोडून पंचभूतांची प्रार्थना केली. अष्टदिक्पाल, नवग्रह, एकादशरुद्र व द्वादशादित्यांची प्रार्थना करून तिनें माझ्या रामाचें वनांत रक्षण करा असें सांगितलें. तरी जेव्हां राम तिच्या मंदिरांतून सीतेकडे निघाला, तेव्हां ती भ्रमिष्टा-प्रमाणें त्याच्या मागें धांवली आणि शोकाक्रोश करीत ह्मणूं लागली—बाळा! नकोरे दूर जाऊं. अरे माझ्या स्तनाला पान्हा फुटला. गुण-निधाना रामा! मला टाकून वनांत जाशील तर माझा जीव या देहांत राहणार नाहीं. असें बोलून तिनें रामाच्या गळ्याला मिठी मारली आणि ह्मणाली—कैकयीची आज्ञा मान्य करतोस; मग माझीच अवज्ञा कां? मी काय तुझी माता नव्हे? असें ऐकतांच रामालाही गहिंवर आला व त्यानें तिची समजूत करून सांगितलें—माते! तूं सुज्ञ आहेस. असा शोक करूं नको. मी लौकरच तुला भेटण्यासाठीं येईन. असें बोलून मागें न पाहतां म्लानमुखानें राम सीतेच्या मंदिरांत आला. त्याला एकटाच राजचिन्हांशिवाय पाहून ती जगन्माता सीता चरकली; तरी विनयानें तिनें त्याला आणून आसनावर बसविलें आणि सलज्ज हात जोडून त्याच्यापुढें अधोवदनानें उभी राहिली. तेव्हां राम तिला

म्हणाला–प्रिये! मी पितृवचन सत्य करण्यासाठीं अरण्यांत निघालों आहें. तूं कौसल्येची सेवा करून याच ठिकाणीं रहा. चतुर्दशवर्षांतीं येऊन तुला भेटेन. कौसल्या आणि सुमित्रा यांस सारखा मान द्यावा व जनकगृहास कधींही जाऊं नये; म्हणजे मानभंगाची भीति राहणार नाहीं. तूं मजबरोबर वनांत येशील तर दंडकारण्यांतील सीतोष्ण तुला सहन होणार नाहीं. असें ऐकतांच जानकी म्हणाली–महाराज आपण माझा त्याग करून एकटेच अरण्यांत जाऊं नये. जलचरांचा जर जलानें त्याग केला तर ते कशीं वरें जगतील? दीपाला सोडून प्रभा कधीं वेगळी राहिली आहे का? ज्याचा सखा सिंह आहे त्याला अरण्यांत फिरण्याचें भय काय? मी आपल्याला एकच सांगतें. जानकीनें जिवंत रहावें, असें जर वाटत असेल; तर मला बरोबर घेऊन चलावें. असें ऐकतांच राम म्हणाला–तूं म्हणतेस तें जरी खरें असलें, तरी माझ्या एकट्याच्याच मतानें कांहीं तुला बरोबर घेऊन जातां येत नाहीं, यासाठीं तूं वसिष्ठांची आज्ञा घे आणि मजबरोबर चल. असें ऐकतांच तिनें वसिष्ठांचे चरण धरिले आणि माझें पतिवियोगजन्यदुःख दूर करावें म्हणून विनंति केली. तेव्हां वसिष्ठांनीं रामाला सांगितलें कीं, जानकीला बरोबर घेऊन जा आणि लक्ष्मणही तुमच्या रक्षणासाठीं बरोबर असूं दे. असें ऐकतांच रामानें तें मान्य केलें आणि लक्ष्मणाला सांगितलें कीं, वसिष्ठसदनीं माझें धनुष्य, अक्षयभाता आणि वरदशस्त्रें आहेत तीं घेऊन ये. असें ऐकतांच लक्ष्मण तिकडे गेला. नंतर रामानें आपल्या संग्रहीं जें द्रव्य होतें तें याचकांस वांटलें. उत्तम उत्तम व मूल्यवान् वस्तु होत्या त्या गुरुगृहास पाठविल्या. गुरुपुत्राला बोलावून त्याला आपलीं वस्त्रें व अलंकार दिले. त्याचप्रमाणें सीतेनेंही आपलीं वस्त्रें, भूषणें याचकांस व

मुख्यत्वें गुरुपुत्राच्या स्त्रीला दिलीं. कुटुंबवत्सल, दीन, अशक्त, पंगु इत्यादिकांस रामानें दानें दिलीं आणि सर्व ऋषींच्या आश्रमांतही द्रव्य पाठवून दिलें. ज्या वेळेस त्यानें आपले सर्व इष्टमित्र व सेवकजन गौरविले आणि लोभ ठेवा बरें, असें सांगून त्यांचा निरोप मागितला; तेव्हां सगळ्या अयोध्येंत हाहाःकार उडाला. दीनरक्षकराम अरण्यांत जातो, असें कळतांच आबालवृद्धांच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह चालूं लागले.

नंतर लक्ष्मण व सीतेसह राम कैकयीच्या मंदिरांत आला व दशरथाला नमून प्रदक्षिणा करून वनांत जाण्याची आज्ञा मागूं लागला. तेव्हां दशरथानें त्याला सांगितलें—रामा ! तूं वनांत गेल्यावर मी आपले प्राण ठेवणार नाहीं. वत्सा ! जातोसच तर बरोबर दळभार व संपत्ति घेऊन जा आणि चौदावर्षे अरण्यांत सुखानें कालक्रमण करून परत ये. असें ऐकतांच राम ह्मणाला—ताता ! मी तपासाठीं अरण्यांत जाणार, तेथें सैन्याचें काय कारण आहे ? मी तर वल्कलें परिधान करून अरण्यवासी होईन आणि तपश्चर्या करीन. असें ऐकतांच कैकयीनें वल्कलें आणून रामापुढें ठेविलीं. वल्कलें पहातांच रामानें वस्त्रालंकारांचा त्याग करून तीं परिधान केलीं आणि शामलांगावर भस्म लाविलें. लक्ष्मणाही अलंकार टाकून वल्कलवेष्टित झाला. तेव्हां कैकयीनें सीतेला सांगितलें—बाई जानकी ! तूं तरी अशी कां राहतेस ? नेस तीं वल्कलें. असें ऐकतांच जानकीही वल्कलें परिधान करूं लागली; पण तीं तिला नेसतां येईनात; तेव्हां राम तिला आपल्या हातानें नेसवूं लागला. तरी सुकुमार जानकीच्या अंगाला जेव्हां तीं खुपूं लागलीं; तेव्हां वसिष्ठाला फार वाईट वाटलें. ते कैकयीची निर्भर्त्सना करून ह्मणाले—दुष्टे निर्दये! तुला कांहीं तरी विचार आहे ? रामाला राज्याबाहेर काढून सर्वघातकी अशी

तूं उत्पन्न तरी कशी झालीस? दशरथही शोकावेशानें बोलूं लागला—हे द्राडस्त्रिये! माझीं सुकुमार बाळें वनांत घालविणारी जी तूं ती माझ्या राज्यांत नसलीस तरी चालेल. मी वचनबद्ध झालों आहें, नाहीं तर यावेळेस तुझा शिरच्छेदच केला असता. असें बोलत असतां दशरथानें सीतेला हृदयाजवळ धरून सुमंताकडून नूतन वस्त्रालंकार आणिले आणि तिचा गौरव केला. नंतर वसिष्ठ व दशरथास सव्य घालून वनांत जाण्यास आज्ञा मिळावी ह्मणून सीतेसह रामानें जेव्हां हात जोडले; तेव्हां त्या ऋषीनें आशीर्वाद दिला. सीतेला सांगितलें—तूं महापतिव्रता आहेस. तुझी त्रिभुवनांत कीर्ति होईल आणि रामही काननांत विजयी होईल. इतकें झाल्यावर रामानें आपल्या सातशें मातांस साष्टांगनमस्कार करून लोभ असूंद्या ह्मणून सांगितलें. तेव्हां एकच कल्होळ उडाला. कोणीं मस्तकें व वक्षस्थळें पिटूं लागल्या; कोणीं तोंडांत माती घालून घेऊं लागल्या आणि कोणीं मस्तकें आपटून रामा! रहा रे, असें ह्मणूं लागल्या. इतक्यांत दशरथानें रामाला सांगितलें—वत्सा! राज्यांतून तरी पायांनीं जाऊं नको. माझा रथ बरोबर घेऊन जा. असें ऐकतांच रामानें अवश्य ह्मणून रथ आणविला आणि सुमंत सारथ्य करण्यासाठीं त्यावर बसला. नंतर रामानें दशरथाच्या चरणीं शेवटचें मस्तक ठेवून जेव्हां मार्ग धरिला; तेव्हां एकच हांक उडाली. सीतेला रथांत घालून रामलक्ष्मण बाहेर निघतांच दशरथानें धबाधब वक्षस्थळ बडवून घेतलें. तो वेड्यासारखा दाराबाहेर जाऊन बिदोबिदीं पायांनींच धांवूं लागला आणि कोणीतरी माझा राम मला दाखवा रे? असें ह्मणूं लागला. तो गोपुरावर चढला आणि पाहूं लागला, पण राम दिसेना. तेव्हां चांचरला आणि खालीं पडला. कौसल्याही रामा! रामा! ह्मणून भ्रमिष्टाप्रमाणें

गांवूं लागली; त्याचप्रमाणें सुमित्रा. राम वनांत निघतांच अयोध्येंतील पशुपक्षीही रुदन करूं लागले आणि सर्व प्रजा रामाच्या रथामागें धांवूं लागली. रामाचे भक्त, मित्र, सेवक, वक्षस्थळें बडवीत रामा! आह्मां-सही घेऊन जा; ह्मणून अयोध्या सोडून निघाले. चर्मक, अनामिक, आदिकरून सर्व सहकुटुंब अयोध्या ओस टाकून रामाबरोबर वनांत राह-ण्यासाठीं चालले. सर्व लोक कैकयीची निंदा करूं लागले. कोणी ह्मणत आतां दशरथ राजा मरण पावेल; कैकयीचें वपन करून तिच्या-वरच छत्र धरा. कोणी दशरथाला स्त्रैण ह्मणून त्याचीच निंदा करीत. असो. राम रथांत बसून जात असतां पाठीस प्रजा लागली आहे, असें पाहतांच रथ उभा करून त्यानें सर्वांना हात जोडले आणि सांगि-तलें—राजा दशरथ तुमच्या शिरावर आहे, तो तुमचें यथान्याय रक्षण करील. माझ्या बरोबर अरण्यांत येण्याचा हट्ट न धरितां सर्वांनीं अयो-ध्येंतच रहावें, अशी मी विनंति करितों आणि चौदावर्षांतीं येऊन सर्वां-ना भेटेन, हेंही खात्रीनें सांगतों. तर मत्प्रियजनहो! तुह्मी सर्व आपापल्या घरीं राहण्यासाठीं परता बरें? असें ऐकतांच भिडस्त प्रजा मागें फिरली. परी रामाचे भक्त ब्राह्मण कांहीं केल्या मागें फिरेनात; तेव्हां रामानें रथा-खालीं उतरून त्यांचे पाय धरले आणि त्यांनीं मागें परतावें ह्मणून त्यांस विनवूं लागला. तेव्हां ते ह्मणाले—रामा! आमचा प्राण गेला तरी आह्मी तुला सोडून राहणार नाहीं, इतक्यांत सूर्यास्ताचा समय आला; तेव्हां लक्ष्मण रामाला ह्मणाला—बंधो! हे भूदेव फार श्रमले आहेत; यासाठीं आजची रात्र याच ठिकाणीं घालवावी असें माझें मत आहे. असें ऐक-तांच राम त्या ठिकाणीं राहिला.

इकडे सूर्यास्तसमयीं सर्व स्त्रियांनीं भ्रम पावलेल्या दशरथास धरून

कैकयीच्या सदनांत नेलें आणि सर्व त्याला वेष्टून बसल्या. तरी त्या सर्वांस राम गेल्यामुळें अयोध्या ओसाड व भयाण दिसूं लागली. नंतर दशरथासह सर्व स्त्रियांनीं प्राण देण्याचा निश्चय करून ज्याचा स्पर्श होतांच प्राण जाईल असें महाविष आणलें व सर्व मिळून तें प्राशन करणार तों वसिष्ठ त्या ठिकाणीं आले आणि त्यांनीं रामाची शपथ वाहून वाल्मिकाचा मूळ काव्यार्थ सांगितला तो असाः—रावणाचा वध करून देवांस बंदींतून सोडवून चतुर्दश वर्षांनीं आनंदराजरानें राम अयोध्येस परत येईल. असो. गुरुवचन प्रमाण मानून सर्वांनीं विषपान वर्ज्य केलें.

इकडे तीन प्रहर रात्र झाल्यानंतर वनमार्गांत विप्रांनीं वेढून धरलेला राम जागा झाला आणि लक्ष्मणास ह्मणाला—सौमित्रा! ब्राह्मण रथाला वेढा घालून निजले आहेत तरी जसा प्राण, काया जर्जरीच्या तशीं टेकून नकळत निघून जातो, तसा आपला रथ या ब्राह्मणांच्या वेढ्यांतून काढला पाहिजे. असें बोलून त्यानें सुमंतालाही उठविलें आणि सर्वानुमतें पहिल्यानें आकाशमार्गानें रथ बाहेर काढला व नंतर अयोध्येकडे रथचक्राचा मार्ग दाखवून पुनः आकाशमार्गेंच रथासह जे उडाले, ते मानससरोवरावर जसे हंस उतरतात तसे शृंगवेराजवळ गुहकाच्या आश्रमासन्निध भागीरथीतटाकीं उतरले. प्रातःकाल होतांच घननीलरामानें भागीरथीची स्तुति केली व स्नान करून ह्मणाला—ही जान्हवी आमच्या सूर्यवंशांतील भगीरथनृपतीनें नानाप्रकारें प्रार्थना करून जगदोद्धारासाठीं मृत्युलोकीं आणिली. ही शिवमुगुटावरील शुभ्रमाला ब्रह्मकटाह फोडून परब्रह्मरूपानें प्रगट झाली आहे. ब्रह्मा, विष्णु, शिव, इंद्र आणि नारदादि महर्षि या भागीरथीचें अपार स्तवन करितात. या भागीरथीचें नीर नेत्रांनीं पाहतांच अनंत जन्मींचीं पातकें शुष्कवनाप्रमाणें जळून जातात.

असें ऐकतांच सीता, लक्ष्मण आणि सुमंत यांनीं स्नानें केलीं. नंतर नित्यकर्म करून राम न्यग्रोध ( वड ) वृक्षाखालीं तृणासनावर बसला आणि त्यानें लक्ष्मणासह मस्तकावर वटदुग्ध ( वडाचा चीक ) घालून त्यांच्या जटा वळल्या आणि सर्वांगाला विभूति चर्चन करून चंद्रमौली शंकराप्रमाणें शोभला.

इकडे प्रातःकाळीं रथाला वेढा घालून निजलेले ब्राह्मण जागे झाले आणि रथासह राम गेला, असें पाहून खेद करूं लागले. ते ह्मणाले— निद्रा नको अनर्थकारक प्रळयच ! ह्मणून हातीं आलेला राम गेला. अज्ञानावरण पडल्यावर जसा आत्माराम प्रत्ययाला येत नाहीं; तसें रामच्यावर सुषुप्त्यावरण पडल्यामुळें आह्मीं रामाला मुकलों ! कोणी कोणी तर्क करूं लागले कीं, दशरथराजा प्राण देऊं लागला असेल, ह्मणून राम परत गेला. इतक्यांत रथचक्रें अयोध्येकडेच लागलेलीं एकाला दिसलीं; तेव्हां सर्व हर्षयुक्त होऊन अयोध्येस गेले, परंतु तेथें राम नाहीं असें पाहतांच सर्व घरादारांचा त्याग करून रामदर्शनासाठीं विरक्त झाले.

# अध्याय ११ वा.

शृंगवेरास भागीरथीतटाकीं स्नान करून रामानें गुहकनामक नावा-
ड्यास बोलाविलें आणि आम्हांला पैलतीरीं नेऊन पोंचीव असें म्हणूं
लागला. गुहक सुशील व महाभक्त होता. त्यानें रामाला जाणून जेव्हां
तूं कोण ? कोठून आलास ? इत्यादि प्रश्न केले, तेव्हां रामानें सांगितलें-
अयोध्यापति जो राजा दशरथ त्याचा मी पुत्र; मला राम म्हणतात.
असें ऐकतांच गुहकाची माता रुदन करीत पुत्राला म्हणाली—बाळा! या
राजपुत्राला तूं आपल्या नौकेंत बसवूं नको. पूर्वी संतमहंतांच्या मुखानें
मी याची अशी गोष्ट ऐकली आहे कीं, याच्या चरणरजानें कठीण दग-
डाची स्त्री झाली. तूं गरीब, याचे पाय नौकेला लागतांच जर ती स्त्री-
रूप झाली, तर दोन स्त्रियांचें पोषण तूं कसें करशील ? असें ऐकतांच
गुहकानें रामाला सांगितलें—देवा ! मी तुला आपल्या घरीं नेऊन आधीं
तुझे चरण धुईन, पूजा करीन आणि मग नौकेंत बसवून पैलतीरीं पोंच-
वीन. असें बोलून त्यानें रामाला आपल्या आश्रमांत नेऊन शुद्धभावानें
त्यानें चरण क्षालन केले आणि तें तीर्थ मस्तकीं वंदून अरण्यांतील
कंदमुळें आणलीं व रामाची यथाविधि पूजा केली. त्यावेळेस त्याला जो
आनंद झाला, तो गगनांतही मावेना. नंतर त्यानें रामाचे चरण दृढ धरून
सद्‌दस्फुंदून विनंती केली—हे दयाब्धे ! मायाचक्रचालका रामचंद्रा ! तूं
लौकर परत ये. जोंपर्यंत मी तुला पाहणार नाहीं; तोंपर्यंत मंगलभोगांचा
स्वीकार करणार नाहीं. असें ऐकतांच प्रेमळ भक्त जाणून रामानें त्याचें
सांत्वन केलें व त्याला हृदयाजवळ धरून अभय दिलें. नंतर त्यानें
नौका आणली व सीता लक्ष्मणासह राम त्या नौकेंत बसतांच त्यानें
सुमंताला परत जाण्याची आज्ञा दिली. राम शेवटीं सुमंतास म्हणाला—

प्रधानजी ! आतां आपण परत अयोध्येस जाऊन वसिष्ठ व दशरथ यांस माझा साष्टांगनमस्कार सांगून ह्मणावें—मी चौदा वर्षें भरतांच आपल्या चरणांचें दर्शन घेण्यासाठीं येतों. भरत जर माझ्या मागें अयोध्येंत आला; तर त्या माझ्या प्रेमळ बंधूचा कदाचित् दशरथराजा माझ्यासाठीं वधही करील. यासाठीं तुह्मीं तिकडे जाऊन सर्वांचें शांतवन करावें. असें ऐकतांच सुमंतानें रथाखालीं उतरून श्रीरामचरणीं मस्तक ठेवलें आणि नयनोदकानें चरणक्षालन करून ह्मणाला—प्रभो ! आतां माझ्यानें अयोध्येस सर्वांना दुःख देण्यासाठीं परत जाववत नाहीं. हा रथ रिकामा पाहतांच दशरथ आणि माता कौसल्या प्राणत्याग करतील व त्यांची हत्या मजवर पडेल. मला सर्व लोक काळतोंड्या ह्मणतील. यासाठीं आतां आपण येरपर्यंत मी येथेंच राहीन, अथवा प्राणत्याग करीन. असें ऐकतांच रामानें त्याला हृदयाजवळ धरिलें आणि सांगितलें—प्रधानजी ! आपण चिंता करूं नका. माझी आज्ञा मान्य करून आपण अयोध्येस परत जा. मी चौदा वर्षें भरतांच अयोध्येस येऊन सर्वांचें शांतवन करीन, असें सर्वांस सांगा. इतकें बोलून त्याच्या मस्तकावर श्रीरामचंद्रानें वरदहस्त ठेवितांच त्याचा शोक दूर झाला. नंतर राम पैलतीरीं जात असतां सुमंत उभा राहून त्यांजकडे पाहत राहिला. नंतर निवृत्तितटाकीं जाऊन जसा योगी उभा राहतो, तसा राम भागीरथीच्या पैलतीरीं नावेंतून उतरून उभा राहिला आणि सुमंताला हातानें पालवून लौकर माघारा जा असें सांगूं लागला.

नंतर सीता, राम आणि लक्ष्मण हीं तिघें तेथून निघून एक रात्र पुष्करतीर्थावर राहिलीं आणि दुसऱ्या दिवशीं प्रयागास गेलीं. तेथून पुढें भारद्वाजऋषींच्या आश्रमासन्निध जातांच तो ऋषि शिष्यांसह धांवत सामोरा आला. रामानें त्याला पाहतांच नमिलें आणि त्यानें प्रेमानें

रामाला प्रेमालिंगन दिलें. राम मूळ पाठविल्याशिवाय आपल्या आश्रमीं आला ह्मणून भारद्वाजानें आपल्या तपाचें आणि जन्माचें सार्थक मानलें. नंतर त्या ठिकाणीं रामदर्शनासाठीं कित्येक ऋषि धांवत आले आणि त्या परब्रह्ममूर्तीला पाहून संतोष पावले. त्या ठिकाणीं राम एक दिवस राहून जेव्हां पुढें निघाला, तेव्हां सर्व ऋषि रामाला आग्रहपूर्वक सांगू लागले—रामा! दंडकारण्यांत न जातां चौदावर्षें तूं याच ठिकाणीं रहा. असें ऐकतांच रामानें त्या सर्वांस उत्तर दिलें—मी जर याच ठिकाणीं राहिलों; तर माता, बंधू आणि अयोध्येंतील प्रजा नित्य भेटण्यासाठीं या ठिकाणीं येऊन राहतील; ह्मणून आह्मी गुप्तरूपानेंच पुढें संचार करणार आहों. असें ऐकतांच सर्व निरुत्तर झाले. नंतर राम ऋषींला विचारून पुढें निघाला; तेव्हां भारद्वाज सिद्धवटापर्यंत त्याला पोंचवीत गेले आणि पुढें चित्रकूटावर अनेक संत महंत राहतात, असें सांगून परतले. सिद्धवट पाहतांच रामानें त्याला नमन केलें आणि सीतेनें वटस्थसावित्रीदेवीची पूजा केली. त्या ठिकाणीं सीतेनें नवस केला कीं, राम विजयी होऊन आह्मीं सर्व अयोध्येस परत गेलों ह्मणजे मी या ठिकाणीं दोन लक्ष गोदानें आणि ब्राह्मणसंतर्पण करीन. असो. राम तेथून चित्रकूटपर्वतावर गेला आणि ज्यानें अवतारा आधीं जन्मचरित्र वर्णन केलें होतें, त्या वाल्मीकऋषीला राम भेटला. त्याचप्रमाणें इतर ऋषींची रामानें व ऋषींनीं रामाची पूजा केली. नंतर त्या ठिकाणीं लक्ष्मणानें पर्णकुटि तयार केली आणि त्या ऋषिमंडळींत राम सीतासौमित्रासह राहिला.

गुहकाचे दूत राम कोठें जाऊन राहतो हें पाहण्यासाठीं त्याच्या मागून होते, त्यांनीं राम चित्रकूटपर्वतावर जाऊन राहिला, असें वर्तमान सांगतांच गुहकानें सुमंताला आपल्या घरीं नेलें आणि दोघांनींही राम

वनवासी झाल्यामुळें फार दुःख केलें. नंतर रथासहित सुमंत अयोध्येस परत आला; तों ती अयोध्या त्याला प्रेतवत् दिसूं लागली. रामाला वनांत सोडून आल्याबद्दल त्याला फार खेद झाला व तो आपल्या तोंडावर पदर घेऊन चालला. त्यानें तो रथ कैकयीच्या मंदिरासमोर आणून सोडला आणि राजाचें दर्शन घ्यावें ह्मणून मंदिरांत प्रवेश केला, तों सुमंतानें रिकामा रथ परत आणला, अशी बातमी शहरांत जातांच घरोंघरीं लोक आक्रांत करूं लागले. रामवियोगामुळें सर्वांस अत्यंत दुःख झालें.

इकडे कैकयीच्या मंदिरांत राजा कंठीं प्राण धरून राहिला होता. सुमंत त्याला नमन करण्यासही लाजूं लागला. इतक्यांत दशरथराजा त्याला ह्मणाला—सुमंता! माझ्या रामाला कोठें सोडून आलास? मला वाटतें, तूं माझ्या प्राणालाच मूळ आला आहेस. अरे, मी आपलें रामनिधान तुझ्या हातीं दिलें होतें, तें कोठें भिरकावून आलास मला सांग. अरेरे! माझी अंधाची काठी कोठें नेऊन टाकलीस? देवा! माझीं बालकें वनांत उपाशीं निरहार राहून कष्ट भोगतील. सुमंता! सुकुमार जनकतनया रथाखालीं कशी उतरली आणि माझीं कोमल बालकें कोणत्या मार्गानें गेलीं मला सांग? असें एकतांच तो सुमंत सद्गदकंठानें रामाकडील वर्तमान सांगूं लागला. तो ह्मणाला—महाराज! ती तिघें तीनदिवसपर्यंत निराहार होतीं. प्रभु तृणशय्येवर शयन करीत असे. पांघरण्यास नुस्तें आकाश. ह्या सर्व आपदा मी आपल्या नेत्रांनीं पाहिल्या आणि शृंगवेरापर्यंत त्यांना पोंचवून परत आलों. मायानदी उल्लंघून संत जसे स्वरूपीं लीन होतात; तसा राम भागीरथी उल्लंघून पलीकडे गेलेला मी पाहिला. तेथून हातानें खुण करून त्यानें मला परत जा ह्मणून सांगितलें आणि लक्ष्मण व सीतादेवीसह तो पायांनींच पुढें अर-

त्यांत निघून गेला. रामानें तुम्हां सर्वांस साष्टांगनमस्कार सांगितला आहे. याप्रमाणें सुमंताचीं भाषणें ऐकतांच दशरथानें धबाधब वक्षस्थळ बडवून घेतलें आणि अपार शोक आरंभिला. रामा! राजीवनेत्रा! कोठें गेलास मला सोडून? असें वारंवार ह्मणत असतां तो कपाळ आपटून घेऊं लागला आणि शेवटीं त्यानें रामा धांव माझे प्राण चालले. रामा! रामा! असें ह्मणून प्राण सोडला.

कर्मगति गहन आहे. दशरथराजाला चौघे पुत्र असतां त्याच्या अंतकालीं एकही जवळ नाहीं. तेव्हां सुमंत प्रधान धांवला आणि त्यानें त्याच्या उशाला मांडी दिली. इतक्यांत कौसल्या व सुमित्रा जवळ आल्या आणि पति मरण पावलेला पाहतांच अत्याक्रोशानें कपाळ आपटूं लागल्या. आधींच रामवियोगाचें दुःख, त्यांत पति मरण पावला; मग त्या शोकाला काय विचारावें? राजाच्या सांतशें स्त्रिया त्या ठिकाणीं धांवत आल्या व महाशब्देंकरून ओरडूं लागल्या. सगळी अयोध्या हडबडली व लोकांपुढें तुंबळ शोक येऊन उभा राहिला. वाघाच्या भयानें धांवत असतां अस्वलानें येऊन गळ्याला मिठी मारल्याप्रमाणें कौसल्या व सुमित्रा यांस झालें. त्या दोघीही प्राण देण्यास तयार झाल्या व आकांत करीत कपाळें आपटूं लागल्या. इतक्यांत वसिष्ठ त्या ठिकाणीं आले आणि सर्वांचें शांतवन करीत असतां ह्मणाले—आतां शोक करणें व्यर्थ आहे. भरताला आणून राज्यावर बसवा. एक राजा सिंहासनावर आल्याशिवाय राजाचें प्रेत दहन करूं नये.

नंतर राजाचें प्रेत तेलाच्या कढयींत ठेवून वसिष्ठांनीं सुमंताला सांगितलें—आतां पुनः रथ घेऊन जा आणि सूर्योदयाच्या आंत भरताला घेऊन ये. भरत प्रेमळ भक्त आहे. राम वनांत गेला किंवा दशरथ राजानें

देह मोडला, हें वर्तमान त्याला सांगूं नको. जर सांगशील तर तो तेथेंच देह टाकील. असें ऐकतांच सुमंत रथ घेऊन अतित्वरेनें चालता झाला.

इकडे त्याच रात्रीं मातुलग्रामीं भरतानें दुष्ट स्वप्न पाहिलें कीं, एक कृष्णवर्ण स्त्री काळें लुगडें नेसून आली व मस्तकाला तेल जिरवूं लागली हें स्वप्न पाहून जागा होतांच तो कांहींतरी घात आहे, असें मानून शोक करूं लागला. त्याला असेंही वाटलें कीं, आह्मी चौघे बंधु आणि राजा दशरथ या पांचांतून कोणाचा तरी घात आहे. अथवा जो प्राणसखा तोच अंतरणार आहे. असो. भरत जेव्हां शोक करूं लागला; तेव्हां संग्रामजितानें त्याला पोटाशीं धरून सांगितलें—उदयीक सूर्योदय झाला ह्मणजे दळभार सिद्ध करून तुला अयोध्येस पोंचवितों. शोक करूं नको. असें बोलत आहे तों रात्र सरली.

भरत व शत्रुघ्न उद्विग्नचित्तानें ग्रामाबाहेर जाऊन अयोध्येच्या मार्गाकडे लक्ष्य देऊन बसले आहेत; तों एकाएकीं मंदमंद रथ येत असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. अश्वांच्या नेत्रांतून पाणी चाललें आहे, ध्वजवस्त्र मलीन झालें आहे, व त्या रथांत बसून एकटाच सुमंत येत आहे, तरी तोही वारंवार नेत्रांला पदर लावीत आहे; अशीं विपरीत चिन्हें पाहतांच दोघेही रथाकडे धांवत गेले. सुमंतानें भरताला पाहतांच रथाखालीं उतरून क्षेमालिंगन दिलें आणि तुह्मांला लौकर बोलाविलें आहे असा निरोप सांगितला.

भरत वारंवार सुमंताच्या मुखाकडे पाहून संशयानें विचारूं लागला—अयोध्येंतील वर्तमान काय आहे? राम सुखी आहेना? दशरथतात सुखी आहेना? इत्यादि अनेक प्रश्न जरी भरतानें केले, तरी सुमंतानें राम सुखी आहे व तुह्मांला लौकर बोलाविलें आहे, इतकेंच उत्तर दिलें. तें ऐकतांच दोघेही रथांत बसले व धुरेस सुमंत बसून त्यानें वेगानें रथ

चालविला. तो वारंवार डोळे पुशीत असे व तें पाहून भरत सद्गदीत होत असे. इतक्यांत अयोध्या दिसूं लागली, पण ती दग्धारण्याप्रमाणें भरताला वाटली. घरोघरीं नरनारी शोक करीत आहेत, असेंही त्याला वाटलें. मंगलवाद्यांचा घोष नाहीं, मंदिरावरील कळस ढळलेले आहेत, इत्यादि दुश्चिन्हें अनुभवितांच भरताचें मन चरकलें; तों सुमंतानें रथ कैकयीच्या मंदिरासन्निध नेला. इतक्यांत छत्रभंग झालेला भरताच्या दृष्टीस पडतांच तो आक्रोश करीत रथाखालीं पडला. त्याला लोकांनीं सांवरून राजाच्या प्रेतासन्निध नेलें. तें दशरथाचें प्रेत पाहतांच तो शोकानें गडबड लोळूं लागला. इतक्यांत शोकाकुल झालेली प्रजा येऊन भरतासभोंवती उभी राहिली. नंतर सुमंतप्रधानानें त्याला सांवरून उठविलें, तरी भरताच्या शोकास पार नाहींसा झाला. त्याला सर्व दिशा शून्य दिसूं लागल्या.

शोक करीत असतां भरताला वाटलें, आतां रामाला तरी भेटावें; ह्मणजे कांहींतरी शांतता येईल. तो प्रधानाला ह्मणाला—मला रामचरणांवर तरी घाला. तो ज्येष्ठभ्राता मला दशरथासमान आहे. असें बोलून तो जेव्हां रामसदनाकडे निघाला, तेव्हां कौसल्या आकांत करीत पुढें आली. तिला पाहतांच भरतानें तिचे पाय धरले आणि माते! राम कोठें आहे? मला दाखीव असें ह्मणूं लागला; पण ते शब्द ऐकतांच कौसल्येला आधीं मूर्च्छना आली. नंतर कांहीं वेळानें सावध होऊन आक्रोश करीत असतां भरताला ह्मणाली—बाळा! राम तपोवनांत गेल्याकारणानेंच महाराजांनीं प्राणत्याग केला. असें ऐकतांच भरतानें कपाळ भुईवर आपटलें आणि अतिशय शोक करूं लागला, तो कोठवर वर्णन करावा? तो ह्मणूं लागला—रामा राजीवनयना! कसारे मला टाकून गेलास? अरे! तूं

जातांच दशरथानें जसा प्राण सोडला; तसा माझा प्राण कां जात नाहीं ? किंवा रामवियोगामुळें मृत्यूच मरण पावला ह्मणून तो मला येत नाहीं ? ताता दशरथा ! तूं खरा प्रेमळ, ह्मणून रामवियोगाचें दुःख सहन करीत न बसतां प्राण सोडलास.

याप्रमाणें भरत शोकग्रस्त झाला आहे, तों वसिष्ठ त्या ठिकाणीं आले आणि भरताचें मन पाहण्यासाठीं ह्मणाले–भरता ! ऊठ आतां. तुला राज्यावर बसविल्याशिवाय राजाचें और्ध्वदेहिक करितां येत नाहीं. तुझ्या मातेच्याही मनांत असेंच आहे; ह्मणून तिनें रामाला अरण्यवास करण्यासाठीं पाठविलें. याप्रमाणें वसिष्ठ बोलतांच भरत दीर्घस्वरानें रुदन करूं लागला. तो ह्मणाला–राम वनांत असतां जर मी राज्य करीन, तर जगांत जितके ब्राह्मण आहेत; तितक्यांच्या हत्या माझ्या मस्तकावर पडतील. रामाला सिंहासनावर न बसवितां जर मी बसेन तर विधवा जारिणीच्या पोटीं मी जन्म घेतल्याप्रमाणें होईल. तोच राज्याला योग्य. मी जर रामाला वनांत धाडून राज्यावर बसलों तर गुरुवध, मद्यपान, मात्रागमन, इत्यादि दोष मला लागतील. कदाचित् वासरमणीला कलंक लागेल, गंगाजलांत पातक प्रवेश करील, मृगजलांत अगस्ति बुडेल, कोळ्याच्या सुतानें धरणी उचलेल; पण मी रामाला वनांत ठेवून राज्य करणार नाहीं. असो. तो भरत अनेक प्रकारें राज्य न करण्याविषयीं शपथा वाहून वसिष्ठास ह्मणाला–महाराज ! मी तुमच्या चरणांवर हात ठेवून व रामाची शपथ घेऊन सांगतों कीं, मी आपल्याला राज्याभिषेक करूं देणार नाहीं. कैकयी माझी माता नव्हे व मी तिचा पुत्र नव्हे; त्या काळतोंड्या अवदसेला वैधव्य आवडलें, ह्मणून रामाला वनांत पाठवून तिनें राजाचा प्राण घेतला

याप्रमाणें भरताचें निस्पृह भाषण ऐकतांच वसिष्ठ मनांत आनंद पावले

नंतर त्यांनीं सविस्तर वर्तमान त्याला कळविलें. मंथरादासीच्या बोलण्यानें हा अनर्थ झाला, असें कळतांच भरत रागानें धांवून गेला आणि मंथरेची वेणी धरून शस्त्र काढून तिचा वध करूं लागला. तेव्हां वसिष्ठांनीं त्याचा हात धरिला आणि विपरीत स्त्रीवध करूं नको, असें सांगितलें. तरी भरताचा राग आवरेना; ह्मणून त्यानें तिला लाथेनें इतकें मारलें कीं, त्यामुळें ती तीन ठिकाणीं वांकडी झाली आणि सर्व लोक तिला त्रिवक्रा कुब्जा ह्मणूं लागले. नंतर भरताचा पूर्ण निग्रह पाहून वसिष्ठांनीं रामाच्या पादुका सिंहासनावर स्थापन केल्या आणि त्यांवर छत्र धरून भरताकडून राजा दशरथाचा देह अग्निमुखीं अर्पण केला. त्यावेळेस राजाच्या सातशें स्त्रियांनीं सहगमन केलें. कौसल्या सुमित्राही अग्निप्रवेश करण्यास तयार झाल्या होत्या; परंतु वसिष्ठांनीं शास्त्रप्रमाणानें त्यांना सांगितलें कीं, पुत्रवत्या स्त्रियांनीं सहगमन करूं नये. असें ऐकतांच उद्वेग पावलेली कौसल्या त्यांस ह्मणाली—आह्मांला कशाला व्यर्थ राहवितां? राम वनवासी झाला आणि महाराजांनींही परलोकीं गमन केलें; तर आमचें येथें काय आहे? कौसल्या असें बोलतांच वसिष्ठांनीं शपथ वाहून सांगितलें कीं, मी चौदावर्षांनीं तुह्मांला रामाची भेट खचित करून देईन. शिवाय त्यांनीं वाल्मीकाचा वचनार्थ कळवून चित्रकूटावर राम तुह्मांला भेटेल, असें जेव्हां निश्चयपूर्वक सांगितलें; तेव्हां त्या दोघींनीं अग्निप्रवेश करणें वर्ज्य केलें. नंतर भरतानें राजाचें उत्तरकार्य केलें.

एकेदिवशीं मध्यरात्रीं कैकयी भरताकडे आली आणि भरताला विचार सांगूं लागली—बाळा! रामाला वनांत पाठवून हें राज्य मी मोठ्या संकटानें मिळविलें आहे. रामलक्ष्मण वनांत गेले आहेत; यांत आपलें कल्याण

मानून तूं सिंहासनावर बैस. पितृवचन सत्य करण्याकरितां राम वनांत गेला आणि त्याच्या शोकानें राजा मरण पावला; हेंही एका अर्थी बरेंच झालें आहे. राम तुझा सापत्नबंधु होय. त्याच्याजवळ त्वां वंचनच केलें पाहिजे. देवदैत्य, गरुडसर्प, हे सापत्नबंधू अद्याप वैरानें वागतात, या गोष्टीचा हेतु काय'? हें तूं आपल्या मनांत आणून राज्यछत्राचा स्वीकार कर. जर तूं माझा पुत्र आहेस, तर माझें वचन वेदवाक्याप्रमाणें मान्य कर. असें ऐकतांच भरत अत्यंत कोपानें तिला ह्मणाला—चांडाळणी निर्दये ! तूं अमंगल ओंवसट आहेस; ह्मणूनच रामाला वनांत पाठवून तूं दशरथाचा प्राण घेतलास. तर पिता व बंधु ज्या मार्गानें गेले, त्याच मार्गानें मी जाईन. तुझा वधच केला असता, परंतु माता ह्मणून सोडिली. जा. आपलें काळें तोंड मला पुनः दाखवूं नको. असें ऐकतांच कैकयी उठून गेली.

दुसऱ्या दिवशीं सूर्योदय होतांच भरतानें अंगाला भस्म लावलें; वस्त्रालंकारांचा त्याग करून वल्कलें परिधान केलीं, वटदुग्ध घालून मस्तकावरील केसांच्या जटा वळल्या आणि तो पायांनीं चालत रामदर्शनासाठीं निघाला. त्या वेळेस सोळापद्म दळभार बरोबर निघाला. सुमित्रा व कौसल्या शिबिकेंत बसून निघाल्या; फार काय सांगावें ? सर्व अयोध्या नगरींतील प्रत्येक प्राणिमात्र रामदर्शनासाठीं शहर ओसाड टाकून भरताबरोबर चालूं लागले. चारी वर्णांची प्रजा आणि वसिष्ठादि ब्राह्मण अतिउत्सुकतेनें जेव्हां बाहेर निघाले, तेव्हां कुटाळलोक ह्मणूं लागले—आतां कैकयीचें वपन करून तिजवर छत्र धरा. खरोखर जरी ती अमंगळ आहे, तरी काकविष्ठेपासून जसा अश्वत्थ होतो; तसा तिच्या पोटीं हा भरत महाभक्त उत्पन्न झाला.

अयोध्येच्या बाहेर आल्यानंतर भरत सुमंताला ह्मणाला—प्रधानजी !

ज्या मार्गानें राम गेला तोच मार्ग मला दाखवा. मी तुमच्या अनुमतानें चालेन. असो. दळभारासह भरत गुहकाश्रमासन्निध येतांच गुहकानें विचार केला—त्या भरतशत्रुघ्नांस कैकयीनें सैन्यासह रामलक्ष्मणाच्या वधार्थ पाठविलें असावें. असें मनांत येतांच हजारों कोळी जमवून तो भागीरथीचें तीर रोधून युद्धासाठीं उभा राहिला. हें वर्तमान भरतापर्यंत येतांच शत्रुघ्न आणि सेनापति त्याला शिक्षा लावून मार्ग मोकळा करण्यास तयार झाले. तेव्हां भरत ह्मणाला—तो रामभक्त आहे असें ऐकतों, तर शोध केल्याशिवाय युद्धारंभ करूं नका. असें बोलून तो स्वतः पुढें झाला आणि गुहकास युद्धाच्या तयारीचें कारण विचारूं लागला. तेव्हां तो ह्मणाला—तुह्मीं सैन्यासह रामाचा वध करण्यासाठीं अरण्यांत निघालों आहां, ह्मणून मी युद्ध करणार. जे रामाचे द्वेषी ते माझेही द्वेषीच होत. तुह्मीं कैकयीचें ऐकून रामाचा वध करण्यासाठीं निघालां आहां; तर मी तुह्मांला भागीरथीचें नीर स्पर्शूं देणार नाहीं.

हें भाषण ऐकतांच भरत दीर्घ रुदन करून ह्मणाला—गुहका! मी कैकयीच्या पोटीं उत्पन्न झालों आहें, ह्मणून पहिल्यानें बाण सोडून माझा शिरच्छेद कर. मी तिचा पुत्र, ह्मणून लोक मला रामाचा वैरी ह्मणतात; तें दूषण तरी नाहींसें होऊंदे. मला रामवियोगाचें दुःख सहन होत नाहीं. तूं तरी निर्वाण बाण सोडून मला रामचरण दाखीव. याप्रमाणें भरताचें भाषण ऐकतांच त्याचें शुद्धांतःकरण ओळखून गुहकानें त्यास आलिंगन दिलें. त्यावेळेस ते दोघेही जटाजूट बांधिलेले व भस्मोद्धूलन केलेले रामभक्त एकसारखे दिसले.

नंतर गुहक वसिष्ठादि ब्राह्मणांस व भरतास ह्मणाला-श्रीराम चित्रकूटास गेला आहे; तुह्मांला दाखवितों चला. नंतर भरतानें स्नान करून ज्या ठिकाणीं राम एक दिवस राहिला होता; तें स्थळ पाहिलें आणि

गुहकासमवेत चित्रकूटाचा मार्ग धरिला. हजारों नौका आणून गुहकानें सैन्य उतरलें आणि सर्व रामदर्शनोत्सुक होत्साते चित्रकूटास निघाले.

इकडे चित्रकूटावर राम होम करीत बसला आहे, लक्ष्मण फुलें आणायासाठीं अरण्यांत गेला आहे आणि सीता रामाला होमद्रव्यें आणून देत आहे तों सुदर्शन नामक गंधर्व सीतेचें रूप पाहून मोहित झाला आणि अमंगळ कागाचें रूप धरून तिला स्पर्श करण्यासाठीं आला. तेव्हां सीता घाबरून अहो प्राणनाथ ! धांवा हो धांवा ! कागानें माझी विटंबना केली, असें मोठ्यानें ओरडली. ते शब्द ऐकतांच रामानें ओळखलें आणि जवळ लक्ष्मण नाहीं व हवन मोडून उठतां येत नाहीं; ह्मणून त्या दाशरथीनें एक दर्भ अभिमंत्रण करून कागावर सोडला. तो प्राणघातक दर्भरूपी बाण आपल्यावर येत आहे, असें पाहतांच तो कावळा घाबरला आणि इंद्रादिदेवांस शरण गेला; पण कोणीही त्याचें रक्षण करीना. शेवटीं नारदाच्या उपदेशावरून प्राणरक्षणासाठीं तो रामासच शरण गेला. तेव्हां रामानें त्याचा प्राण रक्षण करून सव्य नेत्र फोडला व त्यास मुक्त केलें.

तो कागरूपी गंधर्व जेव्हां निर्भय होऊन निघाला, तेव्हां रामाला ह्मणाला—प्रभो ! आतां मला कांहीं तरी वर दे. असें एकतांच राम ह्मणाले—तुझ्या एका नेत्रांतील बुबुळ दोन्ही नेत्रांत चपलतेनें फिरेल व सर्वांत कागदृष्टि नांवाजली जाईल. आतां तूं सीतेला स्पर्श करण्यासाठीं धांवला होतास, ह्मणून सर्व पक्ष्यांत कनिष्ठ ठरशील व विष्ठाभक्षण करशील. तरी तुला वर देतों कीं, प्रेतपिंडाला तूं स्पर्श केल्याशिवाय जीवांचा उद्धार होणार नाहीं. याप्रमाणें वरदान मिळतांच तो सुदर्शनगंधर्व रामाला नमस्कार करून आनंदानें आपल्या ठिकाणीं निघून गेला.

नंतर वसिष्ठाज्ञेनें राम गयेस गेला आणि दशरथाचें उत्तरकार्य करून त्यानें भरथाला निजपदीं स्थापिलें. सर्व विधि यथासांग झाल्यावर सर्व अयोध्यावासीजन रामचंद्राला वेष्टून बसले असतां भरत नेत्रांत प्रेमाश्रु आणून लोटांगण घालीत रामापुढें आला आणि त्याचें अपार स्तवन करून ह्मणाला–कौसल्याहृदयरत्ना रामचंद्रा! हे रविकुलभूषणा! क्षुधितास क्षीराब्धि पाहून जसा आनंद होतो, तसे आह्मीं सर्व केवळ तुझ्या दर्शनानें आनंद पावणारे आहों. तर हे बंधो! आतां अयोध्येस परत चलावें आणि श्रीदशरथाप्रमाणें प्रजेचें पालन करावें; हें सर्व राज्य तुझें आहे. त्वां गोब्राह्मणप्रतिपाळ करून प्रजेला संतोषवावें अशीच सर्वत्रांची इच्छा आहे. शिराचा भाग सोडून पुढच्याला पूजा बांधावी, किंवा पूज्यमूर्ति टाकून गुरवाचे पाय धरावे; याप्रमाणें माझी जननी अति चतुरपणानें बोध करून मजवर छत्र धरीत होती, तिला हिरा टाकून गारगोटी आवडली. तरी हे जगदोद्धारा राघवा! आतां सर्वापराध क्षमा करून अयोध्येस चलावें आणि राज्यपदारूढ होऊन सर्वांचें शांतवन करावें, अशी माझी प्रार्थना आहे. असें ऐकतांच रामानें त्याला सांगितलें–भरता! वेळेस सूर्य भ्रमण करीत असतां मार्ग चुकेल, मशकाची धडक लागून मेरुपर्वत कोसळेल, पाषाणांचा प्रहार होऊन वायूचा पाय मोडेल; पण मी आपलें वचन असत्य करणार नाहीं. मी एकबाणी, एकवचनी व एकपत्नीव्रताचरणी आहें. चौदावर्षें पूर्ण भरल्याशिवाय अयोध्येस परत येणार नाहीं. याप्रमाणें निश्चयात्मक भाषण ऐकतांच भरताचें मन अग्नीनें पुष्प आहाळतें तसें आहाळून गेलें आणि अग्निकुंड तयार करून तो प्राण देण्यास सिद्ध झाला. तेथें वाल्मीकांनीं येऊन त्याला आपला मूळ काव्यार्थ सांगितला व त्याचें समाधान केलें. इतक्यांत रामानें त्याला हृदयाजवळ धरून शांतवन करीत असतां त्याचे

नेत्र आपल्या हातीं वल्कलानें पुसून सांगितलें—भरता ! चौदावर्षें व चौदा दिवस मात्र मी अरण्यांत राहीन आणि पंधराव्या दिवशीं दोन प्रहरांवर सूर्य आला नाहीं, तों येऊन तुला भेटेन; हें माझें तुला वचन आहे. असें बोलून त्याला भाक देतांच भरत सद्गदित होऊन ह्मणाला—हा नेम जर टळला, तर मी देहत्याग करीन. रामा ! आतां मला तुझ्याशिवाय अयोध्येंत परत जाववत नाहीं. सकल मंगलभोग टाकून नंदिग्रामीं जाऊन राहीन. रामानें हें कबूल केलें आणि त्याला आपल्या मणिमय पादुका दिल्या; त्या त्यानें मस्तकीं धारण केल्या. नंतर त्यानें शांतपणानें रामवचनावर विश्वास ठेवून शोकाचा त्याग केला.

इतकें झाल्यावर सुमंत व शत्रुघ्न यांस रामानें यथान्याय राज्य चालवा अशी आज्ञा करून बोध केला कीं, संतसज्जनांचें स्तवन करावें, गुरुभजनीं सावध असावें, दुर्जनांचा त्याग करावा, वेदमर्यादा उल्लंघन करूं नये, संकटसमयीं धैर्य सोडूं नये, साधु, संत, गाई, ब्राह्मण, यांचें पालन करावें, दुष्टांस दंड करून स्वधर्माचें रक्षण करावें, सत्संग धरावा, दुर्जनांची बुद्धि ऐकूं नये, संतांचा मानभंग करूं नये, कोणाचें वर्म काढूं नये, ऋषींचे आशीर्वाद घेत असावे, मी सज्ञान झालों असा अभिमान कधींही करूं नये, विनोदानेंही दुसऱ्याचा छल करूं नये, शमादिसाधनें कधीं दूर करूं नयेत, शोकमोहाचे चपेटे अंगीं आदळतात, असें जर वाटलें तर विवेकाचें ओढण ( ढाल ) पुढें करावें. कामक्रोधादि तस्करांस थारा देऊं नये, आयुष्य क्षणिक जाणून सारासार विचार करावा, संसार क्षणिक समजून विषयांवरील ममत्व कमी करीत असावें, दैवानें थोर भाग्य आलें तरी त्याचा गर्व करूं नये आणि भाग्यक्षय झाला तरी शोकवश होऊं नये. याप्रमाणें रामचंद्राचीं अनेक शब्दरत्नें सुमंत व शत्रुघ्न

यांनीं आपल्या कर्णपेटींत सांठविलीं. नंतर दोघी माता, ब्राह्मण आणि प्रजा याचें शांतवन करून रामानें सर्वांस अयोध्येस पाठविलें. भरत मात्र नंदिग्रामासंनिध अरण्यांत पर्णकुटिका बांधून तापसवेषानें राहिला. त्याच्याबरोबर रामाचे आवडते मित्र व ब्राह्मण रामलीला वर्णन करीत विरक्त होऊन राहिले. शत्रुघ्न व सुमंत रामाच्या पादुकांवर छत्र धरून यथान्याय राज्य चालवूं लागले. त्यांतच शत्रुघ्न वारंवार नंदिग्रामीं येऊन भरताचा समाचार घेत असे.

नंतर राम सीतालक्ष्मणासह चित्रकूटावर रहात असतां एके दिवशीं कित्येक बहिर्मुख ( नास्तिक ) ब्राह्मण येऊन रामाला ह्मणाले–तूं या पर्वतावरून निघून जा. कारण–तुझ्यापासून आह्मांला फार त्रास होतो. तुझ्या सुंदर स्त्रीला हरण करावी ह्मणून कित्येक असुर टपून आहेत आणि वाल्मिकाचें भाष्यही तसेंच आहे. शिवाय असें वर्तमान आलें आहे कीं, खर, दूषण व त्रिशिरा तुझ्यावर सैन्यासह येणार आहेत, त्यावेळीं तूं आपली स्त्री संभाळशील कीं आमचें रक्षण करशील? तुझे चार बाण संपून गेले ह्मणजे तुजपाशीं काय आहे बरें? विचार कर. असें ऐकतांच राम त्यांस ह्मणाला–तुह्मीं चिंता करूं नका. स्वस्थांतः–करणानें तपश्चर्या करा. तुह्मांला विघ्न करण्यास काळ जरी आला, तरी त्यालाही मी दंड करीन. मग राक्षसांची कथा काय? याप्रमाणें रामानें जरी त्या ब्राह्मणांस धीर देऊन सांगितलें, तरी त्याच रात्रीं सगळ्यांनीं एक विचार करून चित्रकूटाचा त्याग केला.

दुसऱ्या दिवशीं राम जागृत होऊन पाहतो तों सगळे विप्र सहकुटुंब पळून गेले, एक वाल्मीकऋषि मात्र उरला. त्या ब्राह्मणांनीं रामस्वरूप न ओळखतां अज्ञानपणानें जेव्हां चित्रकूट पर्वताचा त्याग केला, तेव्हां

वाल्मीकऋषीला नमस्कार करून रामही त्या पर्वताचा त्याग करून सीतासौमित्रांसह दंडकारण्याच्या मार्गास लागला. येथपर्यंत रामायणाचें अयोध्याकांड पूर्ण झालें.

---



अध्याय १३ वा.



# अध्याय १३ वा.

चित्रकूटाहून सीतासौमित्रांसह राम दक्षिणदिशेकडील दंडकारण्याच्या मार्गानें फिरत असतां त्यानें अनेक भक्तांचा उद्धार केला आणि अनेक ऋषींचे आश्रम पाहिले. त्यानें कोठें वर्ष, कोठें सहा महिने, कोठें मास, पक्ष, पंचरात्रि, एक रात्र, असा वास करून तेरावर्षें पूर्ण केलीं. नंतर अत्रिऋषीच्या आश्रमीं येऊन त्यानें जिची अविनाश स्थिति आहे, अशी दत्तमूर्ति अवलोकन केली आणि प्रेमभावानें तिचें पादवंदन केलें.

ज्याच्या दर्शनानें अनंतजीवांचा उद्धार होतो, ज्याला पूर्ण परब्रह्मरूप असें ह्मणतात. ब्रह्मा, विष्णु, महेश, महर्षि ज्याचें त्रिकाल दर्शन घेतात, ज्याचें नित्य प्रयागीं स्नान होतें, जो नित्य पांचालेश्वरीं अनुष्ठान करितो. जो माध्यान्हीं करवीरास भिक्षाटन करीत आहे आणि जो सूर्यास्तीं सह्याद्रीस गमन करितो, त्या दत्तात्रेयाचें व रामाचें प्रेमालिंगन जेव्हां झालें, तेव्हां दोघे क्षणभर एकरूप दिसले. असो. त्या अत्रीच्या महा पुण्यपर्वताचें दर्शन घेतल्यानंतर रामलक्ष्मण व सीता यांनीं अत्रि व अनसूया यांस वंदन केलें. अनसूयेनें सीतेला मातृप्रेमानें पोटाशीं धरून अक्षय कुंकू लावलें. जें कधीं विटणार नाहीं व मळणार नाहीं, असें अमल वस्त्र सीतेस नेसविलें आणि कधींही न सुकणारा पुष्पहार तिच्या कंठांत घातला. नंतर तिनें सीतेच्या अंगाला एक असा अंगराग लाविला कीं, ज्याचा सुवास कधींही जाणार नाहीं. तर्के करून तिनें सीतेला वर दिला कीं, राक्षस भेटले असतां तुला भय वाटणार नाहीं.

त्या सह्याद्रीवरच रामानें रेणुकेचें दर्शन घेतलें. जिच्या वरदानें-

करून भार्गवानें एकवीस वेळ पृथ्वी जिंकली व जी पूर्वीच्या अवताराची माता, तिला नमस्कार करून अनेक प्रकारें स्तवन करीत असतां राम ह्मणाला–हे आदिकुमारिके, मूलपीठवासिनी, सौभाग्यदायके, जगदंबिके! त्वां ब्रह्मादिबालकांस स्वानंदसदनीं निजवून केवळ कौतुकास्तव जीव आणि शिव हीं दोन बालकें निर्माण केलींस, त्यांपैकीं जीव तुझें स्वरूप न ओळखतां आवर्तांत पडला व शिव तुला ओळखून नित्य मुक्त झाला. तुझ्याच कृपेनें ब्रह्मानंदपदाची प्राप्ति होत आहे. हे जननी! तूं इच्छामात्रेंकरून पंचभूतात्मक हा ब्रह्मांडगोल निर्माण केलास. जेव्हां तुझी इच्छा परतेल तेव्हां याचा लय होईल; तर आह्मांवर कृपा करून आह्मांस यशस्वी कर. याप्रमाणें स्तवन करून राम अत्रिऋषीच्या आश्रमांत तीन दिवस राहिला आणि चौथ्या दिवशीं दक्षिणपंथ धरून सीता सौमित्रांसह निघाला. त्यावेळेस अत्रीनें रामाला सांगितलें–या वनांत बहुत राक्षसांचा वास आहे, यासाठीं रामा! सीतेला संभाळ बरें. राम हें वचन आदरानें मान्य करून पुढें गेला.

अत्र्याश्रमांतून निघाल्यावर पुढें राम, त्याच्या मागें लक्ष्मण व दोघांच्या मागून गजाच्या मंदगतीनें जानकी चालत असतां जेव्हां फार मागें राहिली, तेव्हां लक्ष्मण ह्मणाला–प्रभो! जनकतनया फार मागें राहिली आहे; कृपाकरून क्षणभर उभें रहावें. असें ऐकतांच राम सुहास्यवदनानें मुरडून सीतेकडे पाहूं लागला; तों जानकी हळुहळू जवळ आली आणि राममुखाकडे पाहतांच किंचित् सलज्ज व हास्यवदनानें ह्मणाली–प्राणनाथ! आज चालतांना आपल्या कोमल चरणांला श्रम झाले असें मला वाटतें. हे भाऊजी तरी किती श्रमले आहेत? आज अजून किती दूर जायचें आहे? असें ऐकतांच रामचंद्राच्या हृदयाला द्रव आला

आणि त्या मायाळू रामचंद्रानें स्वहस्तें तिचें वदन कुरवाळून मस्तकावर कृपाकर ठेविला, तेव्हां तिचे सर्व श्रम दूर झाले. नंतर सीतेनें रामचरण प्रक्षाळून करून चुरले आणि दिव्य सुमनांनीं पतीची पूजा केली.

राम, लक्ष्मण आणि सीता, यांनीं कांहींवेळपर्यंत त्या ठिकाणीं विश्रांती घेऊन पूर्वक्रमाप्रमाणेंच पुनः मार्ग धरिला. तीं तिघें कांहीं वेळ पर्यंत सुखानें मार्गक्रमण करीत आहेत, तों अकस्मात् त्या अरण्यांतील सर्व वनपशु परस्परांतील वैरभाव सोडून जीवाशेनें सैरावैरा धांवूं लागले, कारण—ज्याचें महाभयानक विशाळ शरीर, मोठाल्या खैराच्या निखायांप्रमाणें आरक्त नेत्र, कपाळीं शेंदूर, जटा मोकळ्या, ज्याच्या गळ्यांत नरशिरांच्या माळा, अग्नीच्या मोठ्या लोळ्याप्रमाणें ज्याची लळलळीत जिव्हा आणि ज्यानें शूळ ऊर्ध्व धरून त्याला सिंह, गज, इत्यादि क्रूर वनपशूंच्या माळा लोंबत लाविल्या आहेत, असा विराध नामक राक्षस, केवळ काजळाच्या पर्वतासारखा दिसणारा, भयंकर गर्जना करीत त्या ठिकाणीं आला आणि रामलक्ष्मण पुढें जात आहेत, तों सीतेला उचलून नेघाला. आपल्याला राक्षसानें अकस्मात् उचललें व तो वेगानें निघाला असें जाणतांच सीता करुणस्वरानें ह्मणाली—"हे मित्रकुलतिलका अयोध्यापते रामचंद्रा! धांव. धांव. मला राक्षसानें उचललें." सीतेचे करुणास्वर ऐकतांच जगद्वंद्य रामानें मागें पाहिलें आणि धनुष्य चढवून त्या अधमाधमाला हांक मारिली आणि ह्मणाला—"अरे नीचा! उभा रहा. माझा बाणघटोद्भव तुझ्या आयुष्यसिंधूचें जल प्राशन करीत आहे. मूर्खा! महाव्याघ्राचा भास जंबुकाला पचेल काय?" अशीं रामाचीं भाषणें ऐकतांच विराध उभा राहून ह्मणाला—"मानवा! धीटपणानें अचाट गोष्टी सांगतोस काय? थांब. एकाच मुष्टिघातानें तुझें पीठ करितों." असें बोलून

त्यानें सीतेला खालीं ठेवलें आणि तोंड पसरून रामलक्ष्मणांवर चाल केली. तेव्हां रामानें वायूचेंही खंडन करणारे प्रखर दोन बाण सोडून त्याच्या भुजा छेदन केल्या व त्या आकाशीं उडून गेल्या. नंतर लागलाच एक सूर्यमुख शर सोडून रामानें त्या विराधाचा शिरच्छेद केला; तेव्हां देवांनीं जयजयकार करून पुष्पवृष्टि केली. इतक्यांत दिव्यशरीर पावलेला विराध रामाची स्तुति करीत असतां आपलें नामकर्ण सांगूं लागला—हे देवाधिदेवा रामचंद्रा ! मी तुंबर नामक गंधर्व कुबेराच्या शापानें आज दहाहजारवर्षें क्रूर निशाचर होऊन राहिलों होतों; पण आज तुझ्या दिव्यशरानें उद्धरलों. असें बोलून तो विमानांत बसला व स्वर्गीं गेला. रामानें विराध मारल्यामुळें सर्व दंडकारण्य आनंदित झालें. सीतेनें येऊन प्रेमानें रामचरणीं वंदन केलें आणि त्याच्या शरसंधाना-बद्दल त्याचें स्तवन केलें.

विराध जेव्हां उद्धरून स्वर्गीं गेला, तेव्हां त्यानें रामाला सांगितलें—शरभंगनामक ऋषि तुझ्या दर्शनेच्छेनें ब्रह्मपदास जाण्याचा राहिला आहे; असें ऐकतांच राम सीतासौमित्रांसह शरभंगऋषीच्या आश्रमास-न्निध आला. ही बातमी ऐकतांच ऋषि प्रेमभावानें तपानुष्ठानें थांबवून रामदर्शनासाठीं पुढें झाले. शरभंग महर्षी होता, तरी त्याच्या अंगावर गलितकुष्ठ होतें व त्यानें आपल्या तपोबळानें कंथेखालीं झांकून निराळें ठेविलें होतें. रामानें सर्वांस नमनपूर्वक प्रेमालिंगनें देऊन शरभंगाश्रमांत वास केला. शरभंगानें सीतासौमित्रांसह रामाची पूजा केली. रात्रौ लक्ष्मणानें ऋषीला विचारलें—ह्या कंथेखालीं आह्मीं आल्या वेळेपासून कांहीं झांकलें असून तें कांपत आहे तर कृपाकरून तें काय आहे हें सांगावें. असें ऐकतांच त्या ऋषीनें कंथा उघडून लक्ष्मणाला तें कर्म

शरीर दाखविलें आणि सांगितलें. लक्ष्मणा ! सज्ञान असो, राजा असो किंवा ऋषि असो, त्याचा कर्मभोग कधीं सुटत नाहीं. तसें हें आमचें कर्मशरीर व्यथा भोगीत असतें. लक्ष्मणानें त्या ऋषीचीं हीं भाषणें ऐकून त्याच्या शांततेची व दिव्य ज्ञानाची तारीफ केली: तरी त्याच्या कुष्ठाची त्याला किळस आली होती; ह्मणून तो त्याला ह्मणाला—महाराज ! रामाजवळ कांहीं वर मागा. ऋषि ह्मणाला—आह्मांला स्नानासाठीं उष्णोदक मिळत नाहीं, त्यामुळें थंडी लागून हें शरीर उकलत असतें. असें ऐकतांच रामानें त्याला सांगितलें—महाराज ! आह्मीं प्रातःकाळीं जातांना आपणास अक्षय उष्णोदक मिळेल अशी तजवीज करून जाऊं.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं राम ऋषीची आज्ञा घेऊन स्त्रीबंधूसह मार्गस्थ झाला आणि जेव्हां गौतमीवर ( गोदेवर ) येऊन स्नान करूं लागला; तेव्हां त्यास ऋषीला वचन दिल्याचें स्मरण झालें. नंतर तेथूनच रामानें एक दिव्य बाण सोडला आणि शरभंगऋषीच्या आश्रमासमोर उष्णोदकानें पूर्णभरलेला कूप निर्माण केला. त्या कूपांतील उदकांत स्नान करितांच ऋषीची व्यथा गेली व त्याचें दिव्य शरीर होतांच, इंद्रानें त्याला विमानांत घालून ब्रह्मपदास पोंचविलें. तेथून ऋषींचीं दर्शनें घेतघेत रामलक्ष्मण सुतीक्ष्णऋषीच्या आश्रमांत आले. तेथें तीन दिवस राहून सीतासौमित्रांसह राम गोदातीरीं पांचालेश्वरासन्निध आला. त्याठिकाणीं भूमींतून गायनध्वनि येत होता. रामानें जेव्हां त्याविषयीं चौकशी केली, तेव्हां ऋषींनीं सांगितलें—तपःसूर्य मंदकर्णनामक ऋषि इंद्रानें त्याच्याच तपोभंगासाठीं पाठविलेल्या पांच अप्सरांचें गायन, भूगर्भीं विवर सिद्ध करून त्यांत बसून ऐकत आहे.

याप्रमाणें ऋषि रामाला सांगताहेत तों राम आला, हें दिव्यज्ञानानें जाणून तो ऋषि विवराबाहेर आला आणि त्यानें सीतासौमित्रांसह रामाला आपल्या आश्रमांत नेऊन त्याची पूजा केली. तेथें एकरात्र राहून राम पुनः सुतीक्ष्णऋषीच्या आश्रमांत आला व अगस्तीचें दर्शन घ्यावें असें त्यानें मनांत आणलें. तेव्हां तो सुतीक्ष्णऋषि अगस्तीचा पुरुषार्थ सांगूं लागला.

पूर्वीं आतापी, वातापी आणि इल्वल नामक तिघे रजनीचर शिववरेंकरून प्रमत्त झाले होते. ते कपटकर्मांत फार विख्यात असत. एकानें अन्नरूप धरावें, दुसऱ्यानें जलरूप व्हावें आणि आतापीनें अन्नदात्याचें सोंग घेऊन अरण्यांतील ब्राह्मणांस बोलावून आणावें. त्यांस भोजन घालून शेवटीं आपल्या साथीदारांस हांक मारावी. त्या आतापीची हांक ऐकतांच अन्नजलरूप राक्षसांनीं ब्राह्मणांचीं पोटें फोडून बाहेर निघावें आणि त्या ब्राह्मणांस त्या तिघांनीं बसून भक्षण करावें. असें करितांना त्यांनीं असंख्य ब्राह्मण भक्षण केले. नंतर जेव्हां सर्व ब्राह्मण अगस्त्यऋषीला शरण आले, तेव्हां ते तपोधन अगस्त्यमहामुनि ऋषींच्या कैवारास्तव त्या राक्षसांच्या आश्रमीं आले त्यांस पाहतांच आतापी चरण धरून विनवूं लागला कीं, महाराज ! कृपाकरून माझा आश्रम पावन करावा आणि अल्प तरी अन्न, जल किंवा फल ग्रहण करावें. असें ऐकतांच अगस्ति त्याच्या आश्रमांत आले; तों वातापी फळें होऊन बसला होता. आतापीनें अगस्तीस फळें भक्षणार्थ दिलीं, तीं त्यांनीं भक्षण करितांच राक्षसांचें कपट जाणलें आणि जलप्राशनापूर्वींच पोटावरून हात फिरवून राक्षसाला उदरांतच भस्म केलें. इतक्यांत दोघे त्याला बाहेर बोलावूं लागले; पण जो कुंभजमुनीनें आपल्या उदरांतच भस्मरूप केला

तो बाहेर कसा येणार ? तो येत नाहीं, असें पाहून दोघांनीं भयंकर रूपें धरलीं आणि अगस्त्यमुनीश्वरावर चाल केली; तेव्हां त्या "शापादपि शरादपि" ऋषीनें एक बाण सोडून आतापीचा शिरच्छेद केला. त्याचें शिर आकाशीं उडून गेलें व दोघे मरण पावले, असें पाहून इल्वलानें पळ काढला; पण क्रोधायमान झालेला अगस्त्यमहर्षि त्याच्या पाठीस लागला. अगस्त्यमुनि पाठीस लागल्यामुळें सगळ्या पृथ्वींत त्याला लपण्यासाठीं थारा मिळेना; तेव्हां तो समुद्रोदकांत शिरला व जलरूप झाला. पण त्या कुपितमहामुनीनें एका आचमनेंकरूनच सागराला उदरांत सांठविलें. सुतीक्ष्ण ह्मणतात—रामा ! त्या अगस्त्यमहामुनींचें दर्शन त्वां अवश्य घ्यावें. असें ऐकतांच सुतीक्ष्णमुनींची आज्ञा घेऊन सीतासौमित्रांसह राम अगस्तींच्या दर्शनास्तव कर्दळीवनमार्गानें निघाला. मार्गांत अगस्त्यमुनींचा बंधु महामति नामक ऋषि रामाला भेटला. तेथें एक रात्र रामानें वस्ती केली.

दुसऱ्या दिवशीं ज्या शीतल व सघन रमणीय वनांत सूर्यदर्शन होत नव्हतें व नारळी, पोफळी, रातांजन, अशोक, रायआंवळी, खिरण्या, वड, पिंपळ, शेवरी, पारिजात, मांदार, चंदन, मोह इत्यादि वृक्ष गगनचुंबन घेण्यासाठीं जात होते; त्याच प्रमाणें चंपक, जाई, जुई, मालती, शेवती, बकुळ, मोगरा, चमेली, इत्यादिकांचा सुवास सुटला होता; वाळ्याचीं बेटें लागलीं होतीं; कर्पूरकर्दळी डोलत होत्या फणस, मातुलिंगी, केळी, डाळिंबी, फलभारेंकरून नम्र झाल्या होत्या आणि मयूर, चंदक, चातक, कस्तूरीमृग, जवादिमांजर, राजहंस, मृग, व्याघ्र, गाई, रीस, इत्यादि पशुपक्षी निर्वैर क्रीडा करीत होते; कांहीं पक्षी वेदाध्ययन व शास्त्रचर्चा करीत होते. त्या वनांत सीतासौमित्रांसह राम येतांच

शिष्यांनीं जाऊन तें वर्तमान अगस्त्यऋषीला कळविलें. तेव्हां त्याचा आनंद गगनोदरांत राहीनासा होऊन सर्व ऋषींसह तो अगस्त्यमहामुनि रामदर्शनोत्सुकतेनें धांवत सुटला. अष्टांगयोगसाधन करणारे ऋषि आपल्याकडे वेगानें येत आहेत असें पाहतांच रामलक्ष्मणांनीं साष्टांगनमस्कार घातला. इतक्यांत घटोद्भव मुनीनें रामास आलिंगन दिलें, त्या वेळेस ते दोघे जसे रमापति व उमापति भेटतांना शोभतात तसे शोभले. नंतर सर्व ऋषींस भेटल्यावर ते तापस त्या रविकुलमंडन रामाला वेढून बसले.

ऋषिमंडळीस नमस्कार करून जनकतनया लाजेमुळें दूर उभी होती. इतक्यांत कित्येक ऋषिपत्न्या रामदर्शनासाठीं आल्या; पण ऋषिमंडळींत राम कोणता ? हें त्यांला ओळखतां येईना. शेवटीं त्या सर्व सीतेजवळ गेल्या आणि "राम कोणता तो दाखीव" असें ह्मणून एकेक ऋषीचें ध्यान वर्णन करूं लागल्या. ध्यान आटपतांच सीतेनें "माझा पति चराचर व्यापून उरला आहे" असें मनांत आणून मान न बोलतां हालवावी. ऋषिपत्न्या झाल्या तरी अबला त्या, त्यांस राम प्रत्ययाला येईना; तेव्हां शेवटीं सीतेला शरण गेल्या. तेव्हां सजलजलदवर्ण, आकर्णनेत्र, सुहास्यवदन, जटामुकुटमंडित, आजानुबाहु, चापपाणि, ब्रह्मानंदमूर्ति, त्यांच्या दृष्टीस पडली व त्या आनंदित झाल्या.

नंतर लोपामुद्रेनें सीतेला आश्रमांत नेऊन गौरविलें. अगस्तीनें रामाला आपल्या आश्रमांत एक महिना ठेवून घेतलें आणि अक्षयभाता, अक्षयचाप, अक्षयकवच आणि शस्त्रास्त्रें व मंत्र दिले. एक दिव्यबाण दिला आणि सांगितलें—याच बाणानें रावणाला निजधामास पाठीव. शेवटीं जेव्हां रामानें कांहीं दिवस वस्ती करण्यास उत्तम स्थल कोणतें ? असा अगस्तीला प्रश्न केला, तेव्हां त्या ऋषीनें सांगितलें—गोदातटाकीं पंचवटीनामक

एक स्थल आहे, तें तुला वास करण्यास योग्य आहे; पण राक्षसांचें भय आहे, ह्मणून सीतेचें रक्षण उत्तम केलें पाहिजे. इतकें ऐकून रामानें अगस्त्यमहामुनीचा निरोप घेतला आणि पंचवटीचा मार्ग धरिला.

मार्गांत एक वृक्षावर बसलेल्या रामाला राक्षसासारखा दिसला, तेव्हां रामानें दोन्ही भाते पाठीशीं आंवळून चाप चढविलें, तें पाहून तो जटायु ह्मणाला—तूं या वनांत हिंडणारा कोण व विनाकारण मजवर बाण टाकूं पाहतोस याचें कारण काय ? हें सांग. असें ऐकतांच रामानें सांगितलें—रविकुलमंडण जो राजा दशरथ त्याचा मी पुत्र. मला राम ह्मणतात. असें ऐकतांच जटायु वृक्षावरून खालीं उतरला आणि सांगूं लागला—कश्यपपुत्र जो अरुण तो माझा तात. पितृव्य गरुड, माझें नांव जटायु. माझा ज्येष्ठबंधु संपाति सागरतीरीं वास करीत असतो. दशरथराजा मला बंधु मानीत असे. शुक्राबरोबर युद्ध करीत असतां मी दशरथराजाला साह्य केलें होतें, असें ऐकतांच रामानें पितृव्यभावेंकरून त्याच्या कंठाला मिठी मारली. लक्ष्मण व सीता यांनींही त्यास नमिलें. नंतर त्याच्या अनुमतानें सीतेसह रामलक्ष्मणानें बांधलेल्या पर्णकुटिकेंत वास करूं लागला.

लक्ष्मण फळें आणावयासाठीं नित्य वनांत जात असे व उत्तम उत्तम फळें आणून देत असे; पण सीतेनें त्याला कधींही फळ भक्षण कर असें ह्मटलें नाहीं व त्यानें सीतेच्या आज्ञेशिवाय फळ भक्षण केलें नाहीं. जानकीला असें वाटे कीं, लक्ष्मण अरण्यांत फळें भक्षण करतो व मग आमच्यासाठीं घेऊन येतो. असो. तो भक्त मित्र व बंधु लक्ष्मण निराहार व निद्रारहित रामसेवा करीत असे आणि रामही भोविष्यार्थ मनांत आणून त्याला विचारीत नसे. त्या लक्ष्मणानें रात्रों रामसीतेचें राक्षसभयापासून रक्षण करण्यासाठीं धनुष्याला बाण लावून पर्णकुटिकेच्या दारांत पाहरा करीत असावें.

राम पंचवटींत येऊन राहिल्यावर एके दिवशीं वनांतील भिल्लिणीनीं तें वर्तमान ऐकलें आणि केवळ भक्तिभावानें नाचत नाचत व रामलीला वर्णून गायन करीत येऊन त्यांनीं रामसीतेचें दर्शन घेतलें आणि उत्तम उत्तम वनफळें त्यांस अर्पण केलीं. त्या दिवसापासून त्या नित्य रामाला फळें आणून देत व सीतेसह राम तीं भक्षण करीत असे. भिल्लिणींचीं उष्टीं बोरें ( फळें ) राम प्रीतीनें खात असे. हें बोलणें दोषास्पद होय. भिल्लिणी चांगलीं चांगलीं फळें चाखून पाहून भावार्थानें रामासाठीं उत्तम व स्वादिष्ट अशीं आणीत असत व तीं राम त्यांच्या भक्तीस्तव खात असे

विरागी लक्ष्मण मागें सरला आणि तिला ह्मणाला—सुंदरी ! मी स्वतंत्र नाहीं. पंचवटीस माझा पितृतुल्य बंधु राम सीतेसह वास करीत आहे. त्याच्या आज्ञेव्यतिरिक्त कोणताही संबंध घडणार नाहीं. असें ऐकतांच मी त्याची खूण आणतें, असें ह्मणून ती कपटी निशाचरी सख्यांसह तेथून निघाली.

मार्गे चालत असतां ती आपल्या सख्यांस ह्मणाली—आतां मात्र कार्यसिद्धि झाली असें समजा. आजच रात्रीं तिघांनाही गिळून टाकूं आणि निर्भय होऊन या वनांतील सगळ्या ब्राह्मणांस भक्षण करूं व आनंदानें परत लंकेस जाऊं. असो. तिनें रामाश्रमांत येऊन सीता-रामास नमन केलें आणि लाघवी भाषणानें आपलें इच्छित त्यांस कळविलें. शेवटीं ती डोळ्यांत पाणी आणून सीतेस ह्मणाली—बाई ! आपण तरी भावोजींनां सांगून मला खूण देववा. मी परमपवित्रा कर्णकुमारी आहें. खरोखर आतां त्या लक्ष्मणस्वामींच्या विरहानें माझा जीव जाईल. बायकांचें दुःख बायकांनींच जाणलें पाहिजे. आजपर्यंत मी व्रतस्थ आहें, तरी आतां त्यांच्या संयोगाशिवाय राहिलें तर प्राण जाईल. ते कांहीं इकडची खूण पाहिल्याशिवाय माझा अंगिकार करीत नाहींत. याप्रमाणें भाषणें ऐकत असतां सीतेला तिची दया आली आणि ती रामाजवळ तिच्यासाठीं भीड खर्चूं लागली; परंतु चराचर चित्तपरीक्षक रामचंद्रानें तिच्या नेत्रांतील उलट्या बाहुल्या न्याहाळून पाहिल्या आणि ही निशाचरी आहे असें ओळखलें. मग हिची खोड लक्ष्मणाच्याच हातानें मोडवावी असें मनांत आणून राम तिला ह्मणाला—आह्मीं सांप्रत अरण्यांत असल्यामुळें खूण देण्यासारखी वस्तु आमच्याजवळ कांहीं नाहीं. तुला जर गरज असेल तर मी तुझी लम-

आणि शस्त्रास्त्रांचा चकचकाट पाहून जानकीचे तर डोळेच दिपले; पण लक्ष्मण तिला रामचंद्राचें अचळ ठाण दाखवून धीर देत होता. जसे पतंग दिव्यासभोंवती जमून प्राणार्पणहेतूनें घिरट्या घालितात. किंवा मूषक महाभुजंगाला मारण्याच्या हेतूनें त्याच्या बिळावर जाऊन बसतात; तसे ते सर्व राक्षस रामासभोंवती जमून पहिल्यानें बारा राक्षस रामावर चालून आले; पण रामानें डोळ्याचें पातें लवतें न लवतें तों एकच बाण सोडून त्यांचा चुराडा उडविला. असें पाहतांच दूषण पर्जन्यवृष्टिप्रमाणें बाण सोडीत पुढें आला; पण रामानें त्या बाणांचें निवारण करून एका अर्धचंद्रबाणानें त्याची गदा तोडून उडविली. तेव्हां तो परिघ घेऊन आला. रामानें तोही छेदून टाकला. नंतर एक सूर्यमुख शर सोडून त्या दूषणाचें शिर उडविलें. तो पडतांच त्याचे तिघे पुत्र पुढें सरसावून गहन रणपांडित्य दाखवूं लागले. परंतु जो समरवाचस्पति राम त्याच्यापुढें त्यांचें काय चालणार! ते पडतांच त्रिशिऱ्या कुमारदत्तशक्ति घेऊन पुढें आला, त्याचीही तीच गति! रामानें त्याचीं तिन्हीं शिरें तोडतांच रथारूढ खर राक्षस असंख्य बाण सोडीत पुढें आला; पण तो राक्षसकुलशुष्ककाननहुताशन राम त्या बाणांची गणनाही करीना. पण शेवटीं त्या बलवान् राक्षसानें एक प्रखर बाण सोडला व रामाच्या अंगावरील अक्षयकवचाचें बिरडें तोडून तें खालीं पाडलें. त्या वेळेस विमानांत बसून युद्धकौतुक पाहणारे व रामविजय इच्छिणारे देव घाबरले आणि रामाचें कल्याण चिंतूं लागले. इतक्यांत त्या राक्षसानें अनिवार चार बाण सोडले ते जेव्हां प्रळय करीत रामावर आले. तेव्हां तर देव अगदीं गजबजून गेले; परंतु त्या वेळीं असा चमत्कार झाला कीं, जसे ब्रह्मदेवाच्या मुखांत चारी वेद सामावले, तसे ते चारी

ण रामाच्यापाठीवर बांधलेल्या भात्यांत शिरलें व स्थीर झालें. नंतर यंकर खड्ग घेऊन तो रामावर धांवला; इतक्यांत त्या भक्तकामकल्प-मानें एक वसिष्ठदत्त बाण सोडून त्या खराचा शिरच्छेद केला. त्या ळेस देवांनीं जयजयकारासह पुष्पवृष्टि केली.

चौदा हजार राक्षसांतून एकही जिवंत उरला नाहीं; असें पाहून शूर्पणखा चौघी राक्षसींसह शंख करीत लंकेस गेली. तें वर्तमान सेवकांनीं रावणास सांगतांच त्यानें तिला सभेंत बोलावून काय झालें म्हणून विचारलें. तेव्हां ती सांगूं लागली—दाशरथीराम सीता व लक्ष्मण यांसह जनस्थानांत येऊन राहिला आहे. लक्ष्मणानें मी तुझी बहीण, हें जाणून माझी कर्णनासिकच्छेदानें संभावना केली. या गोष्टीच्या आधींच त्यानें शबरवध करून कालखड्ग हस्तगत करून घेतलें होतें. रामानें रणांत त्रिशिरा, खर, दूषणादिकांचा सहपरिवार वध केला. गोदातटाकीं पंचवटीअरण्यांत ब्राह्मण निर्भय होऊन यज्ञ-यागादि कर्मे करीत आहेत. यावरून मला वाटतें कीं, ते दोघे तुझी लंकाही घेऊन ब्राह्मणाला दान देतील. रावणा ! मला ठाऊक आहे कीं, तुझ्या उरावर शिवधनुष्य पडलें होतें, तें रामानें काढलें आणि सीतेला वरिलें. त्याच वेळेस तुझें तोंड काळें झालें आहे. आतां जर तुझ्यांत पुरुषार्थ असेल तर जिला पाहतांच वनचरांसही मोह पडतो, त्या सीतेला धरून आण. असें एकतांच रावणानें तिचें शांतवन करून तिला परत पाठविलें आणि मनांत आणिलें कीं, मारीचाला मृगवेष देऊन पुढें पाठवूं; ह्मणजे राम सहजच मृगया करण्यासाठीं दूर होईल. नंतर त्याच्या पश्चात् जानकीला उचलून लंकेंत घेऊन यावें.

इकडे जानकी व लक्ष्मण पर्वताखालीं उतरून दोघेंही विजयीरामचंद्राच्या चरणीं लीन झालीं. तेव्हां रामासही श्रम हरण झाले असें वाटून आनंद झाला.

---



# अध्याय १५ वा.

शूर्पणखेनें सांगितलेलें वर्तमान ऐकतांच चिंताक्रांत झालेला रावण विचार करीत करीत मारीचसदनांत येतांच त्यानें त्याला सन्मानपूर्वक आसनावर बसविलें आणि अकस्मात् येण्याचें कारण काय? असा प्रश्न केला. तेव्हां रावण सांगूं लागला—दाशरथीराम सीतासौमित्रांसह पंचवटींत येऊन राहिला आहे. लक्ष्मणानें शंबरवध करून कालखड्ग घेतलें आणि शूर्पणखेला विरूप केलें. नंतर तिच्या कैवारास्तव त्रिशिरा, खर, दूषण, धांवून गेले असतां त्या राघवानें त्यांचाही नाश केला. शत्रु, नाग आणि अग्नि यांस लहान ह्मणूं नये. या नीतिवचनावर विश्वास ठेवून तुला सांगतों हें ऐक. त्वां मृगवेष धरून तेथें जावें आणि जानकीसह रामाला भुलवून दूर अरण्यांत न्यावें. नंतर मी तेथें जाईन आणि त्या सीतेला उचलून लंकेंत आणीन. पहा, हें कार्य झाल्यावर मी तुला अनेक प्रकारें बक्षीस देईन. असें ऐकतांच तो रावणाचा मातुल मारीच राक्षस ह्मणाला—रावणा! त्या रामाचा पराक्रम तूं जाणत नाहींस? यागरक्षणसमयीं वीसकोटी पिशिताशनांसह त्यानें सुबाहूचा वध केला. त्या समयीं मला त्याच्या बाणाचा किंचित् पिसारा लागला, त्यामुळें मी आकाशांत उडालों व सागरांत येऊन पडलों. रावणा! तो राम पूर्णब्रह्म सनातन सगुणरूपानें शेषावर शयन करणारा, आदिनारायण आहे, त्याला तूं मानव समजूं नको. याप्रमाणें रामप्रताप आठवून त्याचें वर्णन करीत असतां मारीचाला मूर्च्छना आली; तेव्हां रावणानें त्याला सावध केलें. नंतर तो पुनः ह्मणाला—परस्त्रीचा अभिलाष धरून तुझें कल्याण होणार नाहीं. सद्विवेक कर.

अनुचित कर्मांत मन घालूं नको. सर्वांभूतीं एक परमात्मा आहे, असें मानून कोणाचाही ... आहेस. सारासार ... तुला कळेल. तो तु ... खालीं चुरून मेला ... कारकरू... नये. रामाजवळ विरोध करूं नको. तुझा स्वामी शंकरही सदा रामभजनीं निमग्न असतो; त्याची भार्या त्वां पामरानें जर कदाचित् हरण करून आणलीस तर कुलक्षय मात्र होईल.

यात्रमाणें त्या मारीचाची वाक्सुधा त्या मतिमंद रावणाला कडू वाटली आणि तो क्रोधायमान् होऊन मारीच्याला ह्मणाला—कायरे तूं माझा पराक्रम जाणत नाहींस ? त्या रामाला तर मी एका क्षणांत चुरून टाकीन, हें कसें तुझ्या ध्यानांत येत नाहीं? मूर्खा! शत्रूचा पराक्रम माझ्यापुढें वर्णन करतोस ? थांब, आधीं तुझाच वध करितों. असें बोलून त्यानें शस्त्र काढतांच मारीच मनांतल्या मनांत अगदीं विटला आणि त्याला ह्मणाला—अधमा, दुर्जना ! मागें हो. मी आतांच मृगवेष धरून पंचवटींत जातों. तुझ्या हातानें मरण्यापेक्षां रामबाणानें मरण पावेन तर मुक्त होईन. चल त्वरेनें पंचवटींत ! असें बोलून उठतांच रावणास हर्ष झाला. नंतर ते दोघेही रथांत बसून पंचवटीच्या मार्गास लागले.

राम, सीता आणि लक्ष्मण आनंदानें बसून कांहीं विषयावर भाषण करीत आहेत तों हे दोघेही पंचवटींत आले. नंतर रावण गुप्तरूपानें अरण्यांत उभा राहिला आणि मारीच मृगवेष धरून अंतरीं रामस्मरण करीत रामाश्रमासमोरच फिरूं लागला. तो मारीच रामरूप पाहत अंतरीं संतोष पावला आणि चमत्कारिक स्वर्णकांतिमृग पाहतांच राम

धनुष्याला हात घातला; इतक्यांत सीता त्या मृगाकडे पाहून ह्मणाली–
प्राणनाथ ! या मृगाच्या [illegible] असें माझ्या मनांत आलें
[illegible] चा अवधि आहे.

शूर्पणखेनें सांगितलेलें वर्तमान ऐकतांच चिंताग्र[illegible]
विचार करीत करीत मारीचसदनांत येतांच त्यानें त[illegible]ववाम्याला उपयोगी
आसनावर बसविलें आणि [illegible] गण्याचें [illegible]गून राम धनुष्याला
बाण लावून मृगवधासाठीं निघाला. त्या वेळेस त्यानें लक्ष्मणाला
सांगितलें–सौमित्रा ! जानकीचें रक्षण कर बरें ? अरण्यवासी निशाचर
अजून संपले असें नाहीं आणि त्यांचें कपटही आपणास कळणार नाहीं.
[illegible]प्रमाणें सांगून राम मृगाचा पाठलाग करीत जातांच लक्ष्मण गुंफेच्या
[illegible]राबाहेर सीतेच्या रक्षणासाठीं शस्त्रास्त्रांसह सज्ज होऊन उभा राहिला.

राम मृगाचा पाठलाग करीत जो निघाला होता, त्याला त्या कपटी
[illegible]शाचरानें घुलवीत घुलवीत बरेंच दूर नेलें. शेवटीं जेव्हां अचुक
[illegible]धान मारणाऱ्या रामानें एक बाण सोडून त्याचा प्राण घेतला; तेव्हां
[illegible] मरतां मरतां आपलें राक्षसाचें पूर्वरूप पावला. बाणानें राक्षस मेला,
[illegible] मृग नव्हता, असें पाहतांच रामाला आश्चर्य वाटलें आणि तो श्रमित
[illegible]ऊन एका अश्वत्थाखालीं जाऊन विश्रांति घेत बसला.

इकडे रावण लपून उभा होता, त्यानें पाहिलें कीं, राम दूर गेला;
[illegible]रतु लक्ष्मण गुंफेजवळ आहे तो हालत नाहीं. तेव्हां तो रामासारखा
[illegible]वर काढून करुणवचनांनीं ओरडूं लागला–हे लक्ष्मणा ! धांवरे धांव !
[illegible]ला अरण्यांत राक्षसांनीं गांठलें आहे व माझा प्राणांत करीत आहेत.
[illegible]धो ! या संकटसमयीं तुझ्याशिवाय कोणीही तारणारा नाहीं ! याप्रमाणें
[illegible]नवचनें ऐकतांच सीता फार घाबरली आणि लक्ष्मणाला ह्मणाली–
[illegible]वोजी ! प्राणनाथांवर वनांत राक्षसांनीं प्रसंग आणला आहे; ह्मणून ते

तुह्मांला दीनस्वरानें हांका मारीत आहेत. उठाउठा! रणांत बंधु, संकटांत मित्र, वृद्धापकालीं पत्नी आणि विषमकालीं पुत्र साह्य होईल तर प्रसंग दूर होईल. यासाठीं त्वरा करा. विलंब लावूं नका. असें ऐकतांच लक्ष्मण तिला ह्मणाला– माते! स्वस्थ रहा. राम संकटांत पडला असें कधीं होणार नाहीं. जगद्रक्षक काळाला जर पिशाच बाधा होईल, तर रामाला राक्षसांपासून भय उत्पन्न होईल. असें ऐकतांच अधीरपणामुळें सीता क्रोधायमान झाली आणि त्या लक्ष्मणाला तीक्ष्ण शब्दशस्त्रांनीं ताडण करीत ह्मणाली–भाऊजी! कळलें बरें तुमचें बंधुत्व! पूर्वीचे हाडवैरी होतां ह्मणून या जन्मीं भाऊ होऊन वैर साधीत आहां. वनांत त्यांना राक्षसांनीं मारावें आणि आपण सीतेचा अभिलाष करावा, ही तुमची इच्छा? सावत्र बंधु मोठ्या कठीण मनाचे तुह्मी! मला वाटतें, कैकयीनें त्यांचा वध करावा ह्मणूनच तुह्मांला बरोबर पाठविलें आहे. परम दुर्जन दायादांचें कर्म हें. तरी तुह्मांला सांगून ठेवतें, त्यांचें जर कांहीं विपरीत झालें तर मी प्राणत्याग करीन. याप्रमाणें तप्तशस्त्रघायांहूनही अतितीक्ष्ण शब्द ऐकतांच लक्ष्मणाला फार दुःख झालें. तो ह्मणाला–हे जनकतनये माते जानकी! माझ्या निष्कपट भाषणाला तूं दोष लावून मनांत विपरीत कल्पना आणतेस; पण हीं जगत्कारणीं पंचभूतें माझ्या शुद्धभावाची साक्ष देतील. राम सदा विजयी! त्याला भय नाहीं. मी बालक आणि तूं जननी, असा भाव असतां मला विना कारण वाग्बाणांनीं ताडण केलेंस; तर सहा महिनेपर्यंत तूं दुःखांत पडशील. रामदर्शन होईपर्यंत तुजवर महाअनार्थाचे प्रसंग येतील. तुझा आग्रह आहे ह्मणून मी जातों. तरी ही धनुष्याची रेघ ओढून ठेवितों; ही उल्लंघन करशील तर तुला रामाची शपथ आहे. जर ही मोडशील

र संकटांत पडशील. असें बोलून तो रामाच्या पदमुद्रा पहात पहात पून चालता झाला. तो रुदन करीत करीत जेव्हां फार दूर गेला, व्हां अश्वत्थाच्या वृक्षाखालीं बसलेला राम त्याच्या दृष्टीस पडला. मृगाचा पाठलाग वेगानें केल्यामुळें रामाला श्रम झाले होते, त्या- ळें तो म्लानवदनानें बसला होता. इतक्यांत लक्ष्मण रुदन करीत त आहे असें पाहून तो चकित झाला. तों लक्ष्मण येऊन त्याच्या ायांवर पडला. रामानें त्याला हृदयाजवळ धरून विचारिलें— लक्ष्मणा! ानकीला एकटी टाकून कां आलास ? असें ऐकतांच लक्ष्मण शोका रीत सर्व वर्तमान सांगून शेवटीं ह्मणाला—प्रभो!जानकीमातेच्या दृष्टीनें ी दोषी आहें तर कृपा करून माझा शिरच्छेद करावा! याप्रमाणें जरी ो बोलला तरी रामानें त्याचें अनेक प्रकारें शांतवन केलें आणि दो- ही आश्रमपंथ लक्षून हळू हळू मार्गक्रमण करूं लागले.

इकडे गुंफेजवळ लपून राहिलेल्या रावणानें लक्ष्मण दूर गेला, असें हतांच यतिरूप धरिलें आणि निर्भयचित्तानें तो लक्ष्मणानें ओढून ठेवि- ल्या रेषेपर्यंत आला; पण त्याला ती उल्लंघन करवेना. जानकीही च्या आंत उभी होती. रावण पुढें येऊन उभा राहिला; पण तिला ीं भय वाटलें नाहीं. तो तिचें रूप पाहून मनांत ह्मणाला—असें स्त्री- न त्रिभुवनांतही नाहीं हें खरें आहे. असो. त्या जगन्मातेचा अभि- प करण्याचें मनांत आणतांच त्या दशाननाला कुदशेनें गांठलें. सीतेला विचारूं लागला—तूं कोण आणि या अरण्यांत वास कर- ाचें कारण काय ? असें ऐकतांच सीता ह्मणाली—मी जनकाची क- । आणि अयोध्याधीश प्रभु जो रामचंद्र त्याची पत्नी आहें. पितृवचन न करण्यासाठीं या वनांत आल्यावर त्या माझ्या प्रियकरानें ऋषि

व देव यांच्या संतोषाकरितां या वनांतील त्रिशिरा, खर, दूषणादि अनेक राक्षसांचा वध केला आहे. आतां थोडक्याच दिवसांत रावण कुंभकर्णादिखलांचा वध करून आह्मीं अयोध्येस जाऊं. रामलक्ष्मण वनांत गेले आहेत, यासाठीं आपण क्षणभर बसावें. ते आल्यावर आपली उत्तम प्रकारेंकरून संभावना करतील. सीतेच्या भाषणाचें रावणास भय वाटलें. त्याला गुंफेंत प्रवेश करवेना आणि जानकी कांहीं बाहेर येईना. तिनें रेषेच्या आंतच तृणासन घातलें आणि या महाराज ! बसा. असें त्याला सांगितलें—तेव्हां तो ह्मणाला—अगे! हें राक्षसांचें वन, या वनांत एकटी राहणारी तूं, बहुतकरून राक्षसी आहेस. आश्रमांत बसवून जर मला भक्षण केलेंस तर काय करावें ? असें ऐकतांच सीतेनें 'शिव शिव' ह्मणून कानांवर हात ठेवले आणि ह्मणाली—"महाराज! आह्मीं यतिवर्गांचे दासानुदास आहों" असो. रावणानें जेव्हां पाहिलें कीं, ही चापरेषा उल्लंघन करून बाहेर येत नाहीं; तेव्हां क्षुधेनें प्राण व्याकुळ झाल्यासारखें केलें आणि ह्मणाला—तूं जर गुंफेबाहेर येऊन माझ्या तोंडांत फळ न घालशील, तर माझे प्राण जातील. असें बोलून जेव्हां तो डोळे पांढरे करून गडबडा लोळूं लागला, तेव्हां सीतेला क्षणभर सुचेनासें झालें. इतक्यांत गुप्तरूपानें सर्व देव जानकीचें स्तवन करूं लागले कीं, माते ! तूं जर लंकेंत न जाशील तर आमची बंदींतून मुक्तता होत नाहीं. बरें, रावण जर तुला स्पर्श करील तर क्षणांत भस्म होईल आणि त्याच्या परिवाराच्या अटकेंत आह्मांला रहावें लागेल; यासाठीं तूं आपलें रूप अग्नींत गुप्त करून छायारूपानें लंकेंत जा, ह्मणजे राम तुला शोधीत तेथें येईल आणि सहपरिवार रावणाला मारून तुला व आह्मांला मुक्त करील. असें ऐकतांच सीतेनें आपलें रूप अग्नींत ग्रा-

केलें आणि रावणाला भिक्षा देण्यासाठीं फळ घेऊन रेषेबाहेर हात केला इतक्यांत रावणानें तोच हात धरून तिला रेषेबाहेर ओढलें व उचललें. त्यानें आपलें खरें स्वरूप सीतेला दाखविलें आणि आपला पराक्रम सांगून मला वर, असें ह्मणूं लागला. तो तिला आलिंगन देण्यास पाहूं लागला, तेव्हां तिनें रागानें सांगितलें—जर पुढें येशील. तर क्षणांत भस्म होशील. मेल्या ! ही रामपंचाननाची वस्तु तुला जंबुकाला चोरून नेऊन पचणार नाहीं. मला सोड. इत्यादि अनेक प्रकारें जरी ती बोलली तरी रावणानें तिला उचलून रथांत घातलें व आकाशमार्गानें रथ काढला. गुंफेसभों-वतीं जे ब्राह्मण होते ते रावणाच्या भयानें पळून गेले. खरेंच, विषम-काळ आला ह्मणजे आश्रित गृहस्थाला सोडून पळून जातात. असो. महाप्रसंग पाहून सीता विलाप करीत ह्मणूं लागली—रामा ! प्रियकरा ! हा दुष्ट दशानन मला चोरून नेत आहे. लक्ष्मणभावोजी ! धांवाहो धांवा ! मी तुह्मांला वाग्बाणांनीं ताडण केलें, त्याचें हें फळ मला मि-ळालें. याप्रमाणें हांका मारीत असतां तिनें पशुपक्ष्यादिकांची प्रार्थना केली कीं, कोणीतरी हें वर्तमान रामचंद्राला कळवा. तिचा शोक ऐकून पशुपक्षीही रुदन करूं लागले. तरी रावण वेगानें रथ घेऊन चाललाच होता.

सीतेचा शोक ऐकून चराचराला वाईट वाटलें. त्यांत ज्याचा पर्व-तासारखा देह आणि वज्राप्रमाणें कठिण चोंच, तो जटायु पांच-ळ्याच्या वर्णाचीं तिखट नखें पुढें करून रावणाला आडवा आला आणि ह्मणाला—मूर्खा ! ही रामपत्नी आहे सोड. तूं चांडाळ ब्रह्मराक्षस आहेस, तरी हिला न सोडशील तर मी तुझा शिरच्छेद करीन. कशाला वेदाध्ययन केलेंस आणि कोरडें ब्रह्मज्ञान शिकलास ? या कर्मानें तुझें शिवभजन व्यर्थ जात आहे. असें ऐकतांच रावण धनुष्य चढवून जटा-

यावर बाण सोडूं लागला व जटायु ते बाण आपल्या चोंचीनें मोडूं लागला. रावणाचा बाणभाता रिकामा झाला, तरी तो अरुणपुत्र ऐकेना. त्यानें चोंचीनें घाय मारून रावणाच्या रथाचे घोडे मारिले, सारथ्याचा शिरच्छेद केला; मुगुट, तूणीर आणि धनुष्य झडपून नेलें, त्याचीं सर्व शस्त्रास्त्रें, वस्त्रें नाहींशीं करून त्याला भूमीवर नग्न उभें केलें व त्याचे केंस चोंचीनें उपटूं लागला. त्याला भय पडलें कीं, मी क्षपणकासारखा होतों कीं काय? तो वारंवार आकाशांत उडे व एखाद्या पर्वताप्रमाणें रावणाच्या अंगावर कोसळून चोंचीनें त्याचें शिर फोडी. असें करीत असतां रावण रक्तबंबाळ होऊन घाबरला आणि सीतेला सोडून पळूं लागला. शेवटीं पळतां पळतां त्यानें विचार केला कीं, पाखरानें मला गांजलें हें नीट नाहीं. याच्या जवळ कांहीं तरी कपट केलें पाहिजे. असें मनांत आणून तो उभा राहिला आणि जटायूला हाक मारून ह्मणाला—अरे! तुला रामाची शपथ आहे. तूं आपला मृत्यु कोठें आहे हें मला सांग आणि मी आपला तुला सांगतों. नंतर आपण युद्ध करूं. असें ऐकतांच जटायु ह्मणाला— माझे पक्ष उपटले ह्मणजे मी मरण पावेन. आतां तुझें मरण सांग. रावण ह्मणाला—माझा चरणांगुष्ठ फोडला ह्मणजे मी मरेन. असें बोलून त्या दुष्ट रावणानें जटायूला धरण्याचा विचार केला; पण त्या भोळ्या पाखराला तें कपट कळलें नाहीं. तो जटायु जो वेगानें आला, तो रावणाच्या चरणांगुष्ठाला येऊन झोंबला व एका क्षणांत त्यानें तो आंगठा फोडला, इतक्यांत रावणानें त्याचे दोन्ही पंख उपटले. तेव्हां त्यांतून भडभडां रुधिर वाहूं लागलें व जटायूचा प्राण कासावीस होऊं लागला आणि राम केव्हां येईल ह्मणून वाट पाहूं लागला. रावण सीतेला खांद्यावर घेऊन आकाशमार्गें उडाला व लंका नगर लक्षून

वायुवेगानें चालला. जटायूची स्थिति पाहून सीता खेद करूं लागली. ती ललाट पिटून आक्रोश करीत चालली असतां, मातंगपर्वतावर नळ, नीळ, जांबुवंत, हनुमान आणि सुग्रीव हे पांचजण तिच्या दृष्टीस पडले. तेव्हां तिनें आपले कांहीं अलंकार काढून वस्त्रांत गुंडाळले आणि त्यांच्या अंगावर टाकले. मारुतीनें ते अलंकार अंगावर पडतांच घेतले आणि वर पाहिलें तों कोणी राक्षस स्त्रीला घेऊन जात आहे असें त्याला वाटलें. तेव्हां तिला सोडवावें ह्मणून त्यानें उड्डाण केलें; पण त्याचा वेग ध्रुवमंडळापर्यंत गेला; इतक्यांत रावण सीतेला घेऊन लंकेंत शिरला. राक्षस हातांत आलेला निसटून गेला ह्मणून मारुतीला वाईट वाटलें आणि पुढेंमागें याचा सूड घेईन असें मनांत आणून त्यानें ते सीतेचे अलंकार जपून ठेविले.

इकडे रावणानें लंकेंत पोंचतांच महाबलाढ्य अठरा राक्षसांला बोलावून सांगितलें कीं, पंचवटींत जा आणि रामसौमित्राला शोधून त्यांचा वध करा. असें ऐकतांच ते तिकडे निघून गेले. नंतर निर्लज्ज रावण जानकीला आपली सर्व संपत्ति दाखवून व पुरुषार्थ सांगून मला वर, असें ह्मणूं लागला. त्यानें आणखी असेंही सांगितलें कीं, राम व रावण यांचें चित्रानक्षत्र असून तूळराशि आहे. मग तूं त्याच्यांत व माझ्यांत भेद कां मानतेस ? असें ऐकतांच जानकी ह्मणाली—मेल्या ! मलिना अपवित्रा मूर्खा दशमुखा ! पतंगानें जर दीपिकेला आलिंगन दिलें तर तो वांचेल काय ? रे खला ! राम व रावण एकच जर तूं ह्मणतोस तर वायस आणि वैनतेय, सिंह आणि शृगाल, मशक व मंदर हेही एकच झाले पाहिजेत. राम आणि रावण यांची ज्योतिषसंबंधानें जरी एक रास आली, तरी त्यांच्या महत्त्वाचा त्यांत कांहीं संबंध

नाहीं. मदनानें जरी सर्वांना जिंकलें आहे, तरी शिवापुढें त्याचें कांहि चाललें नाहीं. त्याप्रमाणें तूं जरी सर्वांना गांजलें आहेस, तरी मल स्पर्श करितांच भस्म होशील. ज्याची व तुझी राशि एक आहे ह्मणतोस तो राम तुझा वध करण्यासाठीं अल्पकालांतच येईल. याप्रमाणें जानकीचें भाषण ऐकल्यावर रावणानें विचार केला कीं, हिचें चित्त स्थिरावेपर्यंत हिला अशोकवनांत ठेवावी हें बरें. असें मनांत येतांच त्या त्रिजटेला बोलावून तिच्या मतानें सीतेला अशोकवनांत नेऊन ठेवि आणि त्या वनाभोंवतीं जागोजागीं चौक्या व पहारे ठेविले. पांचकोटि राक्षस अशोकवनासभोंवती अहोरात्र तिष्ठत बसले. निधानाभोंवत्य जशा भुतावळी असतात, तशा सीतेला वेष्टून राक्षसी राहूं लागल्या.

रावणाचा सत्वशील बंधु जो बिभीषण, त्याला जेव्हां हें वर्तमा समजलें; तेव्हां फार वाईट वाटलें. रावणानें सीतेला आणून कुलक्ष मांडला आहे असें त्याच्या मनांत आलें. इकडे रावण कामातुर हो त्साना ब्रह्मदेवाला ह्मणाला—तुझें वेदाध्ययन पुरे. बृहस्पत्या, तुझें पांडित्य बंद कर. किन्नरहो, गायन आटोपा. माझा मदनाग्नि प्रदी होतो. सीताभोगप्राप्त्यर्थ पंचप्राण कासावीस होताहेत. रावणाच्य घरीं सर्व रांगा राबत होत्या, त्यांस तो ह्मणूं लागला—मला शीतोपचा करा; दाह होतो. याप्रमाणें बडबड करीत असतां त्यानें अनेक क्रू व भयंकर राक्षसी बोलाविल्या आणि सीतेला भेडसावून मला व होईल असें करा, अशी आज्ञा केली; तेव्हां त्या धांवत व ओरड अशोकवनांत जाऊन सीतेला भेडसावूं लागल्या. एकीचें खरासार वदन, दुसरीचे स्तन लांब, एकीचे कानच विशाळ. अशा त्या सीतेल नानाप्रकारें भय दाखवून ह्मणूं लागल्या—तूं रावणाला वर, नाहींतर आह्मं

तुला भक्षण करूं. एक कुश्चित, कुरूप व अमंगळ राक्षसी ह्मणूं लागली—हिच्या नडींचा मी घोंट घेतें. असो. अशा अनेक प्रकारांनीं राक्षसी जरी भय दाखवीत होत्या; तरी सीतेला मुळींच भय वाटलें नाहीं आणि पुण्यशीला त्रिजटा ही तिला वारंवार धीर देऊन तुला चापपाणि राम खचित सोडवून नेईल, असें सांगत असे. त्या त्रिजटेनें सगळ्या राक्षसी दटावून दूर केल्या. नंतर शोक करीत असतां सीता अयोध्येपासून जनस्थानापर्यंत ज्या ज्या गोष्टी घडल्या, त्या त्या त्रिजटेला सांगत आणि रामाला आठवून अपार शोक करीत त्या अशोकवनांत रावणाच्या प्रतिबंधानें राहिली.

---

# अध्याय १६ वा.

रामानें मृगरूपमारीचाला मारल्यावर अश्वत्थाखालीं बसून विश्रांति
; असतां शोकाकुलित लक्ष्मणाचें शांतवन करून त्यासह आश्रमाचा
ो धरला होता. चालतांना त्याला अपशकून होऊं लागले. दोघां-
ी चरण जड झाले, तरी तसेच ते आश्रमांत आले आणि पहातात
जसें प्राणांशिवाय कलेवर किंवा उदकाशिवाय सरोवर शून्य दिसतें;
ी ती गुंफा सीतेशिवाय शून्य दिसतांच रामाला मूर्च्छना आली.
मणालाही मोठी हुरहुर लागली. ऋषिजनांस विचारावें, तर तेही
कुटुंब कोणीकडे पळालेले. अशाप्रकारें निरुपाय जाणून लक्ष्मणानें
ाच्या नेत्रांस उदक लावून त्याला सावध केलें, तेव्हां रामाला दश-
शा शून्य दिसूं लागल्या. त्याच्या नेत्रांतून विमलांबुधारा वाहूं
गल्या आणि हृदय भरून आल्यामुळें लक्ष्मणाच्या गळ्याला मिठी
रून सौमित्रा ! सीता कोठें आहे सांग ! असें ह्मणून तो पुनः निचे-
त झाला. राम पुराणपुरुष शुद्धचैतन्यरूप जरी होता आणि वसि-
नीं जरी हा सर्व मायामय पसारा खोटा आहे, असें ज्ञान त्याला
गितलें होतें; तरी वाल्मीकाच्या वचनास्तव तो जगद्गुरु शोकवश
ला आणि केवळ लीलाचरित्र दाखविण्यासाठीं " सीते सीते ! "
ून हांका मारीत शोकानें गिरिकंदरीं फिरून जानकीचा शोध करूं
गला. लक्ष्मणानें गोदातटाक शोधिलें. तरी जिला रावणानें नेलें
कशी सांपडणार ! राम भ्रमिष्टाप्रमाणें वनोवनीं धांवून पशुपक्ष्या-
ांस तुह्मीं सीतेला पाहिलें आहे काय ? ह्मणून विचारूं लागला; पण
ीं त्याला उत्तर कसें द्यावें ? रामाला सीताविरहाचें वेड लागलें

होतें; ह्मणून त्या सर्वांचा त्याला राग आला आणि तो लक्ष्मणाला ह्मणाला—सौमित्रा! धनुष्य आणरे. माझ्या प्रियेचा शोध सांगत नाहींत; ह्मणून या सर्वांस मी शिक्षा करितों हे वृक्षपाषाण मला माझी स्त्री कोठें आहे हें सांगत नाहींत. यासाठीं या वनाचाही मी विध्वंस करणार! असें ऐकतांच लक्ष्मण ह्मणाला—महाराज! यांवर कोप करूंनये. सीता कोठें आहे, हें यांना ठाऊक नसेल. हे शब्द ऐकून राम पूर्ण भ्रम पावल्याप्रमाणें लक्ष्मणास ह्मणाला—कोणरे तूं? येथें काय ह्मणून उभा राहिलास? लक्ष्मणानें उत्तर दिलें—मी रामाचा बंधु. रामानें विचारिलें—राम तो कोणरे? लक्ष्मण ह्मणाला—ज्यानें भर्गचाप भग्न केलें तो. रामानें विचारिलें—भर्गचाप भग्न करण्याचें कारण? असें ऐकतांच लक्ष्मण ह्मणाला—सीताप्राप्त्यर्थ जनकाच्या सदनांत शिवधनुष्य मोडून आपणच सीतेला वरिलें महाराज! सीतेचें नांव ऐकतांच त्याला थोडी शुद्धि आली व लक्ष्मणा! सीतेचा शोध मला सांग! असें बोलून तो पुनः बेसावध झाला. तेव्हां लक्ष्मणानें त्याला सांवरलें. इतक्यांत सूर्यास्त झाला व शीतरश्मिचंद्र उदयाचलावर आला, तों राम सावध होऊन लक्ष्मणास ह्मणतो—वत्सा! हा सूर्य मला फार ताप देतोरे. असें ऐकतांच लक्ष्मणानें सांगितलें—स्वामी! हा सूर्य नव्हे, चंद्र आहे. याप्रमाणें नानाभाव दाखवून शोक करीत असतां रामानें सीते सीते! ह्मणून वृक्षपाषाणादिकांस आलिंगन देऊन त्यांचा उद्धार केला. शेवटीं अगस्त्याश्रमांत तरी चला. असें ह्मणून रामाला घेऊन लक्ष्मण हळू हळू मार्गक्रमण करीत निघाला.

अगस्त्यमहामुनीला ज्ञानानें समजलें होतें कीं, रावणानें सीता चोरून नेली. नंतर लक्ष्मण रामाला घेऊन जेव्हां त्याच्या आश्रमाजवळ गेला; तेव्हां त्याच्या शिष्यांनीं त्याला परत घालविलें. या वेळेस

क्रोधरहित रामाचें दर्शन घ्यावें असें मुनीला वाटेना. शिष्यवर्गानें
ंबंध करितांच ऋषीचें हृद्गत जाणून रामानें किंचित् हास्य केलें व
परत निघाला; परंतु लक्ष्मणाला ऋषीचा क्रोध आला. तो ब्राह्मण
र निर्दय व कठीण मनाचे, असें ह्मणून त्यांची निंदा करूं लागला;
तां रामानें त्याचें शांतवन केलें आणि पुनः पंचवटींत येऊन
ताविरहानें व्याप्त होत्साता वृक्षपाषाण आलिंगून शेवटीं पंचवटी
हून निघाला.

मार्गे चालत असतां राम शोक करीतच होता; इतक्यांत बारा हात
बीचीं राक्षसाचीं पाउलें उमटलेलीं त्याच्या दृष्टीस पडलीं. जवळच
तच्या कुंकुमांकितपदमुद्रा उमटल्या होत्या, त्या लक्ष्मणानें पाहिल्या.
ळेंतील मोत्यें व पोंवळीं गळून पडलीं होतीं, तींही दिसूं लागलीं. तेव्हां
घेही विस्मित झाले आणि सीतेला राक्षसानें चोरून नेलें, असा त्यांनीं
ं संशय धरिला. नंतर राम भयंकर अरण्यांतून सीतेला शोधीत जात
सतां, त्यानें 'पळसाचा वृक्ष फुलल्याप्रमाणें' रक्तबंबाळ झालेल्या जटायूला
हिलें. तो मरणोन्मुख होऊन रामस्मरण करीतच पडला होता; पण रामाला
टलें कीं, कोणी निशाचर सीतेला भक्षण करून बसला आहे, ह्मणून
ानें चाप सज्ज केलें; इतक्यांत मंजूळ नामस्मरण त्याच्या कानीं
लें व धांवत जवळ जाऊन जटायूला ओळखतांच अपार शोक
रंभिला. एकुलतें एक बालक मरत असतां माता त्याला पुढें घेऊन
शी रडते, त्याप्रमाणें जटायूला पुढें घेऊन तो रडूं लागला. नंतर
ा जटायूला ह्मणाला—काका ! जर शक्ति असेल तर सीतेला कोणी
लें व आपली अशी दशा कशानें झाली हें सांगा ? असें ऐकतांच
टायु हळूहळू सांगूं लागला—रामा ! रावणानें सीतेला नेलें. मी या ठि;

कार्णी सोडविली होती; पण तुझी शपथ घालून दुष्टानें माझे पंख उपटले व माझा प्राण घेतला. असें ऐकतांच राम शोक करीत चोंहोंकडे पाहूं लागला; तों रावणाचा रथ चुरून पडला आहे व अश्व आणि सारथी मरून पडले आहेत. तो जटायूचा पराक्रम पाहतांच रामाला फार गहिंवर आला. जानकीच्या शोकाहून जटायूचा रामाला विशेष शोक झाला. त्याचे नेत्र स्रवूं लागले. त्यामुळें जटायूला अभिषेक झाला. शेवटीं बोलवेनासें झाल्यामुळें जटायूनें रामपदीं मस्तक ठेवून प्राण सोडला. शोक करीत असतां राम जटायूला ह्मणत होता कीं, मी तुला उठवितों, तूं मला साह्य कर. हें बोलणें मान्य नकरितां जटायूनें त्याला सांगितलें कीं, पुनः असें तुझ्या सन्निध मरण येणार नाहीं. असो. जटायूनें प्राण सोडतांच ब्रह्मदेव हंसविमानांत घालून जेव्हां त्याला स्वर्गीं नेऊं लागला; तेव्हां रामानें जटायूला सांगितलें कीं, काका ! स्वर्गलोकीं आपणांस तात दशरथ भेटेल, त्याला आपण रावणानें सीता चोरून नेली हें वर्तमान सांगूं नये. तो परमप्रतापी व मानी राजा कदाचित् पुनः कर्मभूमिवर येईल मी रावणाचा वध करून त्याला स्वर्गलोकीं पाठवितों. तोच आपल्या मुखानें तें वर्तमान त्याला कळवील. असो. लक्ष्मणानें काष्ठें जमवून जटायूच्या प्रेताला अग्नि दिला आणि रामानें त्याची उत्तरक्रिया केली. नंतर राम दक्षिणपंथानें सीतेला शोधीत पुढें जात असतां ज्याज्या ठिकाणीं राहिला, त्यात्या ठिकाणीं त्यानें बाणाकार शिवलिंगें स्थापन केलीं आहेत तीं अद्यापि दिसतात. राम परम विख्यात जो मयूरगिरि त्याजवर कांहीं दिवस सीतेचा विरह भोगीत राहिला होता. तेथेंही एखादेवेळीं शोकानें वृक्षपाषाणादिकांस आलिंगीत असे.

एके दिवशीं कैलासपर्वतावर शिव रामनामाचा जप करीत बसले

तां पार्वती जवळ उभी होती, ती हंसून त्याला ह्मणाली—आपण ज्या
चें ध्यान धरून सदोदित नामस्मरण करीत असतां, त्याची स्त्री
ानें चोरून नेली आहे व तो तिच्या विरहामुळें वेडा होऊन तिच्या
ीनें वृक्षपाषाण कवळीत फिरत आहे, हें कसें? असें. ऐकतांच शिव
ा ह्मणाला—अगे! तो निर्विकार आहे. तरी अवतारचरित्र दाखवि-
ाठीं तसा वागतो. असें ऐकतांच शिवा ह्मणाली—तुह्मीं त्याचें इतकें
ा करितां, यासाठीं मी त्याच्या मतीला मोह उत्पन्न करीन; पहा
कार! असें बोलून तिनें सीतेचें रूप धरिलें आणि शोक करीत
ेल्या रामासमोर येऊन उभी राहिली. जिचा तप्तकांचनासारखा
सुहास्यवदन, बोलतांना दंतपंक्ति झळकणाऱ्या आणि जिच्या अं-
ा सुवास दशदिशा भरून राहिला होता; अशी ती आदिभवानी
जवळ येऊन प्राणनाथ! मी सुटून आलें; मजकडे पहा तरी. असें
लागली. लक्ष्मणही तिला पाहतांच आनंदित होऊन रामाला ह्म-
ा—प्रभो! ही जानकी सुटून आपल्यापुढें येऊन उभी राहिली आहे.
जगन्मातेकडे आपण कां पहात नाहीं? असें ऐकतांच राम त्याला
ला—लक्ष्मणा! ही जगन्माताच खरी! अरे! ही अपर्णा सीतेचें रूप
ा आपणाला फसविण्यासाठीं आली आहे. ही शिवाजवळ प्रतिज्ञा
ा मला फसविण्यासाठीं आली आहे. असें ऐकतांच ती स्कंदमाता
ी आश्चर्यचकित होत्साती आपलें रूप प्रगट करून रामाला वर
ासाठीं पुढें आली. तेव्हां राम तिला ह्मणाला—माते! शिवाला सोडून
कां आलीस? तेव्हां पार्वती ह्मणाली—हे ज्ञानकंदा आनंदघना
ंद्रा! तूं निर्विकार असतां वृक्षपाषाणादिकांस कां आलिंगितोस?
ह्मणाला—हें तूं शिवालाच जाऊन विचार. असें ऐकतांच पार्वती

विनयवचनांनीं त्यालाच शरण गेली. तेव्हां रामानें तिला दिव्यज्ञानोपदेश करून "आतां हे वृक्षपाषाण कोण आहेत पहा" असें सांगितलें. नंतर पार्वती पाहूं लागली तों सीतेच्या निमित्तानें राम महातापसांचा उद्धार करीत आहे. असो.

रामानें पार्वतीची पूजा व स्तुति करितांच तिनें रामाला वर दिला कीं, तूं सहपरिवार रावणाचा वध करून देवांसह सीतेला सोडविशील व आनंदगजरानें अयोध्येस जाशील. रामानें पार्वतीची पूजा केली, तीच तुळजापुरवासिनी. तेथून राम दक्षिणपंथानें जात असतां कृष्णानदीचे तीरावर ऋषि स्नानें करून ध्यानस्थ असलेले पाहतांच आपणही स्नान करावें ह्मणून कृष्णेंत उतरला. कृष्णानदी विष्णुरूप आहे. राम तींत प्रवेश करितांच एकरूप झाल्यामुळें लक्ष्मणाला दिसेना, ह्मणून तो शोक करूं लागला; पण शेवटीं जेव्हां त्याला कांहीं उपाय सुचेना, तेव्हां त्यानें धनुष्यावर अग्निमुख बाण स्थापन केला आणि कृष्णानदीला उद्देशून बोलला कीं, हे कृष्णे ! माझ्या रामाला आणून दे, नाहींतर हा माझा अग्निमुख बाण तुला शोषण करील. असें बोलून बाण सोडणार इतक्यांत जगच्चित्तसाक्षी राम कृष्णेबाहेर आला, त्याला पाहतांच लक्ष्मण त्याचे चरणीं लागला. त्या ठिकाणीं रामानें शिवलिंग स्थापन केलें त्याला बाहोक्षेत्र ह्मणतात.

रावणानें रामाला मारण्याकरितां अठरा राक्षस पाठविले होते; ते कबंधाच्या कवेंत सांपडले व त्यांतच अकस्मात् रामलक्ष्मणही मिळाले. त्या कबंधनामक राक्षसाला शिर व चरण नव्हते. तो आपले दोन्हीं हात पसरून बसलेला असे व पायचळ ऐकतांच त्या जिवाला ओढून भक्षण करीत असे. रामलक्ष्मण त्याच्या कवेंत सांपडतांच राम आश्चर्य

ा आणि त्यानें धनुष्याला बाण लावून त्याचे दोन्ही हात तोडून
ले. रामानें हात तोडतांच तो कबंध मरण पावला आणि उद्धार
यामुळें दिव्यदेह धरून रामचरणीं लागला. नंतर त्यानें आपलें
ान सांगितलें कीं, मी दनुकुमार कश्यपाचा पुत्र आहें. स्थूलशिरा
; एकांत वनांत तप करीत असतां; म्यां मद्यपानोन्मत्तानें त्याला
ाविलें. तेव्हां त्यानें शाप दिला कीं, तूं कबंध होऊन महारण्यांत
ील. नंतर मी त्याच्या चरणीं लीन झालों आणि उःशाप मागि-
. तेव्हां तो ह्मणाला—दशरथपुत्र राम दशकंठाचा वध करण्यासाठीं
ारण्यांतून जातांना तुझा उद्धार करील. मी इंद्रपद घेण्यासाठीं
दिवस तपत होतों; ह्मणून इंद्रानें वज्र मारून माझें मस्तक उदरांत
विलें आणि दोन्ही चरणही छेदन केले. माझ्या पूर्वकर्मामुळें मी
कष्ट भोगले; पण आतां माझा उद्धार झाला. रामा! आतां या
ा राक्षसकलेवरास अग्नि दे. लक्ष्मणानें तें शरीर अग्नींत घालतांच
ा उद्धार झाला व तो विष्णुदूतांबरोबर चतुर्भुज, शंख, चक्र, गदा
धारी होऊन विमानांत बसतांच रामाला ह्मणाला—हे अयोध्याप्रभो,
ंद्रा! आतां तूं सुग्रीवाशीं सख्य कर, ह्मणजे तुझा सर्व कार्यभाग
. याप्रमाणें बोलून तो निघून गेल्यानंतर लक्ष्मणासह राम
ीच्या आश्रमास आला.

ाबरी ही [illegible] वृद्ध तापसी होती. रामानें तिच्या आश्रमांत
दिवस [illegible] नाचा उपदेश केला व तिचा उद्धार
ती शरीर टाकून कैवल्यपद पावतांच लक्ष्मणानें रामाचे चरण
े आणि मला दिव्यज्ञानाचा उपदेश करावा अशी विनंती केली.
वेळेस जो रामानें लक्ष्मणाला बोध केला, ती रामगीता सारासार-

निरूपणानें परिपूर्ण आहे. नंतर राम हंपीविरूपाक्षास आला. त्याचथा-पुढें शिवानें वास्तव्यस्थान पंपासरोवर; जेथें दिव्यवल्ली आणि तरुवर सदा सुफळ व सुपुष्पित व जेथें अपार स्फटिकगुहा होत्या; त्या पंपास-रोवरतीरीं एका स्फटिकशिळेवर लक्ष्मणाची मांडी उशाला घेऊन राम निजला असतां सीतासहवासाचें स्मरण करून शोक करूं लागला. त्यावेळेस कोकिळा पंचमस्वर आळवूं लागली, तेव्हां रामानें तिला शाप दिला कीं, तुझ्या सर्व यातीच्या वाचा बंद होतील. शापवचन ऐकतांच सर्व कोकिळा रामाला शरण आल्या. तेव्हां वसंतऋतूंत तुम्हांला वाचा फुटेल, असा रामानें त्यांस उःशाप दिला. इतक्यांत मृग व मृगी रमतांना पाहून म्हणाला—तुम्हांला वाटपारधी मारोत. तींही शरण आलीं, तेव्हां तुम्हीं दिवसा मुक्त आहां, ते रात्रीं तुमची मृगया करतील असा उःशाप दिला. तों गज आपल्या स्त्रीबरोबर रमत असलेला रामानें पाहिला आणि त्याला शाप दिला कीं, मैथुनांतीं तुला सात दिवसपर्यंत मूर्च्छना येईल. त्या गजानें शरण येऊन उःशाप मागतांच ही बाधा जलांत होणार नाहीं, असें रामानें त्याला सांगितलें. मयूरांस म्हणाला—तुम्हीं नपुंसक व्हाल व तुमच्या आनंदाश्रूनें तुमची संतति वाढेल. चक्र-वाकांस म्हणाला—तुमची सूर्योदयीं मात्र भेट होईल. अरे! मी सीतेसाठीं शोक करितों आणि तुम्हीं माझ्या समोर आनंदानें रमतां, म्हणून हा दंड केला आहे. याप्रमाणें शोकाविर्भाव दाखवीत तो [illegible]मोहन जनक-जामात सीताशोकांत आर्त्त होऊन पडला आहे; [illegible]मलक्ष्मण[illegible] ऋष्यमूकपर्वतावरून नळ, नीळ, जांबुवंत, सुग्रीव आणि हनुमंत यांनीं पाहिलें. येथपर्यंत रामायणाचें अरण्यकांड पूर्ण झालें.

# अध्याय १७वा.



# अध्याय १७ वा.

पंपासरोवराचे तीरावर लक्ष्मणाच्या मांडीवर उसें ठेवून स्फटिकशिळेवर पडलेल्या रामास पाहतांच सुग्रीववानर भयभीत झाला. त्याला असें वाटलें कीं, वालीनें माझा घात करण्यासाठीं हे दोघे मानववीर मुद्दाम पाठविले असावे. ही गोष्ट त्याच्या मनांत येतांच तो चौघांस विचारल्या व सांगितल्याशिवाय पळूं लागला. तेव्हां वायुवेगाप्रमाणें धांवून मारुतीनें त्याला धरिलें आणि तूं असें काय विपरीत पाहिलेंस म्हणून एकाएकीं पळत सुटलास? असा प्रश्न केला. तेव्हां सुग्रीव त्याला सांगूं लागला—गेल्यारात्रीं मीं असें स्वप्न पाहिलें कीं, दोन क्षत्रियवीर आले व त्यांनीं वालीला मारून मला राज्यासनावर बसविलें. त्याप्रमाणें आतां पाहतों तर पंपासरोवरीं चापशरमंडित दोघे मानव आलेले आहेत. यावरून जें स्वप्न पाहिलें तें खरोखर उलट होणार असें मानून मी पळून चाललों आहें, असें ऐकतांच मारुती त्याला ह्मणाला—आह्मी चौघे प्रधान तुझ्याजवळ असतां तुला भय पावण्याचें कारण काय? तुला यांचें भय वाटतें; पण त्यांला पाहतांच माझ्या मनांत प्रेमभाव उत्पन्न झाला आहे, यासाठीं तूं उभा रहा. मी त्यांच्याजवळ जातों आणि चौकशी करितों. बोलण्यावरून त्यांचें अंतर सहज समजण्यासारखें आहे. जर कांहीं दगा आहे असें वाटलें तर मी तुला हस्तसंकेत करीन.

याप्रमाणें भाषण करून हनुमान पंपासरोवरतीरीं जेथें राम होता त्या ठिकाणीं आला. राम श्रमविगलित होत्साता ज्या वटवृक्षाखालीं शिळातळावर लक्ष्मणाची मांडी उशाला घेऊन पडला होता, त्याच वृक्षावर मारुती येऊन बसला आणि रामाकडे पाहून हर्षानें माकडचेष्टा करूं

लागला. त्याच्या त्या चेष्टा पाहतांच राम लक्ष्मणास ह्मणाला—सौमित्रा! तो वानर पाहिलास ? ज्याचे चरणांत मदनाचा पुतळा करून बांधला आहे आणि वज्रबंधनाप्रमाणें हेमकौपीन झळकत आहे; यावरून मला असें वाटतें कीं, हा जितेंद्रिय पूर्ण ब्रह्मचारी असावा. याला पाहतांच माझ्या चित्तांत स्नेह उत्पन्न झाला आहे. असें ऐकतांच मारुतीला हृदयांत मातेचें वचन आठवलें. अंजनीनें हनुमंताला सांगितलें होतें कीं, ' जो तुझी गुप्त कौपीन ओळखील तो तुझा स्वामि ' त्या वचनाप्रमाणें हाच आपला स्वामि असें हनुमंताला वाटलें. तरी त्याच्या मनांत आलें कीं, मी अद्भुत बळवान् आणि हा माझा स्वामीतर कोमळ व सुकुमार दिसतो. शिष्याहून गुरूला आणि सेवकाहून स्वामीला बळ अधिक असलेंच पाहिजे. असें मनांत येतांच तो वडाच्या खांद्या मोडून रामावर टाकूं लागला. तें पाहतांच लक्ष्मणानें चापाला बाण लाविला. तेव्हां रामानें त्याचें निवारण करून सांगितलें—सौमित्रा ! बाळक जर कौतुकानें खेळूं लागलें, तर त्यावर रागें भरून काय फळ आहे ? क्षणभर स्वस्थ रहा आणि कौतुक पहा, इतक्यांत एक वडाची भव्य खांदी रामावर आली, तेव्हां रामानें तिला कोदंडदंडानें आकाशांत उडविलें. ती वटशाखा जेव्हां आकाशांत जाऊन भ्रमण करूं लागली, तेव्हां हनुमंतानें आणखींही कित्येक वृक्ष व पाषाण रामावर टाकले; तरी रामानें त्यांचें पडल्या पडल्याच कोदंडानें निवारण केलें. नंतर. हा उठत नाहीं असें पाहून मारुतीनें पांच पर्वत उचलले आणि ते एकदम रामावर टाकले. तरी राम उताणा पडून कौतुकानें हंसतच होता; पण पर्वत जेव्हां अगदीं अंगावर पडायाला आले, तेव्हां रामानें चापावर एक बाण लावून सोडला, त्या बाणानें पर्वतांचें तर पीठ उडविलेंच;

जरी बाणाचा किंचित् पिसारा हनुमंताला लागला; त्यामुळें तो जो आकाशांत उडाला तो वायुचक्रांत सांपडून भ्रमण करूं लागला. तेव्हां प्रत्यक्ष वायूनें येऊन त्या आत्मजाला हृदयाजवळ धरिलें आणि सांगितलें–वत्सा ! त्वरा कर आणि रामचंद्राला शरण जा. हा राम प्रत्यक्ष शेषशायीनारायण दशरथोदरीं अवतरला आहे. त्याच्या बलाबला-विषयीं शंका न घेतां काया वाचा मनेंकरून त्याला शरण जा. असें ऐकतांच निर्मळ मनानें येऊन मारुतीनें रामाला लोटांगण घातलें आणि शरणागत झाला. तेव्हां रामानेंही उठून त्याला हृदयाजवळ धरिलें. त्या वेळेस हरिहरांचें ऐक्य झाल्याकारणानें देवांनीं आनंदित होऊन पुष्पवृष्टि केली. नंतर रामानें मारुतीला वर दिला कीं, जोंपर्यंत चंद्र-सूर्य आहेत तोंपर्यंत वज्रदेही, बलवान् आणि चिरंजीव होशील. या-प्रमाणें वर मिळतांच मारुती हात जोडून रामासमोर उभा राहिला आणि त्याचें अपार स्तवन करूं लागला. तेव्हां परमभक्त मानून रामानें त्याचा हात धरून जवळ बसविलें.

नंतर श्रीरामचंद्राचे चरण चुरीत असतां मारुती सांगूं लागला–प्रभो ! पलीकडे ऋष्यमूकपर्वतावर कपिपति सुग्रीव वास करीत आहे; त्याला जर अभयवचन असेल तर त्याची व आपली भेट करवितों. असें ऐकतांच सुग्रीव हा कोणाचा कोण ? असा रामानें प्रश्न केला, तेव्हां मारुती त्याचें जन्म कथन करूं लागला.

एकेकाळीं ब्रह्मदेव ध्यानस्थ असतां त्याच्या नेत्रांतून एक प्रेमबिंदु त्याच्याच अंजुलींत पडला, त्यापासून अद्भुत बलवान् ऋक्षराज नामक वानर उत्पन्न झाला, तो ब्रह्मदेवाचा प्रियपुत्र फिरत फिरत एके दिवशीं शिवलोकीं आणि फलपुष्पांनीं सुशोभित झालेलें एक उपवन होतें त्यांत

शिरला. त्या वनाला पार्वतीचा शाप होता कीं, जो नर या वनांत येऊन उदकपान करील तो नारी होईल. हा शाप त्याला ठावूक नसल्यामुळें त्यानें त्या वनांत जातांच पुष्करणींत उडी टाकली, यथेच्छ जलविहार केला आणि जेव्हां तो बाहेर आला, तेव्हां रंभाउर्वशीहून रूपवती स्त्रीचें रूप पावला. इतक्यांत सूर्य व इंद्र त्या सुंदर स्त्रीला वरावें ह्मणून त्या ठिकाणीं आले, तों तो ब्रह्मपुत्र स्त्री होऊन बसला आहे. त्याच्याशीं सुरत घडत नाहीं, असें पाहतांच दोघांनींही वीर्यत्याग केला. पहिल्यानें इंद्राचें वीर्य मस्तकावर पडलें, आणि वालीची उत्पत्ति झाली. मागून सूर्याचें वीर्य ग्रीवेवर पडलें, त्यापासून सुग्रीव उत्पन्न झाला. इतक्यांत ब्रह्मदेव त्या ठिकाणीं आले आणि पुत्र स्त्रीरूप झालेला पाहून त्यांनीं पार्वतीस आराधिलें. जेव्हां ती आदिभवानी प्रसन्न झाली, तेव्हां तिच्यापाशीं उःशाप मागून त्यांनीं पुत्राचें स्त्रीत्व दूर केलें.

नंतर दोघे नातू आणि पुत्र यांस राहण्याकरितां ब्रह्मदेवानें किष्किंधानगरी उत्पन्न करून त्या ठिकाणीं ऋक्षराजाची स्थापना केली. वडील पुत्र वाली आणि धाकटा सुग्रीव, यांस घेऊन ऋक्षराजानें बहुत वर्षें किष्किंधानगरीचें राज्य केलें. वाली व सुग्रीव यांची माता व पिता ऋक्षराजच. शेवटीं त्यानें वालीला राज्याधिकार देऊन त्याच्यावर छत्र धरिलें आणि योगसाधन करून ब्रह्मभुवनीं गमन केलें. इंद्रानें वालीला विजयमाळ आणून दिली, ती माळ त्याच्या गळ्यांत असली ह्मणजे त्याचा अद्भुत प्रताप पाहून शत्रु समरांत भयभीत होत्साते पळून जात. पुढें राज्यसंबंधानें वाली आणि सुग्रीव यांच्यांत वैमनस्य आल्यामुळें ते भांडूं लागले; पण सुग्रीवाला त्याच्या भयंकर मारापुढें उभें राहवेना. तो जेव्हां सुग्रीवाचा वध करण्यासाठीं धांवला, तेव्हां सूर्यानें सुग्रीवाला

आणून माझ्या हवालीं केलें आणि माझें वचन घेतलें कीं, मी याला सदोदित संभाळीन आणि बंधूप्रमाणें याचा पाठीराखा होईन. सुग्रीवाची रुमानामक स्त्री वालीनें हरण करून घेतली आहे व सुग्रीव ऋष्यमूकपर्वताचा आश्रय धरून राहिला आहे. त्याचें व वालीचें सहा महिन्यांनीं युद्ध होत असतें. याप्रमाणें मारुतीनें सांगितलेलें वर्तमान ऐकतांत राम त्याला ह्मणाले हनुमंता ! तूं माझें वचन घे. जसा तूं मला अत्यंत प्रिय आहेस तसाच सूर्यपुत्र सुग्रीव ! जा आणि त्याला घेऊन ये. मला त्याच्या भेटीची उत्कंठा अतिशय उत्पन्न झाली आहे. आधीं त्याच्या शत्रूला मारून त्याला राज्यावर बसवूं, नंतर जानकीचा शोध करूं.

याप्रमाणें अभय वचन ऐकतांच मारुतीनें तेथून उड्डाण केलें आणि सुग्रीवाजवळ येऊन सांगितलें—मित्रा ! तुझा भाग्योदय झाला. सीतावियोगानें रामप्रभु दुःखी आहे आणि तूंही रुमेचें वियोगदुःख अनुभवीत आहेस; तर दोघांनीं ऐकमेकांला साह्य करून सौख्यानुभव घ्यावा. असें ऐकतांच सुग्रीवानें मारुतीला आलिंगन देऊन त्याची पाठ थोपटली आणि ह्मणाला—मित्रा ! रामप्राप्तीला आज तूं मला सद्गुरू भेटलास. पूर्वीं मीं रामाची कीर्ति ऐकिली आहे कीं, त्यानें पंचवटींत राहून असंख्यात पिशिताशनांचा वध केला आहे, तर चल आणि मला त्याच्या चरणांवर घाल. असें बोलून त्यानें नळ, नीळ, जांबुवंत आणि सर्व वानरसेना बरोबर घेतली आणि रामदर्शनेच्छेनें उड्डाण केलें.

मारुती पुढें व त्याच्यामागें सुग्रीव, नल, नील, जांबुवंत आणि इतर वानरसैन्य ज्या ठिकाणीं लक्ष्मणासह राम होता, त्या ठिकाणीं येतांच सुग्रीवानें तमालनील रामाला पाहून लोटांगण घातलें. रामही त्याला

भेटण्यासाठीं पुढें गेला आणि त्यानें सुग्रीवाचे दोन्ही हात धरून त्याला उठविलें व हृदयाजवळ धरिलें. त्या वेळेस सुग्रीव फार सुखी झाला. नल, नील, जांबुवंत आणि इतर वानरांच्या व रामाच्या भेटीनंतर मारुतीनें वृक्षपल्लवांनीं आसनें मांडून त्यांवर सुग्रीव आणि रामचंद्र यांस बसविलें व साक्षीसाठीं दोघांच्या मध्यभागीं अग्नीची स्थापना करून एकमेकांच्या अर्थसाधनाबद्दल दोघांकडून शपथा घेवविल्या. राम ह्मणाला—उद्यांच तुह्मां सर्वांसमक्ष मी सुग्रीवाचें राज्य आणि स्त्री सोडवून त्याच्या हवाली करीन. असें ऐकतांच सुग्रीव ह्मणाला—ज्यानें सीता चोरून नेली आहे, त्याचा संहार करून तिला मुक्त करीन आणि त्या मंगळभगिनीसह या मंगळाकार चापपाणीरामाला अयोध्येस पोंचवीन. याप्रमाणें दोघांच्या आणा भाका होतांच सर्व वानरांनीं भुभुःकार केला; त्या नादानें आकाश नादित झालें.

नंतर सुग्रीव ह्मणाला—प्रभो ! कालच एक राक्षस आकाशपंथानें एका सुंदर स्त्रीला घेऊन चालला असतां ती स्त्री रामा ! हे रविकुलभूषणा! धांव. हे सौमित्रा ! त्वरेनें येऊन माझी मुक्तता कर, असें ह्मणून आक्रोश करीत होती. तिनें आपल्या अंगावरील अलंकार वस्त्रांत बांधून आमच्या अंगावर टाकले, ते आह्मीं जतन करून ठेविले आहेत. असें ऐकतांच राम आश्चर्यचकित झाला; इतक्यांत मारुतीनें ती अलंकार बांधलेली मोटली आणून रामाच्या हातांत दिली. तेव्हां रामानें मोठ्या संशयात्मक उत्कंठेनें ती वस्त्रग्रंथि सोडली आणि ते सर्व अतिपरिचयाचे अलंकार पहातांच " हा सीते " ! ह्मणून धरणीवर अंग टाकलें. ते अलंकार हृदयाजवळ धरून राम सीतेचे गुण आठवून शोक करीत असतां सर्व वानर सद्गदित झाले. लक्ष्मणही सीतेला आठवून शोक करीत होता,

त्याला ते अलंकार दाखवून राम म्हणाला—वत्सा! पहा बरें, हेचना ते अलंकार? लक्ष्मणानें त्यांतील नूपुरें मात्र ओळखलीं आणि सांगितलें—मातेला मी नित्य नमस्कार करीत असें, त्यावेळेला त्या पूज्यचरणांत हींच नूपुरें असत, हें अगदीं खरें आहे. वरकड अलंकार मी ओळखीत नाहीं, कारण जानकी मातेला मी पूर्णपणें न्याहाळून कधींच पाहिलें नाहीं. अशीं भाषणें ऐकतांच रामाला अत्यानंद झाला व त्यानें त्याची पाठ थोपटून सांगितलें—लक्ष्मणा! खरोखर तूं वैराग्यसागरांतील एक दिव्य रत्न आहेस, यांत संशय नाहीं. याचमुळें तूं सदा विजयी आहेस.

नंतर सुग्रीव म्हणाला—हे प्रभो रामचंद्रा! जर मी तुला जानकी न दाखवीन तर कल्पपर्यंत यमयातना भोगीन. माझे नल, नील, जांबुवंत हे महाप्रतापी प्रधान आहेत. मी एका क्षणांत हा भूगोल उचलून पालथा घालीन. तर हे रामा! तुझीच शपथ घेऊन सांगतों कीं, स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ हीं तिन्हीं भुवनें फिरून सीतेला शोधून आणीन. असें ऐकतांच राम म्हणाला—तुला राज्य आणि तारा दिल्यावांचून सीतेचा शोध करणें नाहीं, म्हणून मीं तातदशरथाची शपथ वाहिली आहे, त्यासाठीं आधीं तुझें कार्य झालें पाहिजे. तर जा आणि वालीला युद्ध करण्यासाठीं बोलावून आण. असें बोलत असतां रामचंद्राच्या अंगांत वीरश्री दाटून राहिली व त्यानें चापाला गुण चढविला. तेव्हां सुग्रीव विनय बोलला—हे मखपालना अयोध्याधीशा रामा! वालीचा भयंकर मार तुला सहन होणार नाहीं. त्वां समोर उभें राहून त्याजबरोबर युद्ध करूं नये. आडून एकच शर मारावा. असें ऐकतांच रामानें विचारलें—त्याला असें अद्भुत बळ कशानें प्राप्त झालें? आणि वालीचें व तुझें वैर काय म्हणून पडलें? या प्रश्नांचीं उत्तरें देत असतां सुग्रीव सांगूं लागला.

महिषासुर नामक दैत्यापासून महाबलिष्ठ दुंदुभि नामक पुत्र उत्पन्न झाला. तो मद्यपानोन्मत्त निशाचर कलह माजविण्यासाठीं सगळ्या अवनीभर फिरत असतां त्याला कोणीही योद्धा मिळेना; तेव्हां तो यमा-जवळ गेला आणि मजबरोबर युद्ध कर असें सांगूं लागला. तेव्हां त्यानें सांगितलें–किष्किंधेस वाली नामक वानर आहे, त्याजबरोबर आधीं जाऊन युद्ध कर. त्याचा पराभव केलास म्हणजे मग मी तुज बरोबर युद्ध करीन. असें ऐकतांच तो धांवत किष्किंधेस आला व गर्जना करूं लागला. त्याची हांक ऐकतांच महाबलाढ्य वालीनें धांवत जाऊन त्या शतयोजनविस्तीर्ण शरीरधारी रजनीचराला पायीं धरून गरगरां फिर-विलें आणि भूमीवर आपटलें, तेव्हां भूमंडळ दणाणून गेलें आणि त्या दैत्याधमाचा चुराडा उडाल्यामुळें प्राण गेला. नंतर वालीनें रागानें त्याचें प्रेत ऋष्यमूक पर्वतावर फेंकून दिलें. त्या विस्तीर्ण शरीरपातानें कित्येक ऋषींचे आश्रम मोडले. त्यांत मातंग नामक ऋषीश्वरानें वालीला शाप दिला कीं, तूं या पर्वताला स्पर्श करितांच मरण पावशील. दुंदुभीचें प्रेत अद्याप तेथें पडलें आहे. वाली प्राणभयानें ऋष्यमूकपर्वताला शिवत नाहीं.

पुढें त्या दुंदुभीचा पुत्र मयासुर नामा, तो पितृसूड घेण्यासाठीं येथें आला आणि त्यानें वालीला युद्धास बोलाविलें. तेव्हां वालीनें येऊन त्याला एकच मुष्टिप्रहार केला, त्यामुळें तो रक्त ओकून पाताळविवर-द्वारानें पळाला. त्याचे मागून वालीही पाताळीं गेला असतां, मी त्याची वाट पहात विवरद्वारावर रक्षणासाठीं फार दिवसपर्यंत बसून राहिलों; तों इकडे गंधर्व आणि यक्ष मिळून किष्किंधा घेण्यासाठीं धांवून आले. राजाशिवाय नगरीचें रक्षण कोण करणार? वानर धाकानें दुर्ग सोडून पळाले व प्रधान आणि प्रजा मजपाशीं येऊन गाऱ्हाणें सांगूं लागल्या. तेव्हां निरुपायास्तव मी विवरद्वारावर पर्वत टाकून किष्किं-

स आलों. शत्रूचा पराभव केला आणि प्रजेला सौख्य दिलें. वाली कवीस महिनेपर्यंत त्या विवरांत गुप्त झाला होता. शेवटीं प्रधानादिक णूं लागले कीं, वाली मरण पावला असावा. असो. सर्वांनीं मिळून ला राज्यासनावर बसवून छत्र धरिलें, तों मयासुराचें शिर घेऊन ली आला; पण त्याला विवरद्वार दिसेना. एकवीस महिनेपर्यंत नि-हार असल्यामुळें तो घाबरा झाला होता, इतक्यांत सूर्यकिरणामुळें चित् विवरद्वार दिसतांच त्यानें तो पर्वत नखाग्रानेंच उलथून पाडला णि वर येऊन आनंदानें भुभुःकार केला; तरी मला यक्षराक्षसादिकांनीं रिलें असावें, असें त्याच्या मनांत आल्यामुळें तो चिंतातुर होत्साता रीं आला आणि मला राज्यपदीं स्थित पाहून अतिशय कोपला. ं ह्मणूं लागला—मी मरावें आणि तूं राज्यपदीं स्थिर व्हावेंस; या नें विवरद्वारावर पर्वत टाकून मला कोंडलेंस! चिंता नाहीं. स्नेहा-वाय बंधू काय कामाचा आहे? असें बोलून तो शस्त्रधारी मला रावयास उठला. तेव्हां नळ, नीळ, जांबुवंत आणि हा माझा प्राण-खा मारुती मला घेऊन पळाला. साऱ्या जगांत आह्मांला कोणी आ-य देईना. माझी स्त्रीही त्यानें हरण करून घेतली आणि नित्य मार ं लागला. तेव्हां मीं या ऋष्यमूकपर्वताचा आश्रय करून राहिलों. लीला येथें येण्यास प्रतिबंध आहे, ह्मणून मी या ऋष्यमूकावर सुख-प राहतों. आह्मां दोघांला समान बळ आहे, तरी त्याच्या गळ्यांत जयमाळ असल्यामुळें त्याला जयप्राप्ति होते. आमचें प्रत्येक षण्मासीं द्ध होत असतें. याठिकाणीं हे समोर विकट व विषम असे सात ताडाचे क्ष आहेत, ते जो कोणी एका बाणानें तोडील तो वालीचा वध करील सें भविष्य आहे. असें ऐकतांच रामानें धनुष्य सज्ज करून ठाण डलें. पाठीशीं लक्ष्मणाला उभें केलें आणि त्याचा चरणांगुष्ठ दडपून कच बाण सोडला व ते सातही ताडवृक्ष छेदन करून टाकले. ते

सातही ताड शेषपृष्ठीवर होते, ते शेषावतारी लक्ष्मणाचा आंगठा दाबतांच समंरपेत आले व रामानें ते एकाच बाणानें तोडून टाकले. इतक्यांत सुग्रीवानें दुंदुभीचें प्रेत ( अस्थिपंजर ) रामास दाखविलें. तें तर रामानें चरणांगुष्ठानेंच .उडवून दिलें. याप्रमाणें अद्भुत बल व पराक्रम पाहून सुग्रीव रामचरणीं लीन झाला. राम वालीचा वध खचित करील असें त्याला वाटलें.

नंतर राम सुग्रीवाला ह्मणाला—आतां तूं किष्किंधेस जा आणि वालीला युद्धार्थ बाहेर काढ. असें ऐकतांच सुग्रीव विनयपूर्वक सांगूं लागला—प्रभो ! माझी अशी इच्छा आहे कीं, मी त्याजबरोबर युद्ध करीन, तें पहात तूं गुप्त उभें असावेंस आणि अकस्मात् बाण सोडून वालीचा प्राण घ्यावास; हें वचनही भक्तमनोरथपूरक रामानें मान्य केलें. तेव्हां सुग्रीव भुभुःकार करीत किष्किंधेस आला. त्याच्या भुभुःकारानें सारें नगर दणाणलें आणि वालीही मनांत दचकला व ह्मणाला—आज शत्रूनें मोठी गर्जना चालविली आहे. त्याला कोण साह्य झाला आहे कांहीं कळत नाहीं; असें बोलून त्यानें गळ्यांत विजयमाळ घातली व युद्धाची तयारी केली. तेव्हां तारानामक त्याची स्त्री त्याचे चरण धरून ह्मणाली—प्राणनाथ ! आज आपण युद्धाला जाऊं नये. अंगद पारधीला गेला असतां त्यानें ऋषींच्या मुखानें असें ऐकिलें आहे कीं, सुग्रीवाला रामाचें साह्य आहे, तर कृपा करा आणि आजचा युद्धाचा बेत ठेवा. हें बोलणें त्या महाबलाढ्य वालीला मान्य झालें नाहीं; तो तारेला ह्मणाला—प्रिये ! षण्मासांतीं युद्धार्थी होऊन येण्याचा त्याचा नियम असतां आज तो तिसऱ्याच दिवशीं आला आहे. घाय लागल्यामुळें तो व मी दोघेही जर्जर झालेले आहों. तथापि मारुतीनें त्याच्या साह्यार्थ कोणीतरी वीर आणला असावा हें खरें आहे; ह्मणून तुला सांगतों कीं, अंगद आणि तूं सुखानें राज्य करा. आज मी

ग्रीवाचा प्राण घेतल्याशिवाय परत येणार नाहीं. असें बोलून तो
तो उठला तो सिंहाप्रमाणें गर्जना करीत सुग्रीवावर येऊन आदळला,
त्यावेळेस पृथ्वी कांपूं लागली. दोघेही मल्लयुद्ध करूं लागले. तो
युद्धचमत्कार पाहण्यासाठीं राम गुप्त उभा होता; त्याला दोघेही वीर
सारखे दिसूं लागले. आपण बाण कोणावर टाकावा, अशी जेव्हां
भ्रांति उत्पन्न झाली, तेव्हां हनुमंतानें एक फुलांचा हार करून तो
नेऊन सुग्रीवाच्या गळ्यांत घातला.

नंतर वाली कोणता व सुग्रीव कोणता हें जाणून राम युद्धचमत्कार
पहात असतां दोघे एकमेकांस वज्राप्रमाणें कठोर मुष्टिप्रहार करूं लागले.
यांच्या हांकांनीं आकाश दणाणून राहिलें. आसमंतात् शंभर योजनां-
तील झाडें उपटून त्यांनीं एकमेकांवर टाकिलीं, तीं आकाशांत पक्ष्यां-
प्रमाणें भ्रमूं लागलीं. वारंवार भूकंप होऊं लागला; नक्षत्रें पडूं लागलीं
आणि तें मळयुद्ध पाहण्यासाठीं आकाशांत देवांच्या विमानांची दाटी
झाली. इतक्यांत वालीनें सुग्रीवावर असा एक मुष्टिघात केला कीं,त्यामुळें
त्याला प्राणांत भासूं लागला आणि राम अजून मजवर कृपा कां करीत
नाहींत? असें मनांत आणून तो दीनवदनानें मागें पाहूं लागला. तेव्हां
त्या रामचंद्रानें तूणीरांतून एक दिव्यबाण बाहेर काढला. तो बाण
कल्पांतींच्या मेघांतून विद्युल्लता बाहेर निघाल्याप्रमाणें रामानें धनुष्या-
वर लावून सोडतांच तो जाऊन वालीच्या हृदयांत एकाएकीं भरला
आणि एखादा महावृक्ष उन्मळून पडल्याप्रमाणें वाली उलथून भूमीवर
पडला. त्याचा देहांत जाणून राम त्याच्या जवळ आला. तेव्हां तो
इंद्रपुत्र वाली ह्मणाला—हे दाशरथे रामचंद्रा ! तूं एकपत्नीव्रती असतां
निरपराध्यावर बाण टाकून, दुसरी अपकीर्ति कां वरिलीस ? तुला जर
युद्ध करणें होतें, तर मला समोर बोलावून युद्ध करावयाचें. तें असें कां

केलेंस? असें ऐकतांच राम त्याला ह्मणाला-रे पाला खाणाऱ्या माकडा! तुला युद्धाला बोलावून युद्ध काय करावयाचें? वनचरांला क्षत्रियानें गुप्त उभें राहूनच दंड करावा. जो वीर असेल त्याला युद्धार्थ पाचारण करावें. तूं बंधुस्त्रीचा अभिलाष करणारा परम अन्यायी व महादुष्ट वानर आहेस. हें जाणूनच म्यां दुष्टांला दंड करण्यासाठीं अवतार घेणाऱ्यानें तुला मुद्दाम दंड केला आहे. असें ऐकतांच वाली सद्गदित झाला आणि रामा! तुझ्या हातून मुक्त झालों! असें ह्मणूं लागला. नंतर बाणव्यथेनें विकळ होऊन पुनः सावध झाल्यावर तो रामाला ह्मणाला-याच मार्गानें रावण सीतेला घेऊन गेला आहे. मी त्याला धरून आणलें असतें; परंतु काय करावें? पूर्वी त्याला कक्षेंत घेऊन मी चतुःसमुद्रांचें स्नान केलें आणि त्याला आणून अंगदाच्या पाळण्यावर बांधिलें. नंतर पुलस्तीनें येऊन भीक मागून त्याला सोडविलें. त्या मशकाचें मला मुळींच भय नवतें; परंतु कर्म बलवत्तर, ह्मणून माझ्या हातून तुझी सेवा घडत नाहीं. असें ऐकतांच राम स्नेहानें ह्मणाला-मी अजूनही तुझ्या हृदयांतील बाण उपटून काढून तुला सावध करूं शकेन. वाली ह्मणाला-पण पुनः असें तुझ्या समक्ष व समीप मरण येणें दुरापास्त आहे. तुझ्या हातानें देहांत झाल्यामुळें आतां मी मुक्त आहें. याप्रमाणें त्याचें भाषण होत आहे तों सुग्रीव जवळ आला. तेव्हां वालीनें त्याला प्रेमानें आलिंगन दिलें व आपल्या गळ्यांतील विजयमाळ काढून त्याच्या गळ्यांत घातली व ह्मणाला हे बंधो! तुझें वैर नव्हे, तो स्नेहच होय; ह्मणून अंतीं मला राम दाखवून माझा उद्धार केलास. आतां सर्वांनीं मिळून रामाची सेवा करावी आणि सीतेला सोडवावें. याप्रमाणें भाषण करून तो रामरूप अवलोकन करीत करीत विदेही झाला.

# अध्याय १८ वा.

वालीच्या देहांतसमयीं सुग्रीवानें त्याच्या उशाला मांडी दिली; त्यांत अंगदासह तारा त्याठिकाणीं येऊन पतीच्यां प्रेताला आ-ान देऊन अपार शोक करीत असतां रामाला ह्मणाली–देवा ! रे हें केलेंस ? आतां एक बाण सोडून माझा तरी प्राण घे; ह्मणजे ा हा शोकनद आटून जाईल. असें ऐकतांच राम तिला विचारूं ाला–बाई ! तूं शोक कां करितेस ? तारा ह्मणाली–रामा ! कायरे चारतोस ? मी पतिवियोगाग्नींत जळतें आहें. असें ऐकतांच राम ाला–वालीच जर तुझा पति होता, तर वाली हें नांव ज्या कले-ें होतें तें तुझ्यापुढें पडलें आहे. असें ऐकतांच ती ह्मणाली. हृद- आत्मा निघून गेला, आतां या कलेवराला घेऊन मी काय करूं ? ह्मणाला–आत्मा तर अविनाश व शाश्वत आहे. असें असतां कां करितेस ? तूं आत्म्याची स्त्री कीं शरीराची ? याचा विचार न मला सांग बरें ? जसें घटांत आणि मठांत एकच सूर्यबिंब तें, तसा स्त्रीपुरुषाभिमानी आत्मा एक असून तो अव्यंग आहे. किंवा मठ निःशेष फोडून अथवा मोडून टाकले तरी जसा आका-ा नाश होत नाहीं, तसा आत्म्याचा कधींही नाश होत नाहीं. ा अक्षय आहे, असें असतां तूं शोक कां करितेस ? याप्रमाणें ंद्रानें बोध करितांच तारेचा शोक समूळ दूर झाला. नंतर राम ा ह्मणाला–आतां तूं सुग्रीवाला माळ घालून आनंदानें वागावेंस, आमची इच्छा आहे. असें ऐकतांच ती ह्मणाली–हें वेदविरुद्ध कसें आचरण करावें ? रामानें तिला सांगितलें–आह्मी तुह्मी

पतिव्रतांत गणना करूं. यापासून तुला कोणीही दोष लावणार नाहीं. असें ऐकतांच तिनें रामवचनाचा आदर केला, तेव्हां सर्व वानरांनीं आनंदेंकरून भुभुःकार केले. नंतर सुग्रीवानें वालीची उत्तरक्रिया केली राम अंगदावर प्रीति करूं लागला. तारेनें सुग्रीवाच्या गळ्यांत माळ घालतांच सर्वत्रांस अत्यानंद झाला.

नंतर राम सुग्रीवाला ह्मणाला—आह्मीं चार मासपर्यंत येथें राहण्याचा विचार केला आहे. त्वां राज्यसुख भोगून लौकर परत यावें. असें ऐकतांच सुग्रीव ह्मणाला—प्रभो ! आपणही कृपा करून किष्किंधेस चलावें. राम ह्मणाला—माझ्या भरतासाठीं मी व्रतस्थ आहें व सर्व मंगलभोग वर्ज्य केले आहेत. असें बोलत असतां भरताचे गुण आठवून राम व लक्ष्मण यांचे कंठ शोकानें दाटून आले. शेवटीं रामानें लक्ष्मणाला सांगितलें कीं, तूं जा आणि सुग्रीवावर छत्र धर. असें ऐकतांच लक्ष्मणानें सर्वांसह किष्किंधेस जाऊन सुग्रीवाला राज्यासनीं बसविलें. अंगदास अमात्यपदवी दिली आणि तो जेथें राम राहिला होता तेथें त्वरेनें परत आला. मारुती सर्वदा रामासमोरच हात जोडून उभा राहूं लागला.

पुढें चार महिने लोटल्यावर जेव्हां शरत्कालाचे दिवस आले, तेव्हां वाट पाहून थकलेल्या रामानें लक्ष्मणाला सांगितलें—सौमित्रा ! सुग्रीव राज्यमदानें अंध झाला असें मला वाटतें. विषयांत रंगून गेल्यामुळें तो मला दिलेलें वचन विसरला. यासाठीं तूं किष्किंधेस जाऊन त्या सूर्यपुत्राला माझी आठवण कर आणि जर तो माझें वचन अमान्य करीत असेल तर त्याचा वध करून परत ये. वालीला ज्या बाणानें मारिलें त्याच बाणानें त्याचा प्राण घे. असें ऐकतांच रामचरण वंदून चापाला गुण लावून लक्ष्मण किष्किंधेसमीप गेला आणि त्यानें चापाला बाण

विला, तों मारुतीनें सुग्रीवाला जाऊन सर्व वर्तमान कळविलें; पण तो घपानानें व तारुण्यमदानें धुंद झालेला सुग्रीव त्याला ह्मणाला—अरे! वानरसेना तयार करून सीतेच्या शोधाला पाठवून दे. त्यांत काय आहे? याप्रमाणें बोलून तो जनानखान्यांत प्रवेश करीत आहे तों प्रळ- याग्नीप्रमाणें संतप्त झालेल्या लक्ष्मणास पाहतांच घाबरलेले द्वारपाळ येऊन जेव्हां त्याला सर्व वृत्तांत सांगूं लागले, तेव्हां मात्र तो घाबरला आणि मारुतीच्या गळ्यास मिठी मारून, आतां माझें संरक्षण कर; असें णूं लागला. मारुती ह्मणाला—सुमित्रानंदन कोपला आहे, तो कोणालाही आवरणार नाहीं; तरी स्त्रियांस पुढें करून सर्वांसह तूं नम्रतेनें लोटांगणें घाली- त चल. असें ऐकतांच सुग्रीव मारुतीच्या सांगण्याप्रमाणें येऊन लक्ष्मणच- रणीं लीन झाला व तारा आणि रुमा अनेक प्रकारें आर्जव करून चुडे- दान मागूं लागल्या. तेव्हां लक्ष्मण ह्मणाला—तुह्मी सर्व निर्दय व अप्रयो- जक आहां. सच्चिद्घनरामाला अरण्यांत टाकून राज्यसुखानुभव घेत बस- णाऱ्या सुग्रीवा! तुला रामवचनाची स्मृति झाली नाहीं कायरे? असें ऐकतांच हनुमंत नम्रवचनानें ह्मणाला—आतां सर्वापराध क्षमा करून सुग्री- वाला प्रेमालिंगन द्यावें. हा लीन दीन होत्साता शरण आला आहे. या- प्रमाणें मारुतीचें वचन ऐकतांच शांत होऊन लक्ष्मणानें सुग्रीवाला उठ- वून आलिंगन दिलें; नंतर कपिदळासहवर्तमान सुग्रीव येऊन रामपदीं लीन झाला व अपार स्तवन करूं लागला; तेव्हां रामानेंही त्याला उठ- वून प्रेमालिंगन दिलें; तेव्हां सुग्रीव ह्मणाला—प्रभो! हे सर्व वानर सीता- शोधास्तव अत्युत्सुक आहेत; यांस आज्ञा करावी- असें ऐकतांच रामानें चा शोध करण्याबद्दल अनुमोदन दिलें.

ामाचें अनुमोदन मिळतांच सुग्रीवानें दूत पाठवून सप्तद्वीपांतील

मानें आनंदित होऊन त्याला आपली अवतारमुद्रिका खुणेसाठीं दिली आणि मारुती! सीतेचा शोध घेऊन कधीं परत येशील ? असें विचारलें. तेव्हां मारुतीनें सांगितलें—प्रभो! एक मास भरला नाहीं तों सीतामातेचा शोध घेऊन परत येतों. असें बोलून त्यानें रामचरणीं वंदन केलें आणि 'जय यशस्वी रघुवीर'! असें बोलून उड्डाण केलें. नंतर थोड्याच वेळांत तो ज्या ठिकाणीं कपि त्याची वाट पहात होते, त्या ठिकाणीं येतांच सर्व कपि 'जय रघुवीर समर्थ'! असें वारंवार ह्मणत व उड्डाणावर उड्डाणें घेत दक्षिणपंथ लक्षून निघाले.

मारुतीसहवर्तमान एकशेंपांच कपि उड्डाणावर उड्डाण घेऊन वारंवार 'जय यशस्वी रघुवीर'! ह्मणून भुभुःकार करीत चालले असतां कांहींसे दूर गेल्यावर एकाएकीं त्यांच्या शक्ति आकर्षण झाल्या व गति बंद झाल्याकारणानें ते सर्व शक्तिरहित होत्साते मुरकुंड्या वळून खालीं पडले; इतक्यांत एक भयंकर ब्रह्मराक्षस त्यांस भक्षण करण्याच्या इच्छेनें तोंड पसरून धांवत आला. त्याला पाहतांच सर्व कपि भय पावले, परंतु परमप्रतापी वालीपुत्र अंगद अवसान धरून निःशंकपणें उठला आणि त्यानें त्या राक्षसाचे दोन्हीं पाय धरून त्याला गरगर फिरविलें आणि भूमीवर आपटलें. त्यामुळें त्या राक्षसाच्या शरीराचा तर चुराडाच उडाला; परंतु तो दिव्यदेहधारी होऊन त्या सर्व रामदासांचें स्तवन करूं लागला. नंतर कपींनीं विचारल्या वरून तो आपला व त्या शापदग्ध अरण्याचा वृत्तांत सांगूं लागला.

या वनांत पूर्वीं एक दंडक नामक महातपस्वी ऋषि रहात होता, त्याचा मी पुत्र. मी अठरा वर्षांचा झालों आणि सहज या अरण्यांत खेळत होतों, तों एक भयंकर वनदेवता धांवत आली आणि माझा बाप

जवळ नाहीं असें पाहून तिनें मला भक्षण केलें. नंतर माझ्या बापाला तें वर्तमान समजतांच त्यानें या वनाला शाप दिला कीं, जो प्राणी या अरण्यांत संचार करील तो तत्क्षणीं मरण पावेल. या प्रमाणें शाप देऊन माझा बाप गेल्यावर मी ब्रह्मराक्षस होऊन या वनांत राहिलों आणि अनेक प्राणी भक्षण केले. तुम्ही सर्व कपि रामस्मरणीं सावध होतां, म्हणून वांचलां आणि तुमच्या हस्तस्पर्शानें माझा उद्धार झाला. आतां मी आपल्या पित्याच्या दर्शनासाठीं निघून जातों, असें बोलून तो निघून गेला.

नंतर कपि तेथून पुढें जाण्यास सिद्ध झाले; परंतु त्यांना मार्ग सुचेना, दिशा कोणती आहे हेंही समजेना आणि अगदीं भ्रम पडल्यासारखें झालें. कारण—त्या वनांतील सर्व वृक्ष दग्ध झालेले असल्यामुळें फळें तर नव्हतींच आणि पाणीही नव्हतें. ते सर्व क्षुधेनें व तृषेनें व्याप्त होऊन अगदीं विव्हळ झाले आणि ते शुष्कदग्धारण्य शोधूं लागले; इतक्यांत एका विवरांतून पक्षी फळें आणीत आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें आणि कांहींसा आनंद मानून ते सर्व त्या विवरद्वारापर्यंत जाऊन थबकले. त्या विवरांत एक योजनपर्यंत अगदीं अंधःकार दिसत होता. तेव्हां मारुती पुढें झाला आणि त्याच्या मागून सर्व चालूं लागले. तरी अर्धयोजन क्रमण करीत आहेत; तों सर्वांचे प्राण कासावीस झाले आणि सर्व मूर्च्छित होऊन पडले. त्यांचे श्वासोच्छ्वास बंद झाल्यामुळें सर्वांचा प्राणांत होतो असें वाटलें. त्यांत एकटा मारुतीमात्र सावध होता. त्यानें जेव्हां असा भयंकर प्रसंग पाहिला, तेव्हां सर्वांना आपल्या पुच्छानें बांधून उचललें आणि विवराबाहेर नेलें. तेव्हां प्रकाश त्यांच्या दृष्टीस पडला आणि फलपुष्पांनीं मंडित रमणीय व सुंदर वनही त्यांच्या दृष्टीस पडलें; परंतु सर्वांच्या शक्ति क्षीण झालेल्या होत्या, म्हणून कोणाच्या-

नेंही त्या वृक्षांवर चढून फलभक्षण करवेना आणि अमृताप्रमाणें उदक होतें तेंही प्राशन करवेना इतक्यांत एक सुप्रभानामक खेचरी त्या ठिकाणीं येऊन उभी राहिली. तिला पाहतांच मारुतीनें प्रश्न केला—बाई! हें सुवर्णाचें नगर कोणीं निर्माण केलें ? आणि या उपवनाचा मालक कोण आहे ? असें ऐकतांच ती सुप्रभाखेचरी सांगूं लागली.

पूर्वी या ठिकाणीं मयासुरदैत्य तपश्चर्या करीत होता. त्यानें ब्रह्मदेवाची आराधना केली, तेव्हां त्या परमेष्ठीनें हें स्थल निर्माण करून त्या असुराला दिलें आणि सांगितलें कीं, या विवरांतील रमणीय नगरांत तूं चिरंजीव होशील; जर बाहेर जाशील तर मरण पावशील. या प्रमाणें वर देऊन ब्रह्मदेव गेल्यावर नानाप्रकारची मंत्रविद्या साधून कपटें करणारा आणि हवनें करून असुरांचें कल्याण इच्छिणारा तो मयासूर जेव्हां फारच उग्र तपश्चर्या करूं लागला, तेव्हां इंद्रानें विधीची प्रार्थना करून हेमानामक लावण्यसंपन्न स्त्री निर्माण केली आणि या विवरांत पाठविली. तो कपटी निशाचर तिला पाहतांच भुलला आणि हे सुंदरी! तूं मला वर; असें ह्मणूं लागला. तेव्हां ती ह्मणाली—तूं विवराबाहेर येशील तर मी तुला वरीन. असें ऐकतांच तो स्त्रीलोभास्तव आपलें मरण विसरला आणि विवराबाहेर गेला तों इंद्रानें वज्रप्रहार करून त्याचा चुराडा उडविला. नंतर पितामहानें हें हेममय नगर त्या हेमेला दिलें; पण तीही कांहीं काळक्रमण करून सत्यलोकास गेली. मी तिची परिचारिका. हें देवांसही दुर्गम उपवन आणि नगर याचें संरक्षण करीत आहें. हेमेनें सत्यलोकीं जातांना मला सांगितलें आहे कीं, या ठिकाणीं कपिगण येतील, ते तुझा उद्धार करितील.

याप्रमाणें तिचा वृत्तांत ऐकल्यावर हनुमंतानें तिला सांगितलें कीं,

आह्मीं सीताशुद्ध्यर्थ निघालेले रामाचे दास क्षुधा व तृषाक्रांत होऊन या विवरांत आलों आहों. असें ऐकतांच तिनें साष्टांग नमस्कार घातला आणि उदक, फळें व पुष्पें आणून सर्व वानरांसहित मारुतीची मनोभावानें पूजा केली. तेव्हां फळें व उदक सेवन करून सर्व सावध झाले आणि परत निघाले; पण त्यानां विवराचें द्वारच सांपडेना. तेव्हां मारुती पुनः तिच्याजवळ येऊन ह्मणाला—माते! आह्मांला मार्ग दाखीव. असें ऐकतांच तिनें सर्व वानरांना बोलावून तुह्मीं नेत्र झांका, असें सांगितलें आणि मन्त्र जप करून उघडा असें बोलली. सर्व कपींनीं तिच्या सांगण्याप्रमाणें नेत्र मिटून पुनः उघडतांच ते समुद्रावर जाऊन उभे राहिले. एकाएकीं समुद्रतीर दृष्टीस पडतांच त्यांना आश्चर्य वाटलें आणि त्यांतच सुप्रभा गुप्त झालेली, हें महदाश्चर्य!

इकडे सुप्रभा जी त्या विवरांतून निघाली, ती किष्किंधेस जाऊन रामपदीं लीन झाली व रामरूप पाहतांच अत्यानंदानें स्तवन करीत असतां ह्मणाली—हे ब्रह्मानंदा, आत्मारामा! मला पावन कर. असें ऐकतांच रामानें तिला दिव्यज्ञानोपदेश करून बदरिकाश्रमीं पाठविलें. कालांतरानें ती तेथेंच देह ठेवून स्वस्वरूपीं रममाण झाली.

इकडे समुद्रतीरावर उभे राहिलेले वानर सीतेचा शोध लागत नाहीं; ह्मणून चिंताक्रांत होत्साते अग्निकाष्ठें भक्षण करण्यास सिद्ध झाले असतां, जांबुवंत ह्मणाला—मी सर्वांहून वडील आहें, ह्मणून आधीं मी प्राण देणार? मारुती ह्मणाला—तसें नाहीं. माझ्या गांठीस आयुष्य फार आहे ह्मणून मी वडील. तुझें मरण जवळ आलें आहे. याप्रमाणें भवति नभवति होत असतां सर्वानुमतें पहिल्यानें मारुतीनें अग्निप्रवेश करावा असें ठरलें आणि 'जय रघुवीर समर्थ!' असें ह्मणून हृदयांत

रामाचें ध्यान आणून त्यानें अग्नींत उडी टाकली; परंतु मारुतीच्या स्पर्शानें सगळा अग्नि एकदम शांत झाला. याप्रमाणें त्यानें तीन वेळ केलें व तिन्ही वेळ तो अगदीं शांत झाला. तेव्हां सर्वांसच आश्चर्य वाटलें व सर्व ह्मणाले—हनुमंता ! आतां आह्मांला तरी मरूंदे. असें ऐकतांच मारुती ह्मणाला—आतां समुद्रांत जीव देऊं चला. जाम्बुवंताचेंही असेंच मत पडलें, तेव्हां सर्व मिळून पुनः समुद्रतीरावर गेले. नंतर मारुती चितातुर होऊन एका बाजूला गेला आणि रामाचें ध्यान करीत बसला व सर्व कपींनीं चिंतावश होऊन शयन केलें; इतक्यांत संपाती चोंच पसरून त्यांना भक्षण करण्यासाठीं सरपटत सरपटत त्यांच्याजवळ आला. तो जटायूचा थोरला भाऊ, जटायूसारखाच दिसत असे. वानरांनीं हा त्याचा भाऊ असावा असें अनुमान केलें; तों तो संपाती त्यांना भेवडावूं लागला. तरी त्यांना भय न वाटतां अनायासें मरण जवळ आलें ह्मणून आनंदच वाटला. ते सर्व रामचरण आठवून नामस्मरणानें गर्जना करूं लागले. ज्या रामाचें नांव घेतांच अनेक संकटांत पडलेला प्राणी मुक्त होतो; त्याचें स्मरण प्राणसंकटीं पडलेले त्याचेच दास करीत असतां त्यांजवर आलेलें संकट कसें निवारण होणार नाहीं ? कपी गजरानें रामनाम स्मरण करीत असतां अपूर्व चमत्कार झाल्याप्रमाणें संपातीला पक्ष फुटले व तो जयजयकार करून लोटांगण घालूं लागला. नंतर त्यानें त्या सर्व कपींची धन्यता वर्णन करून राम कोठें आहे सांगा ? असा प्रश्न केला आणि तेथें माझा सहोदर जटायूही असेल असें ह्मणाला—तेव्हां मारुतीनें राम किष्किंधेस आहे आणि जटायूला रावणानें मारिलें इत्यादि वर्तमान त्याला सांगितलें. तेव्हां भ्रातृनिधन ऐकतांच शोकाकुलित झालेला संपाती आपलें पूर्ववृत्त सांगूं लागला.

आह्मीं दोघे एकवेळ सूर्यमंडळ पहावयासाठीं गेल्ों असतां मी आपला जिवलग बंधु पंखांखालीं लपविला आणि त्याला वांचविला. त्यावेळीं माझे पक्ष दग्ध झाले व मी घाबरून ओरडलों; पण तो शब्द ऐकतांच सूर्याच्या रथावर बसून सारथ्य करीत असलेला माझा पिता अरुण पुत्र-स्नेहास्तव कळवळला आणि त्यानें सूर्याची प्रार्थना करून मला वर देवविला कीं, रामदूतांचें दर्शन होतांच तुझे पक्ष पूर्ववत् होतील. मी त्याचवेळीं एखादा पर्वत कोसळल्याप्रमाणें जो पडलों तो आजपर्यंत तळमळत होतों. आज तुमच्या दर्शनानें माझा उद्धार झाला. त्याचप्रमाणें स्वतः रामानें पितृव्य मानून जटायूचें और्ध्वदेहिक केलें, तर त्याचीही सद्गती झाली. येथें हा समोर चंद्रगिरीपर्वत आहे, त्यावर एक चंद्रनामक महंत राहतो. तो मला नित्य वेदांतज्ञान सांगत असे; ह्मणून मी आजपर्यंत जिवंत राहिलों आहें. असो. हे कपिवीर हो ! आतां तुह्मीं कोठें जातां हें मला सांगा ? कपि ह्मणाले—आह्मीं सीतेचा शोध करीत निघालों आहों. असें ऐकतांच संपाति ह्मणाला—ती पहा येथून शतयोजनें दूर लंकानगरी आहे ती मला दिसत आहे. त्या लंकेंतील अशोकवनांत सीतासती ध्यानस्थ बसली आहे. तुह्मीं सर्व माझ्या पाठीवर बसा, ह्मणजे लंकेंत एका क्षणांत तुह्मांला नेऊन पोंचवितों. अथवा माझे एकशेंएक पुत्र आहेत त्यांवर पृथक् पृथक् बसा आणि चला. जांबुवंत ह्मणाला—पक्षींद्रा! कृपाकरून आह्मांला लंकेंत जाण्यास मार्ग सांग. असें ऐकतांच संपाति ह्मणाला—हा जो अलीकडे मलयगिरीवरील चंदन वृक्ष आहे, याचीं शाखा शतयोजनें लांब लंकेंत जाऊन पसरली आहे. परंतु तेथें महासर्प आहेत, तुमच्यानें जाववणार नाहीं. लंकेसभोंवती चारशें कोस समुद्राचा परिघ आहे. याप्रमाणें सांगून संपाती आपल्या ठिकाणीं गेल्यावर जांबुवंतासह सर्व वानर विचार करीत बसले.

जांबुवंत ह्मणाला—मी शंभर योजनें सागर उड्डाण करून उल्लंघीन, पण मी आणि सुषेणवैद्य, हे दोघे फार दमलेले आहों. बळीच्या द्वारीं वामन द्वारपाळ झाला, त्या वेळेस एके दिवसांत आह्मीं सात पृथ्वीप्रदक्षिणा केल्या, त्यामुळें दमलेले आणि वृद्ध आहों; ह्मणून शंका वाटते. नंतर एक वेळ मेरुवरून भूमीवर उडी मारिली, तेव्हां मांडीला सूर्यरथचक्र लागलें व जी व्यथा झाली ती आतां या वार्धक्यांत फार जाणवते. अंगद ह्मणाला—मी जाईन पण तेथें जाऊन काय करावें हें मला कळणार नाहीं. नंतर जांबुवंत ह्मणाला—आतां त्या ध्यानस्थ असलेल्या वायुसुताला विचारा. त्याच्याशिवाय हें काम होणार नाहीं. असें ऐकतांच सर्व मारुतीजवळ गेले आणि सन्मानपुरःसर त्याला विचारूं लागले—अंजनीतनया ! तूं किती दूर उडी मारशील ? असें ऐकतांच मारुतीला हंसें आलें आणि तो ह्मणाला—ज्या वेळीं माता मला प्रसवली, त्या वेळीं मला बाळभूक लागली होती व मी सूर्यबिंबाला फळ मानून एकलक्ष योजनें उडून सूर्याला धरलें होतें; असें ऐकतांच सर्व वानरांनीं त्याच्या अद्भुत बलाबद्दल माना डोलविल्या आणि त्याला तूंच लंकेंत जा असें विनयपूर्वक सांगितलें. तेव्हां मारुतीला फारच स्फुरण आलें आणि तो सर्व वानरांस ह्मणाला—आतां तुह्मीं पर्वत पोटाशीं धरून बसा, नाहींतर माझ्या अंगवातानें समुद्रांत पडाल. असें ऐकतांच जांबुवंतादि सर्व वानर हनुमंताचें कौतुक पाहण्यासाठीं वृक्ष पाषाणांदिकांस कंवटाळून बसले. नंतर वारंवार रामस्मरणपूर्वक पुच्छाचा फडत्कार करून तो अंजनीतनय मारुती उड्डाण करण्यास तयार झाला.

अध्याय १९ वा.



पतीला इंद्रानें युद्धांत मारिलें, म्हणून रावणानें तिची पडलंकेंत स्थापना केली होती. मारुतीची उडी तेथें पडतांच ती पडलंका दणाणून गेली. तेव्हां काय आहे म्हणून शोधकरण्यासाठीं त्या क्रौंचेनें कित्येक राक्षसी पाठवून दिल्या. त्यांनीं बाहेर येऊन हनुमंताला धरिलें. 'त्यावेळीं त्यानें फारच लहान रूप धरलें होतें. राक्षसींनीं त्याला नेऊन क्रौंचेच्या पुढें उभा करितांच तिनें आज्ञा केली कीं, याला चिरा आणि पाक सिद्ध करून आणा. तेव्हां मारुतीनें त्या क्रौंचेला सांगितलें कीं, मला जर चिराल तर मी अगदीं निरुपयोगी होईन. माझा देह पाण्याच्या बुडबुड्यासारखा आहे. यासाठीं तूं मला असेंच भक्षण कर. याप्रमाणें त्याचें भाषण ऐकतांच त्या क्रौंचेनें त्याला तसेंच उचललें आणि मुखांत घातलें व दांताला दांत लावणार इतक्यांत तो मारुती तिच्या पोटांत शिरला. अंजनीतनयानें पोटांत शिरतांच त्या राक्षसीचें काळीज दोहों हातांनीं धरिलें आणि झोंके घेण्याचा आरंभ केला. तेव्हां ती चडफडून डोळे फिरवूं लागली व गडबड गडबड भुईवर लोळून अगे मला कोणीतरी वांचवागे ! असें म्हणूं लागली. तेव्हां तिच्या परिचारिका असुरी तेथें होत्या, त्यांनीं सूकरविष्ठा आणून तिला पाजली, तेव्हां मारुती कंटाळला आणि बाहेर निघण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यानें तिच्या नाकांतून आपलें पुच्छाग्र बाहेर दाखविलें; तेव्हां हें रोगबीज, असें म्हणून राक्षसी ओढूं लागल्या. तेव्हां असा चमत्कार झाला कीं, जों जों तें त्या ओढूं लागल्या तों तों अधिकाधिक बाहेर येऊं लागलें आणि त्याचा पर्वतासारखा ढीग पडला. तेव्हां सर्व राक्षसी आश्चर्यचकित होत्सात्या पाहूं लागल्या. नंतर मारुतीनें आंतूनच त्या पुच्छाच्या डिगाऱ्यानें सगळ्या राक्षसी करकरावून बांधल्या व आसुडल्या. नंतर तो अद्भुत बलवान

मारुती क्रौंचेचीं आंतडीं तोडून बाहेर पडला आणि गर्जना करीत असतां असंख्यात राक्षसी झोडपून त्यानें समुद्रांत बुडविल्या. नंतर त्या उपलंकेंत ( पडलंकेंत ) ज्या वृद्धा राक्षसी शेष राहिल्या होत्या, त्यांना मारुतीनें दटावून विचारिलें कीं, लंका कोणती आहे ती दाखवा, नाहींतर मी तुम्हांला भक्षण करीन. असें बोलून तोंड पसरून जेव्हां तो त्यांच्या अंगावर धांवला, तेव्हां त्या थरथर कांपूं लागल्या आणि ती पलीकडे लंका दिसत आहे, असें उत्तर देऊन त्यांनीं आपापले जीव वांचविले.

नंतर सूर्यास्तसमयीं मारुतीनें निकुंबळेंत प्रवेश केला. त्या वेळेपासून सीतेचा शोध लागावा या हेतूनें तो प्रत्येक घर शोधूं लागला, तों त्याला हेममय रत्नखचित इंद्रजिताचें मंदिर दिसलें व त्यानें त्या मंदिरांत प्रवेश केला. हनुमंत त्या मंदिरांतील मुख्य स्थानापर्यंत जेव्हां गेला, तेव्हां इंद्रजित व सुलोचना हीं दोघें मणिमय मंचकावर निद्रिस्थ झालीं होतीं; तीं त्याच्या दृष्टीस पडलीं. सुलोचनेला पाहतांच हीच सीता, परपुरुषाशीं रत झाली, असें त्याला वाटलें आणि एक पाषाण टाकून दोघांचाही जीव घ्यावा असें त्याच्या मनांत आलें. इतक्यांत सुलोचना इंद्रजिताला सहज ह्मणाली–प्राणनाथ! मामंजींचें आणि त्या दाशरथी रामाचें यत्किंचित्‌ही वैर नसतां त्यांनीं त्याची स्त्री चोरून आणली आहे, हें कुलक्षयाचें कारण नव्हे का?

याप्रमाणें त्या सुलोचनेच्या तोंडचे शब्द एकतांच ही सीता नव्हे, अशी मारुतीची खात्री झाली. नंतर तो बिभीषणाच्या शांत मंदिरांत गेला. त्या सत्वशील विष्णूपासकाचे घरांत सर्वदा हरिकीर्तन चाललें असल्यामुळें तेथें जातांच त्या रामभक्ताच्या मनाला समाधान वाटलें. त्यानें त्या विष्णुभक्ताचे चरणरज मस्तकीं वंदन करून मनांत ह्मटलें–

जसा कागविष्ठेपासून पवित्र अश्वत्थ उत्पन्न होतो, तसा हा राक्षसकुलांत धर्मात्मा आहे. प्रभूनें रावणाला मारल्यावर लंकेचें राज्य यालाच देण्या-बद्दल मी रामाला विनवीन. असा विचार करीत असतां तो सीतेचा शोध करीत पुढें निघाला.

नंतर त्याला कुंभकर्णाचें मंदिर दिसलें; पण तेथें जातांच दुर्गंधि आल्यामुळें त्याचें मन अगदीं कंटाळून गेलें. मेघगर्जना होते, तसा तो कुंभकर्ण घोरत पडला होता व त्याच्या कानांत कित्येक हत्ती, खेचरें व गाढवें भरून अडकलेलीं होतीं. अंत्यजाचें घर पाहतांच जसा श्रोत्रिय ब्राह्मण त्याचा त्याग करून जातो, तसा मारुती त्या सदनाचा त्याग करून निघाला आणि सीतेचा शोध लागत नाहीं; ह्मणून चिंताक्रांत होत्साता आतां कोणतें रूप धरून लंकेंत शिरावें, असा विचार करूं लागला. तो ह्मणाला—या कपिवेषानें जर फिरलों, तर राक्षस विनो-दानें धरून पीडा करतील व राक्षसवेष घेऊनच जर फिरलों तर मांसा-हार करवितील व त्यामुळें पुण्याचा क्षय होईल. याप्रमाणें अनेक प्रकार मनांत आणून शेवटीं त्यानें मुंगीच्याही डोळ्यांत न खुपण्यासारखा अणुप्रमाण सूक्ष्म वेष धारण केला व तो घरोघर हिंडूं लागला. त्यानें प्रत्येक घर पाहिलें तों पूर्ण अनाचार चाललेला आहे. तरी जशीं मैंदाची शांति, तसे प्रत्येक गृहस्थ वरवर मात्र शांति दाखवितांहेत. घरोघरीं अग्निहोत्र आणि वेदाध्ययन चाललेलें आहे; परंतु गोब्राह्मण पाहतांच दाढेखालीं घालून रगडण्यास कांहीं त्यांना शंका वाटत नसे. नर व नारी जारकर्मीं रत असून रुद्राक्षभूषित होऊन कपटमंत्राचरण करीत आहेत. कोणी हृदयांत मदमत्सरांचा सांठा बाळगून आह्मीं कर्मातीत आहों, ह्मणून प्रतिपादन करीत आहेत. एक राक्षस संन्याशाचा वेष

घेऊन गोमांस भक्षण करितो आणि आचमन करून कर्ता करविता एक ईश्वर आहे, असें प्रतिपादन करितो. कोणी घृत, तीळ व तांदूळ जाळून होम करीत आहेत. कोणी जटाधारी, कोणी मौनी, पण गोचर्में पांघरून बसलेले याप्रमाणें अनेक प्रकार पहात व कंटाळत मारुती सीतेला शोधीत होता. तरी कोठेंही त्याला तिचा शोध लागला नाहीं. प्रहस्तादिक प्रधानांचीं घरें शोधल्यावर त्याच्या मनांत अनेक तर्क आले. पहिल्यानें त्याला असें वाटलें कीं, जानकीनें रामविरहामुळें प्राणत्याग केला असावा, सागरांत बुडाली असावी किंवा वश न झाल्यामुळें क्रोधांध होऊन रावणानेंच भक्षण केली असावी. अथवा सवतिमत्सर मनांत आणून रावणाच्या स्त्रियांनीं तिला मारलेंही असेल. याप्रमाणें अनेक तर्क करीत असतां त्यानें आतां सर्व लंकेला त्रास द्यावा. म्हणजे कदाचित् सीतेचा शोध लागेल, असें मनांत आणून मध्यरात्रीच्या सुमारास त्या सुशोभित लंकेंतील ध्वज पताकांनीं मंडित गोपुरें ढांसळण्याला आरंभ केला. त्यामुळें निद्रार्णवीं निमग्न असलेले राक्षस अकस्मात् दडपून यमसदनीं जाऊं लागले. जसे पर्वताचे कड खचून पडतात, तशीं असंख्यांत कनकगोपुरें पडूं लागलीं. मारुती महाद्वारें उचलून आकाशांत भिरकावून देऊं लागला. त्यानें गवाक्षद्वारानें बंद असलेल्या घरांत आपलें पुच्छ घालावें व गृहस्तंभ उपटून पाडावे, लत्ताप्रहार करून कपाटें मोडावीं, मोठमोठे वृक्ष उपटून घरें झोडावीं आणि जमिनदोस्त करावीं; असा जेव्हां अनर्थ मांडला, तेव्हां सर्व नगरवासी निशाचर भयभीत झाले. असा एक कल्होळ माजला. कोणी पळारे पळा! म्हणताहेत तों डोक्यावर शिळा पडूं लागल्या. तों मारुती राक्षसांचीं बालकें धरून आकाशांत फेंकून देऊं

लागला; तेव्हां राक्षसस्त्रिया वक्षस्थळें बडवून आक्रोश करूं लागल्या. त्यानें कित्येक नग्न असलेलीं जोडपीं नकळत मंचकासह उचलून रस्त्यांत आणून ठेविलीं. भांडारसदनें फोडून नानाप्रकारच्या वस्तु आणल्या व त्या सर्व रस्त्यांत पसरून टाकल्या. तो वारंवार पुच्छाचा फडत्कार करी, त्यामुळें सर्व राक्षस घाबरून गेले.

याप्रमाणें उजाडेपर्यंत साऱ्या नगराला त्रास देऊन तो अंजनीपुत्र पूर्ण कलह लावण्याकरितां पुच्छाचे मुके घेत राजद्वारावर जाऊन बसला. इतक्यांत प्रातःकाल झाला, ह्मणून स्त्रिया मस्तकावर जलकुंभ घेऊन जाऊं लागल्या; तों मारुतीनें हळूच आपलें पुच्छ सोडून सर्वांच्या कुंभाला एकदम गुंडाळलें आणि ते सर्व जलकुंभ अकस्मात् पाडून फोडले. सर्व स्त्रिया घागरी कोण फोडतें? असें ह्मणून दचकल्या, इतक्यांत त्यानें त्यांच्या नाकांत व कानांत पुच्छाग्र घातलें. त्यामुळें तर त्या अतिशयच बिचकल्या आणि सटासट् शिंका देऊं लागल्या. मारुतीनें त्या दिवशीं कांहीं भरलेला घट नगरींत जाऊं दिला नाहीं. राजद्वारीं असंख्यांत मडकीं फुटल्यामुळें सर्व स्त्रिया रावणाला शिव्या देत असतां "हें सीतेनें चेतविलेलें भूत खवळलें आहे. हें रावणाचा कुलक्षय करील." इत्यादि अनेक प्रकारें बडबडत आपापल्या घरीं चालत्या झाल्या.

नंतर प्रातःकालच्या राजदर्शनासाठीं महावीर घोड्यांवर बसून आले. त्यांना पाहतांच गुप्त असलेल्या मारुतीनें घोड्यांचे पाय धरून पाडलें. घोडे गरागर फिरवून आपटले आणि कित्येक स्वार घोड्यांसह उचलून स्वारांच्याच अंगावर टाकून जायां केलें. इतक्यांत उन्मत्त हत्तीवर बसून कित्येक मानकरी आले, तों मारुतीनें गजांचे दंत उपटून त्यांना झोडपण्याचा कारखाना चालविला, कित्येक अंबारीसहित हत्ती

उचलून समुद्रांत फेंकून दिले, तों रथांत बसलेले राजकुमार नाना प्रकारचीं वाद्यें वाजवीत निघाले, त्यांला पाहतांच मारुतीला क्रोध आला. त्यानें शेंकडों रथ उलथून पाडले. सारथी आकाशांत भिकाविले. घोडे मारून टाकले आणि पुच्छानें वाजंत्र्यांसही झोंडपल्यामुळें ते शंख करीत पळून गेले. नंतर पालख्यांतून बसून रावणाचे कित्येक प्रधान आले. त्यांस पाहतांच मारुतीनें आपलें सूक्ष्म पुच्छाग्र भोयांच्या कानांत व नाकांत घालून त्यांच्याकडून पालख्या टाकविल्या. जेव्हां उलथून पडलेले प्रधान आपापल्या भोयांला रागें भरूं लागले; तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, महाराज ! जानकीनें पिशाच चेतविलें आहे, तेंच तुमच्या पालख्या मोडून तुमचा अपमान करीत आहे. आह्मांला व्यर्थ कां दंड करितां ?

मारुतीनें हत्ती, घोडे, रथ, पालख्या इत्यादि वाहनें उलथून पाडण्याचा सपाटा चालविल्यामुळें त्या दिवशीं कांहीं कोणी राजद्वाराकडे पाऊल घालीना. जो तो महावीर सांधीकोनांत जाऊन दडून बसला. नंतर तो वातात्मज पुनः घरोघरीं फिरून सीतेबद्दल कोणी कांहीं बोलतें काय ? ह्मणून पाळत घेऊं लागला. इतक्यांत सायंकाल झाला व दिवे लागले; तेव्हां मारुतीनें रावणाच्या सभास्थानीं प्रवेश केला. रावण सिंहासनावर बसला होता आणि मारुती त्याच्या पाठीमागें उभा होता. इतक्यांत नगरींत संचार करून बातम्या आणणारे कित्येक दूत आले आणि रावणाला सांगूं लागले कीं, महाराज ! आज लंकेवर महाविघ्न आलें आहे. प्रातःकालींच लक्षावधि मृत्तिकेचे घट नगरद्वारांत फुटले. कांहीं कारण नसतां रात्रीपासून कित्येक मंदिरें व गोपुरें खचून पडलीं. कित्येक बालकें आकाशांत भिकावून दिल्या-

प्रमाणें उडालीं व पडून प्राणास मुकलीं. कित्येक निद्रिस्त वीर दडपून मेले, अशीं अनेक विघ्नें होत आहेत आणि सर्वतोमुखीं असें आहे कीं, हें सर्व चोरून आणलेल्या सीतेच्या क्षोभानें घडत आहे; ह्मणून तिला नेऊन सोडून द्यावी, तरच लंकानगरी सुखानें नांदेल.

याप्रमाणें हेरांच्या मुखांतील भाषणें ऐकतांच रावणाला क्रोध आला व त्या हेरांचा धिःकार करून तो ह्मणाला—अरे ! यांच्या जिभा तोडून टाकारे ! कालगतीनें प्राप्त झालेलीं दुःश्चिन्हें पाहून त्यांला जानकीचा संबंध लावणारे लोक महामूर्ख आहेत. हीं भाषणें ऐकतांच मारुतीला राग आला व याला लटकीं वाटत असलेलीं दुश्चिन्हें प्रत्ययास आणून द्यावीं, असें मनांत आणून त्यानें त्या सभेचें कंदन करण्याचा निश्चय केला. इतक्यांत रावणाचा नापित येऊन रावणाची श्मश्रू करूं लागला; तों मारुतीनें त्याच्या कानांत पुच्छ घालतांच तो एकदम त्रिचकल्या-मुळें त्याचा हात चांचरला व रावणाची एका बाजूची सबंद मिशी झटकन उतरून गेली. त्यामुळें रावणाला फारच क्रोध आला आणि तो न्हाव्याला मार देऊं लागला; इतक्यांत मारुतीनें त्याच्या पाठींत एक जबर्दस्त मुष्टिप्रहार केला; डाव्या हाताच्या चापटीनें दाही छत्रें पाडलीं आणि उजव्या हातानें दाही शिरांवरील मुगूट उडवून दिले. छत्र मोडून त्याचा भव्य दंड रावणाच्या अपानद्वारांत घातला, तेव्हां तो दचकून मागें पाहूं लागला; पण त्या वेळेस मारुती त्याच दंडाच्यामागें लपला होता. रावणाची सभा चौदा गांवें होती व त्यांत जागोजागीं सुरेख सुगंधी तेलाचे चौदाहजार दिवे लावलेले होते. शिवाय सभेसमोर अठरालक्ष कर्पूरदीप हातांत घेऊन विशाळ देहधारी राक्षस उभे होते. तरी मारुतीनें पुच्छघातेंकरून सगळे दिवे एकदम विझविले; तेव्हां सर्व सभाजन घाबरून गेले. इतक्यांत त्या मुद्दाम केलेल्या अंधारांत तो

मारुती त्या सभाजनांला नागवूं लागला. प्रत्येकांचीं वस्त्रें, शस्त्रें व अलंकार तो हिरावून घेऊं लागला. त्यानें मुकुट काढून घेऊन मस्तकावर पुच्छाचा प्रहार करावा, बोटें मोडून अंगठ्या व माना मुरगळून कंठ्या काढून घ्याव्या. वक्षःस्थलावर आधीं मुष्टिप्रहार करून मग पदक काढून घ्यावें. कंबरेंत लाथ मारून वांकवावी आणि मग कटिसूत्र ओढून घ्यावें. त्यानें कित्येकांचीं वस्त्रें सोडून घेतलीं, कित्येकांचे हातपाय मोडिले आणि कित्येकांस तर त्या काळोखांत आपटून मारिलें. याप्रमाणें अनेकप्रकारें अनर्थ होत असतां 'रावण जिवंत आहे कीं मेला' या गोष्टीचाही कोणाला थांग लागेना. अंधारांत वारा सुटल्यामुळें दिवे लावतांच विझून जाऊं लागले. सभास्थलांतून कोणी बाहेर पळून जाऊं लागला, तर पुच्छाच्या तडाक्यानेंच त्याची मुरकुंडी वळावी. देवांतक, नरांतक, अतिकाय, इंद्रजीत, इत्यादि राजपुत्र आणि प्रहस्तादिक सर्व प्रधान या सर्वांची मारुतीनें त्या काळोखांत पूर्ण विटंबना केली. रावणही अगदीं भयभीत होऊन 'घरटीकारानें ( हेरानें ) सांगितलेलें सर्व वर्तमान खरें आहे.' असें ह्मणूं लागला. इतक्यांत मारुतीनें रावणाच्या कानांत सांगितलें कीं, मी रामाचा दूत आहें. तुझ्या नगराला आणखीही त्रास देईन. तुझीं दाहीं शिरें तोडून किष्किंधेस नेलीं असतीं; परंतु मला त्या अयोध्याधीश रामप्रभूची आज्ञा नाहीं ह्मणून सोडतों. असें सांगून मारुती तेथून निघून जातांच भ्रांतचित्त झालेल्या रावणानें तेथें दिवे लावविले. तों अपार नाश झालेला आहे व कित्येक छिन्नविछिन्न होत्साते प्राणासही मुकले आहेत. अशी सर्वांची स्थिति पाहून रावणानें सर्वांस निरोप दिला आणि तो स्वतः राणिवशांत निघून गेला.

---

# अध्याय २० वा.

सर्व सभाजनांसह रावणाची विटंबना करून गेल्यावर मारुतीनें लंकेंतील प्रत्येक घरांत जाऊन सीतेचा शोध केला; परंतु त्याला कांहीं ठिकाण लागेना; शेवटीं त्रासला व रावणाच्या मंदिरांत आला. तों रावण एकटाच सर्वारिष्ट शमनार्थ हवन करीत बसलेला होता. मारुतीनें त्याला पाहिल्यावर ऐशींहजार स्त्रियांचीं मंदिरें सीतेसाठीं पाहिलीं आणि शेवटीं ज्या ठिकाणीं मंदोदरी निद्रिस्त झाली होती, त्या ठिकाणीं ह्मणजे रावणाच्या मुख्य मंदिरांत जाऊन तो उभा राहिला. ती मंदोदरी उत्तम रूपवती व महापतिव्रता होती. तिला पाहतांच मारुतीच्या मनांत आलें कीं, हीच जनकतनया असावी. त्याला संतोष वाटत आहे तों हवन पूर्ण करून रावणही तेथें आला; तेव्हां मंदोदरीनें सविनय उठून त्याचे पाय धुतले आणि त्याला मंचकावर नेऊन बसविलें. नंतर कांहीं वेळानें दोघेंही निद्रावश झालीं. हें पाहतांच मारुतीला फार राग आला आणि याच ठिकाणीं दोघांचाही जीव घ्यावा, किंवा दोघांला पलंगासह उचलून नेऊन रामाला दाखवावें, असें त्याच्या मनांत आलें. मारुतीनें रामाचें वचन आठविलें आणि मंदोदरीच्या तोंडाचा वास घेतला, तों त्याला अतिशय दुर्गंधि आली. तेव्हां राक्षसांच्या संगतीनें ही मद्यप्राशन करूं लागली, असें त्याच्या मनांत आलें. नंतर त्यानें भिंतीला कान लावून रामस्मरण होत आहे कीं काय हें पाहिलें; पण तेथें कशाचें नामस्मरण! शेवटीं दोघांच्याही डोक्यांत धोंडा घालण्याचा त्यानें निश्चय केला. इतक्यांत मंदोदरी घाबरून जागी झाली आणि आक्रोश करून वक्षःस्थल बडवून घेऊं लागली.

तेव्हां रावणही जागा झाला आणि तिचा हात धरून शोक करण्याचें कारण काय ? ह्मणून विचारूं लागला. तेव्हां ती शोक करीत असतां ह्मणाली–प्राणनाथ ! आधीं त्या सीतेला नेऊन रामाकडे पोंचवा. आतांच मी दुष्ट स्वप्न पाहिलें कीं, माझी गळेसरी जळून गेली. एका बलाढ्य वानरानें अशोकवनाचा विध्वंस केला. त्यानेंच अखयाचा वध केला आणि इंद्रजितालाही गांजलें. नंतर अद्भुत कपिसैन्यासह तो रामाला घेऊन आला. त्या रामानें सागरावर शिलासेतू बांधून कपिसेना लंकेवर आणली आणि इंद्रजित कुंभकर्णासह सर्वांचा वध करून सीतेला सोडविलें. त्याचप्रमाणें हें राज्य बिभीषणाला देऊन तो परतला ! तर मी आपणाला खरोखर सांगतें, हें स्वप्न नव्हे; पुढील अरिष्टाची सूचना आहे. यासाठीं ती सीता बरोबर घेऊन रामाला आपण शरण जावें किंवा मला तरी सांगावें, ह्मणजे मी आपल्या सौभाग्यासाठीं त्या जनकजा-माताला शरण जाईन आणि चुडेदान मागेन. याप्रमाणें मंदोदरीचें भाषण ऐकतांच रावणानें विचार केला कीं, हिला जर नाहीं ह्मणावें, तर बिभीषण, कुंभकर्ण, इंद्रजित इत्यादि सर्व हिचे आज्ञाधारक आहेत. भलत्यालाच सांगेल व सीतेला रामाकडे पाठवून देईल; तर तें कामाचें नाहीं. असें मनांत येतांच त्यानें तिला सांगितलें–प्रिये ! उदयीक मी जानकीला परत पाठवीन बरें. याप्रमाणें तिची समजूत करून अशोकवनाभोंवतीं पांचकोटी राक्षस रक्षणार्थ होते, त्यांस त्यानें गुप्त निरोप पाठविला आणि एक दूती बोलावून तिला आज्ञा केली कीं, अशोकवनांत जाऊन सीतेचा समाचार घेऊन ये. याप्रमाणें त्या दूतीला आज्ञा होतांच ती जेव्हां सीतेकडे निघाली, तेव्हां तो भक्तराज मारुती तिच्या पाठीमागून मंदोदरीचें वर्णन करीत निघून गेला.

अशोकवनांतील एका अशोकाच्याच वृक्षाखालीं सीतासती रामाचें ध्यान हृदयांत आठवीत बसली होती. तिला पाहतांच ती दूती परतली, पण मारुती आनंदित होत्साता त्याठिकाणीं राहिला. जगन्माता दृष्टीस पडल्यामुळें 'आज मी धन्य आहें' असें त्याला वाटूं लागलें, तो आपलें पुच्छ नाचवून, डोळे मोडून व मिटक्यांसह चक्राकार उड्या मारून आपला आनंद प्रदर्शित करूं लागला. नंतर त्यानें आसमंताद्भागीं लक्ष्य पुरविलें तों सर्व वृक्ष आणि पाषाण रामस्मरणांत निमग्न आहेत. मृगमदाहूनही विशेष सुवास अशोकवनाच्या आसपास सुटलेला त्यानें अनुभविलाच होता. सीतेजवळ त्रिजटा नामक राक्षसी होती, तीही सत्संगामुळें शुद्ध होऊन रामाचें ध्यान करीत बसली होती. मारुतीनें हळूच तिच्याजवळ जाऊन प्रेमभावानें साष्टांग नमस्कार केला व रामानें खूण ह्मणून जी मुद्रिका दिली होती, ती तिच्यापुढें ठेविली. नंतर पुनः नमस्कार करून तो अशोकवृक्षावर जाऊन बसला.

सीता रामाचें ध्यान धरून बसली होती. त्या दिवशीं आपल्या प्रियकराचा प्रत्येक अवयव ज्ञानदृष्टीनें पहावा, असें मनांत आणून ती जों पाहूं लागली, तों करांगुलींतील अवतारमुद्रिका तिला दिसेना; ह्मणून तिनें डोळे उघडले तों तीच मुद्रिका पुढें पडलेली आहे. मुद्रिका पाहतांच जानकीला फार वाईट वाटलें आणि तिला पोटाशीं धरून तिनें शोकाला आरंभ केला. सखे! तूं रामाला सोडून इकडे कशी आलीस? असे तिनें अनेक प्रश्न त्या मुद्रिकेला केले; पण ती काय बोलणार! जेव्हां ती सीता अपार शोक करूं लागली, तेव्हां तिच्या सभोंवती रक्षण करीत असलेल्या राक्षसी 'कां गे रडतेस'? ह्मणून तोंडें पसरून तिच्या अंगावर धांवत आल्या, तेव्हां मारुतीला

थांचा राग आला आणि त्यानें आपलें पुच्छ सोडून त्या सर्व राक्षसी ोडून पळविल्या. कित्येकींचे प्राण घेतले आणि कित्येकींचे ळे आंवळले. त्यांत मार खातां खातां ज्या सीतेला शरण गेल्या, या मात्र जगल्या आणि कित्येक तर त्या असह्य माराच्या भयानें ावणाला सांगण्यासाठीं निघून गेल्या. नंतर पुनः त्या मुद्रिकेला आलिंगून सीता शोक करीत असतां ह्मणाली—सखे मुद्रिके! ामच्या उभयतांच्या आलिंगनसमयीं कंठांतील हारामुळेंही आह्मांला वेयोग वाटत असे आणि आतां तर समुद्र, नद्या आणि पर्वत ामच्या आड आहेत; ते सहन करून माझ्या प्रियकरानें अजून ीव ठेवला आहे का? वाल्मिकानें जें भाष्य केलें होतें तें सर्व व्यर्थ गेलें ाटतें. प्राणनाथ! ही मुद्रिका आपण कोणत्या विचारानें पुढें पाठविली ाहे हें कांहीं कळत नाहीं. खरोखर लक्ष्मण भावोजी पूर्ण साधु, त्यांचा ो छळ केला ह्मणून राक्षसांच्या हातीं सांपडलें आणि वियोगदुःख अनु- वीत बसलें. याप्रमाणें अनेक प्रकारें विलाप करून ती सीता जेव्हां ारच विव्हल झाली, तेव्हां वृक्षगर्भीं बसलेला मारुती मनोहर रामलीला ायन करूं लागला. तो साक्षात् रुद्रावतार रुद्रविण्याप्रमाणें मधुर ठानें रामलीला वर्णन करूं लागतांच रविमंडळ तटस्थ झालें. पाताळ ोडून भोगींद्र वर येण्याची इच्छा करूं लागला. वायु स्थिर झाला ाणि अशोकवनांतील पक्षी चारा घेण्यास विसरले. सीता तर तन्मय ोऊन देहभान सोडून एकाग्रचित्तानें ऐकूं लागली. मारुतीनें रामचरि- ाला सीतास्वयंवरापासून आरंभ केला होता, तो वालीवधापर्यंत गायन रून थांबला आणि शेवटीं जेव्हां त्या रामाचा दासानुदास एक वानर तनयेच्या शोधार्थ अशोकवनापर्यंत आला आहे, अशा भावार्थाचें एक

पद्य गाऊं लागला, तेव्हां सीता त्या वृक्षाखालीं उभी राहिली व त्या पादपाला नमन करून ह्मणाली–हे तरुवरा! तुझ्या गर्भी बसून जो कोणी रामचरित्र वर्णन करीत आहे, त्याचें मुखारविंद पाहण्याची मला इच्छा उत्पन्न झाली आहे. त्या गायकाचें सदा कल्याण असो व त्याला कोणतेंहि विघ्न न बाधो. याप्रमाणें ती जगन्माता भाषण करूं लागतांच हनुमंत स्तब्ध झाला. तेव्हां हें कांहीं कपट तर नसेल ? असें मनांत आणून जानकी ह्मणाली–हे गायका ! जर तूं असा स्तब्धपणा अंगीकारशील, तर ही सीता एका निमेषांत निर्जीव झालेली अवलोकन करशील. असें बोलून त्या अतिकृश झालेल्या जनकात्मजेनें रामकरांगुलींतील मुद्रिका आपल्या मनगटांत घातली आणि वेणीदंड सोडून प्राण देण्यास सिद्ध झाली. तेव्हां घाबरून मारुतीनें आकाशांत उड्डाण केलें आणि हे माते ! रामप्रभु तुला मुक्त करण्यासाठीं समुद्राच्या पैलतीरीं आला आहे; असा शब्द केला. तेव्हां जानकी आकाशाकडे पाहूं लागली; इतक्यांत मारुती आकाशांतून खालीं आला आणि दंडप्राय सीतेच्या चरणीं लीन झाला. सीतेनें त्यास पाहतांच चंद्रार्क आहेत तोंपर्यंत तुझें कल्याण असो; असा आशिर्वाद दिला. तेव्हां तो हात जोडून तिच्या पुढें उभा राहिला आणि ह्मणाला–माते ! कल्याणरूपप्रभु रामचंद्र किष्किंधेस सुखी आहेत. मी त्यांचा दासानुदास तुला शोधीत येथपर्यंत आलों आणि दोन दिवसांत सगळें लंकानगर शोधलें. याप्रमाणें त्याचें भाषण ऐकतांच फार दिवस अंतरलेला पुत्र भेटल्यामुळें जसा मातेला आनंद होतो, तसा सीतेला आनंद झाला. नंतर पंचवटीपासून किष्किंधेपर्यंत प्रभूनें जी लीला केली, ती मारुतीनें सविस्तर सीतेला सांगितली व शेवटीं ह्मणाला–माते ! तूं वस्त्रांत बांधून जे अलंकार आमच्या अंगावर टाकले होतेस, ते आह्मीं

श्रीरामचंद्राला दाखवितांच तो तुझे गुण आठवून फारच विलाप करूं लागला. त्याचप्रमाणें लक्ष्मण चुकलेल्या वत्साप्रमाणें रात्रंदिवस तुझ्या दर्शनाची आशा बाळगून आहे. असें ऐकतांच सीता त्याला ह्मणाली– मारुती! तूं जर त्यांचा विश्वासू सेवक आहेस, तर त्यांनीं तुला अंतरखूण कोणती सांगितली आहे बरें? तो ह्मणाला–माते! तुह्मीं तिघें ज्या वेळीं वनांत निघालां, त्या वेळीं त्या मखपालकानें आपल्या हातानें तुला वल्कलें नेसविलीं! ही तुझी अंतरखूण तूं ओळख. असें ऐकतांच सीता ह्मणाली–बाळा! तूं त्यांचा पूर्ण विश्वासू आहेस, अशी माझी पूर्ण खात्री झाली. तरी मला अशी चिंता पडली आहे कीं, तूं लहानसा प्लवंगम दिसतोस, असेंच जर तुमचें सगळें सैन्य असेल, तर या लंकानगरींतील प्रचंड राक्षस तुह्मांला कसे आटपतील? असें ऐकतांच मारुतीनें मंदराचळाहून भव्य असें आपलें भीमरूप प्रगट केलें. त्याला पाहतांच हा केवळ ईश्वर रामकार्यासाठीं अवतरला आहे, असें सीतेच्या मनांत आलें. इतक्यांत मारुती ह्मणाला–मातोश्री! तुझ्या कृपेनें मी हें लंकानगर समुद्रांत पालथें घालीन; पण प्रभूची आज्ञा नाहीं ह्मणून संकोच वाटतो. हे मंगळभगिनी माते! माझ्याहून शतपट बलाढ्य वानर किष्किंधेस रामाजवळ आहेत. नल, नील, जांबुवंत, सुग्रीव, अंगद, इत्यादि रणपंडित काळालाही शिक्षा करणारे आहेत. असें ऐकतांच सीतेला अत्यानंद झाला. नंतर तिनें मारुतीला विचारिलें– तूं एवढा सागर तरून कसा आलास? मारुती ह्मणाला–प्रभूच्या मुद्रिकेनें मला सहज तारलें आणि तुझ्या दर्शनानें मार्गश्रमही हरले. आतां येथें आल्यावर हीं फळें पाहतांच मला फार क्षुधा लागली आहे; दुसऱ्या कोणाच्याही हातचीं फळें मी खात नाहीं; यासाठीं कृपाकरून मला या

वनांतील फळें भक्षण करण्याची आज्ञा कर. असें ऐकतांच सीता ह्मणाली—बाळा ! या वनाला वायु सुद्धां स्पर्श करण्यास भीत असतो. साठ हजार प्रचंड राक्षस या वनाच्या संरक्षणासाठीं रावणानें ठेविले आहेत. असें ऐकतांच मारुती भूक लागली ह्मणून डोळे पांढरे करून गडबड लोळूं लागला. तेव्हां सीतेला त्याची दया आली व स्वहस्तानें त्याचें वदन कुर्वाळून ती त्याला ह्मणाली—बाळा कपींद्रा ! ऊठ ऊठ; वृक्षाखालीं जीं फळें पडलेलीं असतील तीं घेऊन भक्षण कर. जर वृक्षावर चढशील तर तुला माझ्या गळ्याची शपथ आहे. असें ऐकतांच मारुती, तुझी आज्ञा प्रमाण ! असें ह्मणून तिला वंदन करून फळें भक्षण करण्यासाठीं उठला.

नंतर ज्या वृक्षांची सीतेवर छाया होती व जे रामस्मरण करीत होते, त्यांना रामउपासक जाणून मारुतीनें वंदन केलें आणि जे रामस्मरण करीत नव्हते असे कित्येक उपटून जमिनीवर झोडले आणि फळें गोळा करून तीं रामस्मरणपूर्वक पुढें घेऊन चपल हनुवटी हालवीत फराळ करीत बसला. त्यावेळेस सर्व राक्षस मद्यप्राशन करून धुंद होऊन बसले होते आणि पुच्छ मारुतीला पाहुणचार करीत होतें; त्याला मारुती ह्मणाला—गोड फळें घेऊन ये; तूं आह्मांला आज पाहुणचार करीत आहेस, त्यामुळें आज आह्मीं पूर्ण तृप्त होणार.

नंदनवनाहूनही अति सुंदर जें अशोकवन त्यांतील केळी, नारळी, फणस, डाळिंबी, चकोत्री इत्यादि वृक्ष झोडून तो फळें खाऊं लागला. विजेच्या कडकडाटाप्रमाणें लक्षावधि वृक्ष कडाकड मोडूं लागले. सीतेनें आपली शपथ घातली होती ह्मणून तो वृक्षावर चढत मात्र नव्हता; परंतु त्या वृक्षांचा कडकडाट ऐकतांच राक्षस शुद्धीवर आले आणि आपापलीं शस्त्रें सांवरून जसे वृषभ महाव्याघ्राला कोंडतात, तसे मारु-

तीच्या समोंवती जमून त्याला मध्यभागीं घेरून उभे राहिले. नंतर जेव्हां ते मारुतीवर चाल करूं लागले, तेव्हां मारुतीनें एक झाड उपटलें आणि त्या राक्षसांना झोडलें, इतकेंच नव्हे तर साठहजार राक्षसांचा पुच्छानें एकच भारा बांधून गरगर फिरविला आणि भूमीवर आपटून समुद्रांत फेंकून दिला. नंतर भुभुःकार करून गर्जना करीत पुनः फळें झोडून फराळ करीत बसला.

रावण सभेंत बसला होता, तों मारुतीच्या सपाट्यांतून जिवंत राहिलेले घायाळ येऊन सांगूं लागले—महाराज! अशोकवनांत एक वानर प्रगट झाला आहे, त्यानें वनाचा पूर्ण विध्वंस करून सर्व वनरक्षकांचा संहार केला. असें ऐकतांच रावण फार विषाद पावला आणि ऐशींहजार राक्षसांस बोलावून त्यांला त्यानें आज्ञा केली कीं, त्या माकडाला धरून आणा. जर तो तुह्मांला आटपला नाहीं, तर मला तोंड दाखवूं नका. असें ऐकतांच ते भयंकर गर्जना करीत अशोकवनाजवळ आले. त्यांना पाहतांच मारुतीनें मेरुपर्वताप्रमाणें विशाळरूप धरलें आणि लंकेच्या महाद्वाराची लोहार्गळा घेऊन भुभुःकार करीत तो त्या सर्वांवर घसरला. जसे वृक्षावरील पक्षी सायंकाळीं आकाशांत उडतात तशीं राक्षसांचीं मस्तकें तटातट तुटून आकाशांत उडूं लागलीं आणि मारुती जेव्हां राक्षसांच्या प्रेतांचे भारे बांधून समुद्रांत फेंकून देऊं लागला, तेव्हां त्या सैन्यांत जंबूमाळी मुख्य होता, तो भयंकर गर्जना करून हातांत शूळ घेऊन मारुतीवर धांवला. पण मारुतीनें त्याला एकच लाथ देऊन त्याचा कोथळा फोडला आणि त्याचें प्रेत जलचरांला तृप्त करण्यासाठीं सागरांत फेंकून दिलें.

दुःशकुनांनीं दुश्चित झालेल्या रावणाला घायाळांनीं जेव्हां जंबूमाळी

निमाल्याची बातमी सांगितली, तेव्हां मल्ल, प्रतिमल्ल, चंड, प्रचंड आणि जघन, या पांच सेनापतींच्या ताब्यांत एक लक्ष राक्षसवीर देऊन त्यांना मारुतीवर पाठविलें. मारुती अशोकवनांत सहज लीलेनें हातांतील लोहार्गळा झेलीत त्यांची वाट पाहतच बसला होता. राक्षससैन्य येतांच त्यानें आपल्या पुच्छाचें उखळ व त्या लोहार्गळेचें मुसळ करून त्या राक्षसांस साळी कल्पून कांडण्याचा आरंभ केला. राक्षसांचे स्थूलदेह अचेतन पडत, तोच साळींचा कोंडा झडपल्यामुळें कपिहस्तें करून ते सूक्ष्म तांदूळ होत व उद्धरून जात. मारुतीनें पर्वतासारखा विशाळ देह धरला होता, त्याला ते राक्षस मारींत असतां अकस्मात् एक सहस्रस्तंभी देवालय दिसलें, ती देवी रावणानें स्थापना केलेली होती व तो नित्य तिला ब्राह्मणाचा बळी देत असे. मारुतीनें तें देवालय पांयासह उपटून आकाशांत फेंकून दिलें. नंतर रेणुकेच्या कैवारास्तव परशुधरानें जशीं क्षत्रियांचीं शिरें तोडलीं, तसा तो अंजनीनंदन सीतेच्या कैवारास्तव राक्षसशिरांचा चूर उडवूं लागला. त्यानें त्या पांच सेनापतींसह लक्षराक्षसांचा संहार करून सर्वांचे भारे बांधून समुद्रांत फेंकून दिल्याची बातमी कळतांच रावणानें आणखी आपले सात पुत्र सैन्यासह पाठविले, पण मारुतीनें त्यांचाही चुराडा उडविला. तेव्हां रावणानें अखयानामक आपल्या पराक्रमी पुत्राला सैन्यासह पाठविलें. मारुती स्वस्थ चित्तानें पहात होता, तों असंख्यात बाणांचा वर्षाव करीत अखया पुढें आला. तेव्हां मारुतीनें त्याला सांगितलें—रावणानें तुझें नांव अखया ठेविलें आहे, पण मी तुझा या लोहर्गळेनें क्षय करणार. असें बोलून त्यानें त्या अखयावर हातांतील लोहदंडाचा एकच टोला मारून त्याचा शेवट केला. हें वर्तमान ऐकतांच रावण शोकाकुलित झाला आणि त्यानें एका असाळी-

नामक प्रचंड राक्षसी मारुतीवर पाठविली. तिनें भयंकर तोंड पसरून येतांच मारुतीला उचलून गिळलें! हें वर्तमान दूतांनीं धांवत जाऊन रावणाला कळवितांच क्षणभर तो आनंदित झाला होता; पण इतक्यांत दुसरे दूत धांवत आले व आसाळीचें पोट फोडून हनुमंतानें तिचा शेवट केला, असें सांगूं लागले. त्या वेळेस रावण हें महाविघ्न एकाएकीं कोठून आलें? म्हणून चिंतातुर होऊन बसला.

---



# अध्याय २१ वा.

आसाळीराक्षसीचा अंत झाला, असें एकतांच चिंतातुर झालेल्या रावणानें इंद्रजिताला आज्ञा केली; इतक्यांत एक नग्न कुमारी पाठीशीं शिंकली, तेव्हां रावणानें ब्रह्मदेवाला शकून विचारला. ब्रह्मदेव ह्मणाले— दोघांतून एकाला अपेश येईल. असें ऐकतांच रावण त्याजकडे क्रोधानें पाहूं लागला तेव्हां ब्रह्मदेवानें सांगितलें कीं, वानर हस्तगत होईल. असें ऐकतांच चतुरंग दळ बरोबर घेऊन इंद्रजीत अशोकवनांत जाण्यासाठीं निघाला. त्या वेळेस त्याच्याबरोबर शांयशीं अयुतें हत्ती होते आणि रथ व घोडेस्वार यांची तर गणतीच नव्हती. तो युद्धचमत्कार पाहण्यासाठीं देव विमानांत बसून आले.

मारुती पाठमोरा बसून कौतुकानें फळें झेलीत होता. राक्षससेना जरी गर्जना करीत त्याच्या पाठीशीं येऊन उभी राहिली, तरी तो तिकडे पाहीनाही. राक्षस जेव्हां त्याजवर शस्त्रवर्षाव करूं लागले, तेव्हां त्यानें घडोघडी आपली पाठ कुरवाळावी आणि त्या सर्वांना वाकोल्या दाखवाव्या. शेवटीं जेव्हां इंद्रजीत त्याजवर असंख्य बाणांची वृष्टि करूं लागला; तेव्हां मारुतीनें त्याचे सर्व बाण झेलून मुठींत सांठविले आणि शेवटीं पुच्छ सोडून इंद्रजिताच्या हातांतील धनुष्य हिसकावून घेतलें. नंतर तेंच चाप आकर्ण ओढून तो अचुक शर सोडूं लागला, त्यामुळें कोट्यावधि राक्षसांचीं शिरें उडालीं आणि इंद्रजिताचा मुगुट शेवटीं पडला, तों मारुतीच्या जवळचे जमविलेले बाण संपले. तेव्हां त्यानें चाप टाकून लोहार्गळा हातांत घेतली आणि इंद्रजिताजवळ धांवत जाऊन पहिल्यानें त्याच्या रथाचा चुराडा उडविला. नंतर त्यास विरथ करून लोहार्गळेचे असे तडाके दिले कीं, त्यामुळें तो घाबरला. शेवटीं त्या इंद्रजितानें

मारुतीवर पाश टाकला. पण मारुती मोहरीप्रमाणें लहान होऊन त्यांतून उडून गेला. तेव्हां पुनः त्यानें लहान पाश करून त्यावर टाकला; त्या वेळीं मारुतीनें पर्वतासारखें रूप धरून त्या पाशाचे तुकडे उडविले. इंद्रजितानें अनेक शस्त्रास्त्रें मारुतीवर टाकलीं; पण त्यांची कांहीं दाद लागेना. शेवटीं मारुती स्वतःच इंद्रजिताच्या अंगावर लोटला आणि त्याजबरोबर मल्लयुद्धाला झटला. त्यानें इंद्रजिताला पाडलें, नग्न केलें आणि त्याचे पाय धरून गरागर फिरविलें व आकाशांत उडविलें. नंतर त्यानें बरोबर आणलेल्या सर्व सैन्याचा संहार केला. इतक्यांत इंद्रजित उडाला होता तो भूमीवर आपटला व कांहीं वेळानें शुद्धिवर येऊन ह्मणूं लागला—जो निराहार असेल, त्याच्या हातून माझा मृत्यु. असें असतां हा वानर फळें भक्षण करून माझा संहार करतो हें काय ? किंवा जानकी सुटेपर्यंत हाच मला बंदींत टाकणार ? कांहीं कळत नाहीं. रावणालाही एका वानरानें धरून नेऊन पांच पाट काढून बंदींत ठेविलें होतें. इत्यादि अनेक प्रकारें बोलत बडबडत तो नागवा होता तसाच पळाला आणि ज्वळच एक विवर होतें, त्यांत जाऊन दडाला, पण मारुतीनें त्याला पाहिलें होतें. तो विवरांत शिरतांच त्याच्या तोंडावर यानें एक पर्वत ठेवला आणि त्याला कोंडून स्वतः राखण करीत बसला.

सर्व सैनिकांस मारून इंद्रजिताला विवरांत कोंडलें, असें वर्तमान ऐकतांच परम चिंताक्रांत झालेला रावण ब्रह्मदेवास ह्मणाला—आपण तो मर्कट हस्तगत होईल असें बोलला होतां; तर आतां कृपा करून स्वतःच जावें आणि त्या वानराला धरून आणावें. आपणाशिवाय कोणालाही तो आटपणार नाहीं. या वेळेस मी आपल्याजवळ पुत्रदान मागतों. असें ऐकतांच ब्रह्मदेव स्वतः अशोकवनांत आले, तों इंद्रजीत भयानें

ञाला आहे व मारुती त्याला रात्रीत बसला आहे. ब्रह्मदेवानें तेथें .चतांच मारुतीकडून विवरद्वारावरील पर्वत दूर करविला आणि इंद्र-ज्ताला बाहेर बोलाविलें. तेव्हां तो ह्मणाला—त्या कपीला धरल्या-ावाय मी बाहेर येणार नाहीं. ब्रह्मदेव त्याला ह्मणाला—तूं बाहेर ये ाणि ब्रह्मपाश टाकून त्याला बांध. इंद्रजितानें सांगितलें—तो मर्कट ब्रपाशाला जुमानीत नाहीं. असें ऐकतांच ब्रह्मदेवानें त्याला सांगि-लें—तुह्मीं अपवित्र राक्षस, ह्मणून तुमच्या हातानें शस्त्रें चालत नाहींत. ।प्रमाणें इंद्रजिताची निर्भर्त्सना करून ब्रह्मदेवानें पवनात्मजाची स्तुति रीत असतां त्याला सांगितलें—तूं वज्रदेही आहेस; तुला काळाचेंहि य नाहीं हें खरें आहे; तरी यावेळेस माझ्या वचनासाठीं या ब्रह्मपाशांत ांपडून सभेपर्यंत निमूटपणें चल आणि तेथें गेल्यावर तुला पाहिजे ितका पराक्रम दाखीव. असें बोलून जेव्हां ब्रह्मदेवानें पाश टाकला, व्हां मारुती त्यांत सांपडला. तेव्हां इंद्रजीत विवरांतून बाहेर धांवत ाला व मारुतीला आपल्या हातानें घट्ट बांधूं लागला. तें पाहतांच दुस-ी कित्येक राक्षस धांवले आणि कोणी गवताच्या वेठानें व कोणी ाडांच्या सालीनें त्या सदामुक्त रामदासाला बद्ध करूं लागले. नंतर ब्रदेव आणि इंद्रजित यांनीं धरून मारुतीला रावणाच्या सभेंत ाणलें. मार्गानें कित्येक राक्षस मारुतीवर शस्त्रप्रहार करीत; पण बि-ारीं शस्त्रें त्या वज्रासारख्या देहावर पडल्यामुळें भंग पावत असत.

मारुती दृष्टीस पडतांच रावण करकरां दांत चावूं लागला. इतक्यांत ुमंत सर्व बंधनें तोडून मोकळा झाला व रावणाहून एक हात उंच च्छासन करून त्यावर बसला. तेव्हां प्रहस्त प्रधान त्याला विचारूं ागला—तूं कोणाचा दूत आहेस ? मारुती त्या प्रश्नाचें उत्तर न देतां

इकडे तिकडे पाहूं लागला; तेव्हां रावणानें त्याला विचारिलें—तूं कोणाचा कोण आहेस रे माकडा ? असें ऐकतांच तो जनकजाशोकहरण रामदूत ह्मणाला—अरे मशका, रजनीवरा ! ज्यानें सीतास्वयंवरांत तुझ्या उरावर पडलेलें भव्य भर्गचाप मोडून टाकून तुला जीवदान दिलें त्याचा मी दूत आहें. ज्यानें शूर्पणखेची विटंबना करून त्रिशिरा, खर, दूषणादिकांस देहांत प्रायश्चित्त दिलें, त्याचा मी सेवक; तुला शिक्षा करण्यासाठीं आलों आहें. जसा एखाद्या अन्नसदनांत श्वान शिरतो तसा तूं रामाश्रमांत शिरलास व जानकीला चोरून आणलेंस; परंतु त्या रामपंचाननाची वस्तु तुला जंबुकाला पचणार नाहीं. तुझ्या अखयाचा क्षय करून मीच अशोकवनाचा विध्वंस केला आणि इंद्रजिताला कोंडून ठेवलें. आतां राक्षसकुलकाननदहनराम तुझा संहार करण्यासाठीं येत आहे. तो विषकंठवंद्य दाशरथी तुझे दशकंठ तोडून दशदिशांस बळी देईल आणि जानकीला घेऊन जाईल.

याप्रमाणें हनुमंताचें भाषण ऐकतांच रावण परम क्रोधायमान झाला आणि या मशकाचें पुच्छ, नासिक व कर्ण छेदन करून टाका अशी राक्षसांस आज्ञा करूं लागला; तेव्हां असंख्य राक्षस उठले व मारुतीच्या पुच्छावर शस्त्रप्रहार करूं लागले; परंतु एकही शस्त्र धड राहीना. सर्व मोडलीं आणि महाबलाढ्य राक्षस थकून धापा देऊं लागले, तेव्हां रावणही मनांत चरकला आणि त्यानें विचार केला कीं, हा रामउपासक सत्यवचनी आहे. याला याचा मृत्यु विचारून जटायूप्रमाणें मारून टाकावें. असें मनांत येतांच तो मारुतीला ह्मणाला—तुला रामाची शपथ आहे, तुझा मृत्यू कोणत्या ठिकाणीं आहे तें सांग. मारुती ह्मणाला—मला मृत्यूच नाहीं, असें ऐकतांच रावण हंसून ह्मणाला—अरे ब्रह्मदेव

जगत्कर्ता, पण त्यालाही मरण आहे. मग तूंच अमर कसा झालास? असें ऐकतांच मारुती त्याला फसविण्यासाठीं पुनः ह्मणाला—जर तूं माझें हें पुच्छ पेटविशील तर क्षणांत सर्व भस्म होईल. याला तेलानें भिजविलेलीं वस्त्रें गुंडाळून पेटवा ह्मणजे एकाक्षणांत सगळें भस्म होईल. हें बोलणें रावणाला खरें वाटलें आणि तो पुच्छाला वस्त्रें गुंडाळून वर तेल ओतवूं लागला. तेव्हां मारुती ह्मणाला—जर पुच्छ किंचित् उघडें राहिलें, तर मला मरण येणार नाहीं. संभाळा बरें! किंचितही उघडें ठेवूं नका. राक्षस पुच्छाला वस्त्रें गुंडाळतांना दमले आणि जुन्या व नव्याही वस्त्रांच्या राशी खपल्या, तरी पुच्छ झांकेना. शेवटीं नगरवासी नग्न केले आणि प्रत्येकाच्या घरांतील दशीसुद्धां शोधून आणून गुंडाळली; तरी पुच्छ उघडेंच! तें किती लांब आहे याचाही राक्षसांला अंत लागेना. राणीवसा नग्न केला तरी पुच्छ उघडेंच. सर्व लोक नागवे फिरूं लागले आणि वस्त्रें, तेल व तूप सगळें सरलें, तरीही पुच्छ उघडेंच. शेवटीं राक्षसांनीं रावणाला हें वर्तमान कळविलें. कित्येक राक्षसांनीं गळ्यांतील यज्ञोपवीतें काढूनही त्या शेपटाला गुंडाळलीं. वृद्ध वृद्ध राक्षस शेवटीं ही लंका जळणार असें भविष्य करूं लागले.

जेव्हां पुच्छ एक हात उघडें आहे व वस्त्रें तर सर्व संपलीं, असें सर्वांनीं रावणाला सांगितलें; तेव्हां रावण ह्मणाला—आतां अशोकवनांत जा आणि सीतेजवळ जीं वस्त्रें असतील तीं घेऊन या. असें ऐकतांच मारुतीनें आपलें पुच्छ आवरलें; नंतर राक्षस चुडी पेटवून त्या प्रचंड पुच्छवर्तिकेला पेटवूं लागले; पण कांहीं केल्या अग्नि त्याला स्पर्श करीना. तेव्हां रावणानें पुनः त्याला विचारिलें कीं, तुझें पुच्छ पेटत कां नाहीं? मारुती ह्मणाला—तुझ्या दारांत पुच्छयज्ञ होत असतां तूं चमकलाच;

म्हणून माझ्या पुच्छाला अनल स्पर्श करीत नाहीं. तूं स्वतः जर येऊन फुंकशील तर पेटेल. हें बोलणें रावणानें जरा भयानेंच मान्य केलें आणि तो हनुमंताच्या पुच्छाजवळ जाऊन फुंकूं लागला. तेव्हां मारुतीनें पिता व बंधु एकदम धांवावे म्हणून अनल व अनिलाची स्तुति करितांच तें पुच्छ एकदम भडकलें व रावणाच्या दाही मुखांवरील दाढ्या व मिशा जळून गेल्या. रावणानें फार पाप केलें होतें, म्हणून मारुतीनें त्याला पहिल्यानें प्रायश्चित्त दिलें. रावणाचें तोंड दग्धारण्याप्रमाणें दिसूं लागलें व तो मुखाला वस्त्र लावून जाग्यावर बसला. इतक्यांत पुच्छाग्नि प्रदीप्त झाला आणि मारुती गडबड लोळूं लागला, तेव्हां राक्षसांच्या मनाला आनंद झाला. रावणालाही आतां हा मरेल असें वाटलें, तो मारुती लोळत व चरफडत आपली मांडी थोपटून रावणाची दाढी धरायला गेला; पण रावणाला दाढीच नव्हती, त्यामुळें तो दचकला व मारुतीनें उपहासपूर्वक हास्य केलें. नंतर मला कोणी तरी सोडवा रे! असें म्हणत जेव्हां तो पुढें पुढें येऊं लागला, तेव्हां राक्षस पळूं लागले; परंतु मारुतीनें सर्वांस पुच्छानें आंवळून त्यांच्या दाढ्या व मिशा जाळून टाकल्या. तो आपलें पुच्छ गरागर फिरवूं लागला, त्यामुळें तें अधिकच पेटलें आणि भयंकर ज्वाळा उठूं लागल्या. तशांतच मारुतीनें कित्येक राक्षस धरून जाळले. जेव्हां ते सभा सोडून पळूं लागले, तेव्हां मारुती त्यांना धरून रावणाजवळ आणूं लागला व हे पळतात कां बरें? असें विचारूं लागला.

इकडे अशोकवनांत जानकीला राक्षसी सांगूं लागल्या कीं, तुझा वानर मरण पावला! हें वर्तमान ऐकतांच तिला फार वाईट वाटलें. तरी शेवटीं तिनें जठराग्नीला हनुमंताचा समाचार विचारला. तेव्हां

त्यानें तो क्षेम असल्याविषयीं साक्ष दिली आणि सीतेला सांगितलें कीं, आज मी त्याच्यासाठीं ही नगरी भस्म करीन.

रावणाच्या सभेंत मारुतीच्या पुच्छाला अग्नि लावून राक्षस त्याजवर शस्त्रवर्षाव करीत होते, तों मारुतीनें मेल्याचें सोंग केलें व हात पाय न हालवितां स्वस्थ पडून राहिला. तेव्हां कित्येक राक्षस त्याच्याजवळ गेले आणि प्रत्येक आपली बढाई दाखविण्यासाठीं मी वर्म पाहून घाव घातला असें रावणाला सांगूं लागला. मारुती दोन घटका निश्चेष्ट पडला होता. त्यानें तोंडाला फेंसही आणला. तेव्हां सर्व राक्षस त्याच्या सभोंवती जमले, वैद्य नाडी पाहूं लागले आणि पुरुषार्थ करून शेवटीं मरण पावला असें म्हणूं लागले. इतक्यांत सर्व पहात असतां त्यानें उडी मारली व जळत असलेल्या पुच्छानेंच कित्येक राक्षस बांधून जाळूं लागला. तेव्हां मात्र सगळे राक्षस पळाले आणि एकटा रावण उरला. त्याला मारुती विचारूं लागला—आतां तुझें रक्षण कोण करील ? इतक्यांत इंद्रजितानें येऊन मारुतीला बांधलें आणि त्याला हातांत धरून धिंड काढल्याप्रमाणें गांवांतून फिरवूं लागला. पण मारुती टपून होता. जे निंदक होते त्यांचीं तोंडेंच तो जाळूं लागला. त्यामुळें सर्व नगरस्त्रिया आक्रोश करूं लागल्या. शेवटीं हनुमंतानें सर्व राक्षसांना सांगितलें—आतां घट्ट धरा मला; माझा प्राण जाण्याची वेळ आहे. असें ऐकतांच राक्षस त्याला घट्ट धरून राहिले; तों तो उडाला व एका घरावर जाऊन बसला. मग काय ! धडाधड घरें जळूं लागलीं. त्यानें गदगदां हंसावें, राक्षसांना वांकोल्या दाखवाव्या आणि दुसऱ्या घरावर उडी मारावी. याप्रमाणें त्यानें लंकादहनाला आरंभ करितांच त्याला अद्भुत प्रभंजन साह्य झाला. उंच उंच माड्या, गोपुरें व राणिव-

शाचीं मंदिरें दिवल्यांप्रमाणें पेटलीं. लोक दिशोदिशीं पळूं लागले. कित्येक आपापल्या संसाराच्या वस्तु बाहेर काढण्यासाठीं जळत्या घरांत शिरूं लागले. स्त्रिया आपल्या प्रिय बालकांसाठीं आगीला जुमानीनाशा झाल्या. ' कल्पांत अग्नीप्रमाणें ज्वाळा चालू झाल्या व धूम्रानें दशदिशा व्याप्त झाल्यामुळें कोणास कोणी दिसेना अशी स्थिति झाली.

मारुतीनें एक तृतीयांश लंका जाळून टाकली; पण तितकी स्वर्णमय झाली. नंतर आतां सीतेचें पादवंदन करून रामदर्शनासाठीं निघून जावें असें मनांत येतांच तो आपलें पुच्छ विझविण्यासाठीं सागरतटाकीं गेला. जेव्हां त्यानें समुद्रांत पुच्छ बुडविलें, तेव्हां जलचरें तप्त होऊन मरूं लागलीं. असें पाहून सरितापतीनें काकुळतीस येऊन त्याला तीरावर बसविलें आणि लाटांनीं त्याचें तें पुच्छ विझविलें. नंतर मारुतीनें आपल्या कपाळाचा स्वेद ( घाम ) पुसून टाकला, तो एका मगरीनें भक्षण केला व त्यापासून मकरध्वज उत्पन्न झाला. ती कथा पुढें समयविशेषीं कथन केली जाईल. पुच्छ पूर्ण विझविल्यावर मारुतीनें मागें पाहिलें तों असंभाव्य अग्नि पेटला आहे व लंकेचा होम चालला आहे. तो भयंकर प्रकार पाहतांच कदाचित् सीता जळत असेल असें त्याच्या मनांत आलें. पण रामस्मरणीं सावध असणाराला प्रळयाग्नीही पीडा देत नाहीं. अशा स्वतःच्या अनुभवावरून तो शांत झाला. इतक्यांत सीता सुखी आहे, असें स्वतः वायूनें त्याला कळविलें.

नंतर रामदर्शनासाठीं उत्कंठित झालेला तो मारुती ब्रह्मदेवाजवळ गेला आणि त्याला ह्मणाला—महाराज ! आतां मी रामदर्शनासाठीं निघालों आहें. तर इकडे घडलेल्या वृत्तांताबद्दल आपण एक पत्र लिहून मजपाशीं द्यावें. असें ऐकतांच ब्रह्मदेवानें आनंदित होऊन त्याला पत्र

लिहून दिलें. नंतर तो अशोकवनांत आला व सीतेला नमस्कार करून ह्मणाला—माते ! मी आतां रामदर्शनासाठीं निघालों. अल्पकाळांतच तुला सोडविण्यासाठीं त्याला लंकेंत घेऊन येतों. तरी मी तुला भेटलों होतों, हें खरें वाटण्याकरितां आपल्या हातची कांहीं खूण दे. असें ऐकतांच जानकीनें आपल्या वेणींतील दिव्यमणी काढून त्याच्या हातीं दिला. नंतर तो कांहींतरी अंतरखूण सांग; असें ह्मणूं लागला. तेव्हां जानकी सांगूं लागली—बाळा हनुमंता ! आह्मी चित्रकूट पर्वतावर राहिलों असतां एके दिवशीं सुमित्रात्मज फळें आणण्यासाठीं अरण्यांत गेला होता आणि आह्मीं उभयतां एकांतीं असतां मी प्राणनाथांच्या अंकावर शिर ठेवून निजलें होतें. त्या वेळीं परमसुवासिक मलयानिल गाळून प्राणनाथांनीं आपल्या हातानें माझ्या भाळीं तिलक रेखिला होता; ही खूण तें व मी या दोघांसच ठाऊक आहे. याप्रमाणें अंतरखूण ऐकतांच मारुतीला अत्यानंद झाला. नंतर सीता ह्मणाली—बाळा अंजनीतनया ! हा एवढा शतयोजन सागर उतरून तुह्मी सर्व इकडे कसेरे याल ? मारुती ह्मणाला—माते ! तूं चिंता कां करितेस ? प्रभु रामचंद्र बाणांचा सेतु बांधील, अथवा त्याचा बाण वडवानल होऊन सागराला शुष्क करील. तो रघुवीर आपल्या सत्तेनें काय न करील ? सर्व कांहीं करण्याची त्याला शक्ति आहे. त्याचप्रमाणें या वेळेस मीही तुला घेऊन श्रीरामदर्शनासाठीं गेलों असतों; परंतु रामानें तुझा शोध आणण्याचीच मला आज्ञा केली आहे. यावरून तुला ( जगन्मातेला ) सर्व भविष्यार्थ कळण्यासारखा आहे. तर आतां माझ्या मस्तकीं कृपाकर ठेवून मला रामदर्शनासाठीं जाण्याची आज्ञा दे. याप्रमाणें भाषण करून सीतेची आज्ञा मिळतांच " जय यशस्वी रघुवीर ! असें

म्हणून आकाशपंथें उडाला. त्या वेळेस जो त्यानें भुभुःकार केला, तो ऐलतीरीं उभे राहिलेल्या वानरांनीं ऐकला. मारुती लंकानगरांतून जो उडाला तो आकाशांत दोन योजनें वर गेला. त्यावेळेस समुद्रोदक उचंबळलें व समुद्रालाही भय वाटलें; पण इतक्यांत मारुती ऐलतीरीं येऊन उभा राहिला.

जांबुवंत, नल, नील, आदिकरून सर्वांनीं मारुतीला पाहतांच आलिंगन दिलें आणि कित्येकांनीं पुष्पें आणून हनुमंताची पूजा केली. नंतर त्याच्या अंगावरील मळाकडे पाहून सर्व वानर त्याला " लंकेंत काय पराक्रम केलास ? असें विचारूं लागले; परंतु कांहीं एक उत्तर न देतां तो ब्रह्मदेवाचें पत्र त्यांला दाखवूं लागला. त्यावर विरंचीच्या हातची राममुद्रा असल्यामुळें न उघडतां त्यांनीं मस्तकीं वंदन करून परत हनुमंताजवळ दिलें. नंतर हनुमंतासह सर्व वानर किष्किंधेस आले आणि येतांच त्यांनीं सुग्रीवाच्या मधुवनाचा विध्वंस केला. हें वर्तमान सुग्रीव राम यांस कळतांच, त्यांनीं मारुती विजयी होऊन आला; हें तर्कावरून जाणलें. इतक्यांत सर्वांसह मारुतीनें तेथून उड्डाण केलें.

श्रीराम, सौमित्र आणि सुग्रीव हे तिघे सर्व वानरांच्या मध्यभागीं मारुतीचें विजयवृत्त श्रवण करण्याच्या उत्कंठेनें बसले होते. इतक्यांत महानिधान साधून येणाऱ्या साधकाप्रमाणें विजयसूचक दक्षिणबाहु उभारून सपक्षपर्वताप्रमाणें सर्व वानरांसह मारुती आकाशांतून खालीं उतरला. त्यास पाहतांच अयोध्यापति आणि किष्किंधापति आपापलीं आसनें सोडून पुढें झाले, तों मारुतीही लोटांगण घालीत रामचरणांजवळ आला; इतक्यांत दयाळु रामचंद्रानें त्याला उठवून स्नेहानें हृदयाजवळ धरिलें व प्रेमालिंगन दिलें. नंतर हनुमंतानें जानकीच्या वेणींतील

मणी आणि ब्रह्मलिखित रामचंद्रापुढें ठेविलें आणि अंगदानें समुद्रतीरास पोंचेपर्यंत व तेथून हनुमंत महेंद्रपर्वतावर उभा राहून शतयोजनें सागरजल उडाला, येथपर्यंत वर्तमान सांगितलें. पुढील वर्तमान काय तें हनुमंत सांगत नाहीं. असें अंगदाचें भाषण ऐकतांच रामानें हनुमंताकडे पाहिलें, तेव्हां तो हात जोडून विनयपूर्वक म्हणाला—प्रभो! लंकेंत जें वर्तमान झालें, तें या पत्रांत ब्रह्मदेवानें आपल्या हातानें लिहिलें आहे. त्याशिवाय जें सांगण्यासारखें आहे, तें सांगतों. जनकतनया अशोकवनांत सुखी आहे; परंतु आपल्या वियोगामुळें अत्यंत कृश झालेली आहे. हा मणि परम सद्गद होऊन तिनेंच खुणेसाठीं दिला आहे. आपल्या करांगुलींतील मुद्रिका हृदयाजवळ धरून तिनें अपार शोक केला आणि ती आपल्या मनगटांत घातली. प्रभो! तिची कृशता मी आपल्याला किती सांगावी? ती मुद्रिका कंकणाप्रमाणें तिच्या हातांत खेळत आहे. केवळ तुझ्या नामामृतावर ती जिवंत मात्र आहे; असें ऐकतांच रामाला फार वाईट वाटलें. नंतर त्यानें हनुमंताला "तूं तें अगाध समुद्रजल तरून गेलास कसा व आलास कसा?" असा प्रश्न केला. तेव्हां "आपल्या मुद्रिकेनें जातांना व मातेच्या दिव्य मण्यानें येतांना मला तारलें" असें सांगितलें. नंतर रामानें तें ब्रह्मलिखित पत्र उघडून वाचण्यासाठीं लक्ष्मणाच्या हातांत दिलें. त्या वेळेस त्या पत्रांतील आशय ऐकण्यासाठीं सर्व कपि एकाग्रचित्त होत्साते शांतपणानें बसले. वाराही स्थिर झाला आणि तो भोगींद्रावतार पत्र वाचूं लागला.

# अध्याय २२ वा.

राजीवनयन राम आणि सूर्यपुत्रादि सर्व कपि सावधान चित्तानें ऐकत असतां ब्रह्मदेवानें लिहिलेलें पत्र लक्ष्मण वाचूं लागला—हे अनंतकोटिब्रह्मांडनायका दयार्णवा राघवा, हे षड्विकाररहिता, हे अरिषड्वर्गनाशका रामा ! तूं निर्विकार व निर्गुण असतां बंदीचे सुरगण सोडविण्यासाठीं सगुण झालास व पितराज्ञेचें निमित्त करून काननांत आलास. नंतर दशकंठानें तुझ्या चिच्छक्ति—( जानकी ) चें हरण केलें व तिच्या शोधार्थ तूं किष्किंधेपर्यंत आलास आणि पुढें शोधासाठीं रुद्रावतार मारुती लंकेंत पाठवून दिलास. तो आपल्या दिव्यशक्तीनें उड्डाण करून समुद्रोदक तरत असतां मार्गांत त्याला बहुत विघ्नें आलीं; पण तीं तुझ्या तारकनामप्रतापानें दूर झालीं. त्यानें प्रथम उप—( पड ) लंकेंत येऊन असंख्य राक्षसींचा संहार केला; क्रौंचेच्या उदरांत शिरून तिचें उदर विदारण केलें. नंतर तो निकुंबळेंत आला व इंद्रजीत आणि सुलोचना यांस पाहतांच त्या सुरूप सुलोचनेलाच जानकी मानून त्या दोघांच्या मस्तकांवर पाषाण घालण्याचा विचार करूं लागला. इतक्यांत सुलोचना कांहीं बोलली व त्यावरून 'ही सीता नव्हे' असें समजून तो तेथून निघाला आणि अणुप्रमाणें रूप धरून त्यानें सर्व लंकानगरीची विटंबना केली. सर्व लोकांस नग्न करून गल्लोगल्लीं पळविलें. या प्रमाणें पत्र ऐकत असतां राम धन्यप्रताप ! असें म्हणून मान डोलवूं लागला व मर्कट कौतुकानें हंसून आनंद प्रदर्शित करूं लागले. कांहीं वेळानें पुनः शांतता झाल्यावर लक्ष्मण तेंच पत्र पुढें वाचूं लागला.

नंतर मारुती बिभीषणाचे मंदिरांत गेला आणि तेथें हरिकीर्तन ऐक-

तांच संतोष पावला. तेथून कुंभकर्णाचे मंदिरांत जाऊन दुर्गंधीमुळें कंटाळला. पुढें रावणाच्या सभेची तर मारुतीनें चमत्कारिक प्रकारानें विटंबना केली. तें अगाध चरित्र पत्रीं लिहितां येत नाहीं. मग रावणाच्या ऐशींहजार स्त्रियांचीं मंदिरें सीतेसाठीं शोधून शेवटीं तो पवनात्मज मंदोदरी एकांतीं निजली होती तेथें आला व 'हीच पवित्र सीता असेल' असें मानूं लागला; पण इतक्यांत ती दुष्टस्वप्न पाहून जागृत झाली आणि रावणही तेथें आला होता, त्याला " रामाची सीता परत नेऊन द्या ! " असें आग्रहपूर्वक सांगूं लागली. तें रावणानें मान्य केलें नाहीं. तरी सीतेच्या समाचारासाठीं अशोकवनांत एक दूती त्यानें त्याच वेळेस पाठविली. त्या दूतीच्या मागून हनुमान् अशोकवनांत जेथें सीता होती तेथें गेला. त्यानें सुणेची मुद्रिका ध्यानस्थ असलेल्या सीतेच्या पुढें ठेवून वृक्षगर्भी बसून गायन आरंभिलें. तेव्हां जानकी सावध झाली आणि मुद्रिका पाहून मोह पावली. तों मारुती प्रगट होऊन तिला भेटला. त्या ठिकाणींही त्यानें कित्येक राक्षसी झोडून मारल्या. नंतर क्षुधेच्या मिषानें त्यानें अशोकवनाचा विध्वंस केला. तें वर्तमान ऐकतांच रावणानें असंख्य राक्षसवीर त्याला धरण्यासाठीं पाठविले; त्या सर्वांचा वध करून मारुतीनें इंद्रजिताला नग्न करून त्याची विटंबना केली आणि त्याला कोंडून ठेविलें. शेवटीं मी स्वतः आलों व हनुमंताची प्रार्थना करून त्याला ब्रह्मपाशांत बद्ध केलें आणि रावणाच्या सभेंत घेऊन गेलों. त्या ठिकाणीं जातांच हनुमंतानें रावणाला शब्दशस्त्रें करून जर्जर केलें आणि सभेचीही निर्भर्त्सना केली. नंतर मारुतीला मारण्यासाठीं रावणानें त्याच्या पुच्छाला वस्त्रें गुंडाळलीं, त्यावर तेल ओतलें आणि अग्नि लावला. तेव्हां मारुती उडाला व

त्यानें तृतीयभाग लंका जाळली; पण असा अद्भुत चमत्कार झाला कीं लंकेचा जेवढा भाग जळाला तेवढा सुवर्णाचा झाला! नंतर सागरांत पुच्छ विझवून जसें श्रम पावलेलें बालक जननीजवळ येतें, त्याप्रमाणें हनुमान् सीतेजवळ आला; मला भेटला व मजपासून पत्र घेऊन पुनः रामदर्शनासाठीं जातों, असें सांगून निघाला. तो सेवेसी सादर होणारच आहे.

यामप्रमाणें लक्ष्मणानें पत्र पुरें करितांच रामानें धांवत जाऊन मारुतीला प्रेमालिंगन दिलें आणि त्याच्या तोंडावरून हात फिरवून त्याचा गौरव केला. नंतर त्यानें जो सीतेचा मणि आणला होता, तो हृदयाजवळ धरून मोह पावला आणि मारुतीला म्हणाला—अंजनीतनया! धन्यधन्य, आज तूं मला जानकी भेटवलीस त्यामुळें मी फार सुखी झालों. तुझे हे उपकार माझ्याच्यानें फिटणार नाहींत. असें ऐकतांच मारुती मनांत म्हणाला—मी जानकीमातेला घेऊन आलों नाहीं, ही मोठी चूक केली. भूला खूण पाहून जर इतका आनंद झाला आहे, तर प्रत्यक्ष जनकजेला पाहतांच याला पूर्ण आनंद होईल. तर तिला आणण्याला या वेळेसही मी समर्थवान् आहें, असें मनांत येतांच तो हात जोडून रामाला म्हणाला-प्रभो! क्षणभर धीर धरावा. सर्व राक्षसांचा संहार करून मी जनकतनयेला घेऊन येतों. याप्रमाणें बोलून अवकाश न धरितां तो जेव्हां उड्डाण करण्यास सिद्ध झाला; तेव्हां राम शुद्दीवर येऊन त्याला म्हणाला-मित्रा हनुमंता! उभा रहा; जाऊं नको. पुढें फार कार्यभाग उरकावयाचा आहे. याप्रमाणें राम बोलला, परंतु आवेशास चढलेल्या मारुतीनें तें ऐकिलें नाहीं व तो निघालाच. तेव्हां स्वतः राम त्याला आवरण्यासाठीं धांवला. पण मारुतीनें त्याला उचलून खांद्यावर घेतलें आणि रावणाचा वध करण्यासाठीं आपणांसच लंकेंत नेतों; असें म्हणूं लागला. इतक्यांत

लक्ष्मण, सुग्रीव, अंगद आणि जांबुवंत हे चौघे मारुतीला आवरण्यासाठीं उठले व त्याच्या दंडाला धरून थांबवूं लागले; परंतु तो त्या चौघांसही घेऊन उडाला आणि म्हणाला—इतकेजण लंकेस जाऊन राक्षसांचा संहार करूं आणि जानकीला घेऊन परत येऊं. इतर वानर जर न्यावे, तर त्यांच्यानें समुद्र तरवणार नाहीं. असें बोलून त्यानें त्या चौघांसही उचललें व खांद्यावर घेतलें. तव्हां राम त्याला म्हणाला—प्राणसख्या, मारुती ! विचाराशिवाय भलतीच क्रिया करूं नये; असें नीतिवचन आहे. असें ऐकतांच मारुतीनें सप्रेम रामचरण धरिले आणि मी तुझा आज्ञाधारक आहें असें सांगितलें.

नंतर राम सभा करून बसला आणि मारुतीला विचारूं लागला—लंकानगरी कशी आहे ? तेथील प्रजा कशी वागते आणि तिची स्थिति काय आहे ? असें ऐकतांच तो चातुर्यरत्नाकर मारुती सांगूं लागला—लंकानगर लांबरुंद तीनशें गांवें आहे. ( असें बोलत असतां त्यानें जमिनीवर लंकेचा नकाशा काढून रामाला दाखविला. ) त्यांत पांचलक्ष उत्तम संगमरवरीपाषाणांचीं सदनें आहेत व सातलक्ष विटांचीं आहेत. तांबें आणि कांसें यांचीं घरें पांचकोटि आणि निवळ सोन्याचीं सात कोटि घरें आहेत. हेमरत्नालंकृत नवकोटि शिवालयांतून नित्य त्रिकाळ रुद्राभिषेक, पूजा व नैवेद्य चाललेले आहेत. सर्व राक्षस शिवोपासक आहेत; ते रुद्राक्षमालाधारण व विभूतिचर्चन करून अग्निहोत्र आणि वेदाध्ययन चालवितात. मुख्य रावण सुबुद्ध व महाज्ञाता आहे. त्यानें वेदांचीं खंडें केलीं आहेत ! लंकेंत जागोजागीं पाहवेंतर राक्षस तपश्चर्या करीत आहेत.

याप्रमाणें लंकेंतील राक्षसांची स्थिति ऐकत असतां " ते पुण्यप-

पण लंकावासी निशाचर मला आटपणार नाहींत;" असें रामाच्या नांत आलें व तो चिंतित झाला व क्षणभर विचार करून तो मारुतीला नः विचारूं लागला—मारुती ! तूं लंकावासी यांची स्थिति कथन केलीस ही नीट आहे, परंतु दया, क्षमा, शांति, उपरति, विरक्ति, शील, दान आणि अंतःकरणशुद्धि त्यांच्याजवळ आहेत काय? असें एकतांच मारुती म्हणाला—या प्रत्येकाचा लंकेंत अभावच आहे. सर्व जन परम अधर्मी व निर्दय असून कापट्याचरणांत निष्णात आहेत. मद्यमांसाशनोन्मत्त होत्साते अनेक दुष्टाचरणें करीत असतात. असें एकतांच रामानें हास्यवदन करून मारुतीला सांगितलें—हनुमंता ! ज्यां ठायीं दया व क्षमा नाहींत, त्यानें जप तप आणि दान कितीही केलें तरी तें व्यर्थ होय; म्हणून तुला सांगतों कीं, ते कसेही जरी असले तरी मी एका क्षणांत सर्वांचा संहार करीन. असें ऐकतांच सर्व वानरांनीं आनंदित होऊन भुभुःकार केला. नंतर ब्रह्मदेवानें लंका क्षय झाल्याबद्दल लिहिलें होतें, त्याबद्दल रामानें जांबुवंताला प्रश्न करतांच तो सांगूं लागला.

श्रीविष्णु गजेंद्राचा उद्धार करून वैकुंठीं परत आल्यानंतर गरुड हात जोडून त्यास म्हणूं लागला कीं, महाराज ! मला क्षुधेनें व्याप्त केलें आहे, तर कृपा करून कांहीं भक्षणार्थ उपाय सांगावा; असें ऐकतांच विष्णूनीं त्याला सांगितलें—नक्र व गजेंद्र यांचीं प्रचंड कलेवरें पडलीं आहेत, तीं तूं भक्षण करून ये. अशी आज्ञा मिळतांच तो पक्षिपति उडाला व त्या कलेवरांजवळ आला. इतक्यांत तेथें भुमंगनामक दुसरा पक्षी येऊन विभाग मागूं लागला. तेव्हां एकाक्षणांत गरुडानें त्याचा संहार केला. नंतर तीं दोन्हीं कलेवरें उचलून तो सुपर्ण एका

जंबुवृक्षाच्या शाखेवर जाऊन बसला. त्या शाखेला साठहजार वाल-खिल्य संज्ञकऋषि टांगून घेऊन तपश्चर्या करीत होते. गरुड जाऊन खांदीवर बसतांच ती मोडली व खालीं पडणार, इतक्यांत ते तापस गरुडानें पाहिले, आणि पडत असलेली खांदी सांवरून धरिली. तें शतयोजनें विस्तीर्ण शाखा व नक्रगजेंद्रांचीं कलेवरें चोंचीत घेऊन अर्धात्री राहिल्यामुळें गरुडाला फार संकट पडलें. नंतर त्याचा पिता कश्यप अनुष्ठान करीत बसला होता, त्याजकडे जाऊन गरुडानें त्या-त्यावर आपल्या पक्षांनीं छाया केली. तेव्हां कश्यपमुनीनें वर पाहिलें आणि पुत्र संकटांत पडला आहे असें जाणून वालखिल्यांस खालीं उतर-ण्याबद्दल विनविलें. ते ऋषि कश्यपाची विनंती एकतांच खालीं उतरले आणि ऋषीनें पुत्राला सांगितलें कीं, येथून लंकागिरी जवळच आहे. असें ऐकतांच गरुडानें त्या लंकागिरीवर जाऊन शाखा सोडली आणि तेथेंच बसून कलेवरें भक्षण केलीं. त्या गरुडाचीं नखें ज्या पर्वताला लागलीं, तो हा त्रिकूटाचल झाला. त्या जंबुवृक्षाच्या शाखेवर पुढें लंका वसली. जांबुवंत रामाला ह्मणतो—हे दाशरथे ! ती सुवर्णाची भव्य शाखा तळीं असल्याकारणानें मारुतीनें लंकेला अग्नि लावितांच मूस ओतली गेली व तितका भाग सोन्याचा झाला !!! याप्रमाणें लंका नगरीच्या उत्पत्तीविषयीं कथन ऐकतांच रामाला अत्यानंद झाला.

नंतर सुग्रीवादि सर्व कपींच्या अनुमतानें राम विजयादशमीच्या दिवशीं श्रवणनक्षत्रावर लंकाजयासाठीं निघाला. पूर्वीं रघुराजाही याच मुहूर्तावर दिग्विजयास निघाला होता. राम निघाला त्यावेळेस सर्व शुभ-योग, जयतिथि येऊन रामचरणीं लागल्या. अठरापद्में कपि भुभुःकार करीत उठले. बहात्तरकोटि रीस तयार झाले. छपन्नकोटि गोलांगुलें

र्जना करूं लागतांच उर्विमंडल दणाणून गेलें व शोकानें आकाशाला कंप सुटला. वाद्यांच्या धडाक्यानें वनचर व खेचर यांस भय वाटूं लागलें. जसा सहस्रकरसूर्य रथावर शोभतो तसा मारुतीच्या खांद्यावर राम शोभूं लागला. लक्ष्मण अंगदाच्या स्कंधावर बसला. सागरमंथनासाठीं सुरासुर जसे जमून निघाले होते, तसे लंकेसह रावणमंथनेच्छेनें रीस व वानर जमून रामासह दक्षिणपंथानें निघाले. शाल्मतमालादि वृक्षांचे पल्लव मोडून वानर रामावर छाया धरूं लागले. कोणी चवरीप्रमाणें रामावर वृक्षपल्लव उडवूं लागले. त्या सेनासमुदायाची रुंदी चालतांना दहा योजनें दिसूं लागली. मार्गांत कपि पर्वत उचलून चेंडूसारखे झेलून आवेशानें धांवूं लागले. याप्रमाणें तो सेनासागर दक्षिणरत्नाकराचे तीरावर येऊन स्थिर होतेवेळीं सर्व कपींनीं जो भुभुःकार केला, त्याबरोबर भूमंडळ दणाणलें आणि तो जयशब्द ऐकल्यामुळें लंकेंत रावणालाही धाक उत्पन्न झाला.

तेव्हां इंद्रजितादि सर्व पुत्र आणि प्रहस्त, विद्युज्जिव्हादि थोर थोर प्रधान जवळ घेऊन रावण विचार करण्यासाठीं बसला. तो सर्वांस ह्मणाला—" शत्रु, सर्प आणि अग्नि यांस कधींही लहान किंवा निर्बल ह्मणूं नये. " हे केव्हां घात करतील याचा नियम नाहीं, ह्मणून ह्मणतों कीं, समुद्राच्या पैलतीरीं दाशरथी आपल्या परिवारासह येऊन उतरला आहे, त्याला आकळण्याची कांहीं युक्ति कथन करा. असें ऐकतांच रावणाचे सर्व पुत्र व प्रधान शस्त्रें सरसावून " आपण चिंता करूं नये. नर आणि वानर आमचें भक्ष्य आहे. " असें ह्मणूं लागले. तेव्हां त्या सभेंत बसलेला न्यायशील व सत्वस्थ बिभीषण ह्मणाला—हे मतिमंद, वाचाळ दुर्जनहो, तुह्मी रुवे दशमुखाभोंवतें जमून नानाप्रकारच्या कुत-

कोनीं त्याचें मन दूषित करीत आहां. एकच वानर आला होता, त्यानें तुह्मां सर्वांना जर्जर करून लंकानगर दहन केलें व परत जाऊन त्यानेंच दाशरथीला सैन्यासह समुद्रतीरापर्यंत आणलें. यावरून ते कसे पराक्रमी आहेत, याविषयीं तुमची खात्री व्हावी; परंतु सभाग्याची कीर्ति ऐकत असतांही त्याला मिथ्या दूषणें देऊन भुंकणारे श्वानगुणाचे तुह्मी. ज्या वेळेस त्या वानरानें अखयादि राजपुत्र मारले व इंद्रजिताला नग्न करून कोंडून बसविला, त्या वेळेस तुमचे पराक्रम कोठें गेले होते ? तो जगद्वंद्य राम सनकादिक ज्याचें ध्यान करीत असतात, जो विषकंठाला पूज्य देव मायाचक्रचालक, केवळ भूभार हरण करण्यासाठीं मूलप्रकृतिसह अवतरला आहे. त्याची तुह्मी पामरांनीं जरी निंदा केली तरी तोच तुह्मांला दंड करणार ! या रावणाला कामविकारामुळें भ्रम झाला आहे, ह्मणून रामाच्या प्रगल्भशक्तीविषयीं याला विचार होत नाहीं. नाहींतर ज्या सहस्रार्जुनाच्या बंदींत हा पडला होता, त्याला भृगुपुत्रानें मारिलें आणि त्या भार्गवाचा रामानें पराभव केला. यावरून या मतिहीनाला त्याचा पराक्रम कळूंनये काय? हा त्याचें स्वरूप ओळखत नाहीं. वानर सर्व सुधापानी देव अवतरले आहेत व राम पूर्णब्रह्मसनातन प्रत्यक्ष विष्णु होय. यासाठीं तो समुद्राचे पैलतीरीं आहे, तों त्याला शरण जाऊन जानकी अर्पण करा, बंदींचे देव सोडा आणि चंद्रार्क आहे तोंपर्यंत आपल्या पुत्रपौत्रादिकांचें कल्याण करून घ्या. वारंवार दुश्चिन्हांचा भास होऊन सति मंदोदरी दुष्टस्वप्नें पहात आहे, यावरून उमजा आणि व्यर्थ गळ्यांत पाषाण बांधून डोहांत उडी टाकूं नका.

याप्रमाणें बिभीषण भाषण करीत असतां सर्व सभाजन निरुत्तर झाले आहेत, तों प्रहस्त प्रधान बोलूं लागला—आपण राजबंधु ह्मणवितां

...न; परंतु सारासार विचार तुम्हांला कळत नाहीं, असें आहे तर सभेंत ...पण तरी करूं नये. अशी शतमूर्खांप्रमाणें बडबड राजकुलांतील पुरुषाला ...चित नव्हे. राजसभेंतील विचार जर आपल्याला आवडत नसेल, तर उठून घरीं निघून जावें. याप्रमाणें तो प्रधान बोलत आहे, तों इंद्रजीत ...णाला–काका, या अनुचित भाषणाबद्दल मीच आपला वध केला असता, परंतु पितृव्य आहां म्हणून क्षमा केली. इतकें बोलून तो शक्रारि रावणाला म्हणाला–हा आपला सख्खा बंधु परंतु शत्रूचा पक्षपाति आहे. याप्रमाणें इंद्रजीत बोलूं लागतांच बिभीषणाला फार राग आला आणि तो म्हणाला–चांडाळा, तूं महा अमंगळ, कृतघ्न व कपटी आहेस. तुमच्या सारख्या खलांच्या संगतीनें हा रावण मतिमंद झाला! परंतु तुम्हां ...स दंड करण्यासाठीं तो अयोध्याप्रभु रामराणा येत आहे. या रावणानें ...नुचित कर्मारंभ केला म्हणून मातेनें मला पाठविलें. त्याच प्रमाणें ...न तुम्हीं ऐकाल म्हणून बोध केला आहे. आतां तुमचें दैव! असत्य ... व रामाला सीता न देतां अभिमान धरला तर कुळक्षय होणार! ...! बिभीषणाचें भाषण ऐकून असतां रावणाला फार क्रोध आला ...त। ...घेऊन वध करण्यासाठीं बिभीषणावर धांवला; परंतु ज्याला ... रक्षणार, त्याला कोण मारणार! रावणाचा हात लचकल्यासारखा ...ऊन त्याच्या हातांतील शस्त्र खालीं पडलें; तरी तें त्यानें पुनः उच- ...लें, तेव्हां इंद्रजितानें त्याला आवरून धरिलें; पण तितक्यांत रा- ...णानें जी एक लाथ झाडली, ती बिभीषणाला लागली, तरी तो ...ांत, निर्मत्सर व भेदरहित बिभीषण रावणाला पुनः उपदेश करूं ...ागला. सर्व सभाजन त्याचें क्षमाशीलत्व वर्णन करूं लागले. इतक्यांत ...वणादिकांची माता कैकसी त्या ठिकाणीं आली व बिभीषणाचें हित

मिळून म्हणाली– बाळा, हा दुरभिमानी रावण ऐकत नाहीं; यासाठीं आत तूं तरी रामाला शरण जाऊन आपल्या जन्माचें सार्थक करून घे. जो बळें विष भक्षण करीत असेल त्याच्या पंक्तीला शहाण्यानें कधींही बसूं नये तूं रामाशीं सख्य करून घे, म्हणजे तुझा कल्पांतींही नाश होणार नाहीं

असें ऐकतांच मातेला नमस्कार करून आपल्या चौघां प्रधानांस, बिभीषण उठला आणि पुनः रावणाला म्हणाला–तूं माझा ज्येष्ठबंधु आहेस, म्हणून तुला सांगतों कीं, मी रामाला शरण जात आहें. जर तुला आपलें कल्याण व्हावें असें वाटत असेल, तर हाच मार्ग अवलंब केला पाहिजे. असें बोलून सर्वांदेखत आकाशांत उडाला आणि श्रीरामचरणीं लीन होण्यासाठीं चालता झाला.

---

काय उपाय करावा ? बिभीषण ह्मणाला—सागराची पूजा करून त्याजपाशीं सेना उतरण्यासाठीं मार्ग मागावा. असें ऐकतांच प्रभु राम दर्भासन घालून समुद्रतीरावर बसला आणि त्याजपाशीं मार्ग मागूं लागला.

इतका प्रकार होईपर्यंत त्या ठिकाणीं रावणाचा हेर शार्दूल नामक राक्षस होता. तो लंकेंत गेला आणि सर्व वर्तमान रावणाला सांगूं लागला. तेव्हां चिंतातुर रावणानें शुकनामक राक्षसाला बोलावून सांगितलें—तूं सुग्रीवाकडे जा आणि त्याला सांग कीं, तूं आमचा बंधु आहेस सीतेचा व तुझा संबंध काय ? तूं आपलें सैन्य घेऊन माघारा जा. असें ऐकतांच तो शुक निघाला व रामसैन्यासमीप अंतरिक्षांत येऊन उभा राहिला आणि धीटपणानें बोलूं लागला—हे वानरेश्वरा, माझें भाषण ऐक. मला रावणानें मुद्दाम तुला निरोप सांगण्यासाठीं या ठिकाणीं पाठविलें आहे. तो असें ह्मणतो कीं, "आह्मी जनकतनया अरण्यांतून घेऊन आलों तिचा व तुझा संबंध काय ? तूं आपली मर्कटसेना घेऊन लौकर किष्किंधेस परत जा. सीतेसाठीं तुह्मी माकडें आपले प्राण व्यर्थ काय ह्मणून खर्ची घालतां ? तुह्मी जर परत जात नसाल तर मी महापराक्रमी शुक तुमचीं शिरकमळें तोडून नेईन आणि राजराजेश्वर जो दशकंठ भूपति त्याची पूजा करीन.

याप्रमाणें त्या शुकराक्षसाचें भाषण ऐकतांच कित्येक कपिवीरांस क्रोध आला आणि त्यांनीं तत्काळ जाऊन त्या शुकराक्षसाला धरून आणलें. नंतर अनेक वानर त्याला लाथाबुक्यांनीं मारूं लागले. तेव्हां तो राक्षस अगदीं कासाविस होऊन, हे कृपार्णवा राघवा ! मजवर दया करून मला सोडीव; असें ह्मणूं लागला. ते शब्द कानावर येतांच दयाळू रामानें त्याच्याकडे पाहिलें आणि लक्ष्मणानें वानरांक-

कून त्याची मुक्तता करविली, पण तो पुनः आकाशांत उडाला आ-
णि वानरांना ह्मणाला–हे सुग्रीवा, तूं येथून चालता हो. या रामा-
संगतीला लागून व्यर्थ जीव कां देतांस? देवांच्या बुद्धीला लागू-
न शंकरापुढें जातांच मदन जसा भस्म होऊन गेला, तसा तुह्मां वानरां-
मारण्यासाठीं राम रावणासमोर घेऊन आला आहे. अरे हतमूर्ख वा-
हो, तुह्मी आपलें हित कसें जाणत नाहीं? अशी त्या शुकाची भाष-
ऐकतांच ऋषभ वानर ह्मणाला–रे हतभाग्या शुका, तूं आपल्या दश-
मुखाला जाऊन सांग कीं, जनकात्मजेला हरण केल्यामुळें तूं आम-
शत्रु झालास. आतां प्रभु रामचंद्र तुझा वध करून तुझीं दाही शि-
दशदिशांस बळी देण्यासाठीं येत आहे. यासाठीं त्या दशकंठाला ह्मणावें
जर तुला तुझा जीव प्रिय असेल तर रामाला शरण ये आणि जनक-
तनया परत आणून दे. असें ऐकतांच शुक ह्मणाला–रे मर्कटहो,
तुह्मी विनाकारण कष्टी कां होतां? पुनः ती सीता तुमच्या दृष्टीसही
पडणार नाहीं. याप्रमाणें त्याची बडबड ऐकतांच वानरांनीं त्याला पुनः
धरलें आणि पंखांसह बुकलून बांधून ठेविलें.

इकडे राम समुद्राजवळ प्रार्थना करीत व मार्ग मागत बसला हो-
ता. तो सारखा तीन दिवसपर्यंत ध्यानस्थ होता. तरी तो उन्मत्त
समुद्र विचार करीना, तेव्हां अत्यंत क्रोधाविष्ट झालेला राम ह्मणा-
ला–याला सगरपुत्रांनीं उत्पन्न केलें ह्मणून तीन दिवसपर्यंत याची
मार्गप्रतीक्षा केली व याला मान दिला; परंतु हा समय ओळखत नाहीं.
चिंता नाहीं, माझा वडवानलवत् बाण याला क्षणार्धांत शोषण करील.
असें बोलून त्यानें बाणाशीं ब्रह्मास्त्राची स्थापना करून तो चापाला
लावून आकर्ण ओढतांच सर्व सरिता व जलचरांसह सागर भयभीत

झाला आणि सहपरिवार येऊन रामचरणीं लागला व विनयानें ह्मणाला—हे पूर्णब्रह्मा रामचंद्रा, तूं कृपासमुद्र असतां एकाएकीं तुझ्यांत अशी क्रूर लहर कां उत्पन्न झाली? माझा अन्याय नसतां त्वां माझ्यावर बाणाची योजना कां केलीस बरें? सर्वदा गर्जना करीत असण्याचा माझा स्वभावच आहे. मी तुझ्याजवळ गर्व केला नाहीं. याप्रमाणें त्याचीं नम्रवचनें ऐकतांच राम शांत झाला आणि ह्मणाला—मी धनुष्यावर अमोघ बाण लावला आहे, याला कांहीं कारण सांग. सागर ह्मणाला—देवा, पश्चिमेस मरुनामक एक दुष्ट दैत्य आहे, तो नित्य माझीं जलचरें भक्षण करीत असतो, त्याजवर या बाणाची योजना कर. असें ऐकतांच कल्पांत चपलेप्रमाणें तो बाण जो सुटला, तो मरुदैत्य जलचरें भक्षण करीत होता, त्याच्या कंठप्रदेशीं जाऊन लागला, त्याबरोबर तो मरण पावला आणि त्या ठिकाणीं जें उदक होतें तेंही आटून गेलें. नंतर कांहीं काळ लोटल्यावर त्या जागीं मारवाड देश वसला.

रामाला जामात मानून सागरानें दिव्यवस्त्रालंकारांनीं त्याची पूजा केली आणि सांगितलें—हे रविकुलभूषणा रामा, शत्रूच्या समोर जाऊन युद्ध करणेस हा वल्कलाजिनधर वेष योग्य नव्हे. यासाठीं या वस्त्रालंकारांचा अंगीकार करून रणांत रावणाचा संहार कर. युद्धांत इंद्र आपला रथ तुला बसण्यासाठीं पाठवील. याप्रमाणें सागर बोलत आहे, तों हनुमंत सुग्रीवादि सर्व कपि रामाला विनवूं लागले कीं, स्वामी, आपण दिव्यवस्त्रालंकारमंडित असावें अशी आमची सर्वांची इच्छा आहे, ती आपणाशिवाय कोण परिपूर्ण करील? असें ऐकतांच सर्वांची उत्कट इच्छा जाणून चापपाणिरामानें त्या सागरदत्त वस्त्रालंकारांचा अंगिकार केला. कल्पांतचपलेसारखा पीतांबर राम नेसला,

देदीप्यमान उत्तरीय वस्त्र अंगावर घेतलें, जटाभार आवळून मस्तकीं रत्नकिरीट घातला. त्याचें तेज दिक्चक्रांतही मावेना. कर्णी सूर्यचंद्राप्रमाणें दिव्य कुंडलें तळपूं लागलीं. मुक्तरूपानें अनंत ब्रह्मांडें मौक्तिकाप्रमाणें अनेक मुक्तमाला सागरानें रामाच्या कंठांत घातल्या पण रामाच्या श्यामलांगावर त्यांना वर्ण पालटून तीं दिव्य मुक्ताफळें इंद्रनील मण्याप्रमाणें दिसूं लागलीं. निष्कलंक मृगांकाप्रमाणें हृदयावर पदक चमकूं लागलें. कटिप्रवेष्टनींत क्षुद्रघंटा घणघणूं लागल्या. तीक्ष्ण प्रभेच्या चक्राप्रमाणें रामाच्या करांगुलींत मुद्रिका शोभूं लागल्या आणि पदकमलीं नूपुरें रुणझुणशब्दोच्चार करूं लागलीं. याप्रमाणें उत्तमोत्तम वस्त्राभरणांसह दिव्य गंधपुष्पांनीं सागरानें राम व लक्ष्मण यांची पूजा केल्यानंतर आकाशांत त्रिविष्टपांनीं जयजयकारासह दिव्य सुमनांचा वर्षाव केला आणि त्या दोन्ही मनोहर मूर्ति पाहतांना सर्व वानरही आनंदगजरानें भुभुःकार करूं लागले.

नंतर राम सागराला म्हणाला—हे नदीपते, आमचा दळभार लंकेजवळच सुवेलाचल आहे, तेथें पोंचण्याला कांहीं उपाय सांग. असें ऐकतांच सागर म्हणाला—तुमच्या सैन्यांत नळ नामक वानर आहे, त्याला ऋषींचा वर आहे. तो कपि बाळपणीं खेळत असतां ऋषींचे शाळिग्राम उचलून उदकांत टाकीत असे. त्या वेळेस सर्व ऋषींनीं त्याला वर दिला कीं, तुझ्या हातानें उदकांत पडलेला पाषाण तरो. यासाठीं हे राघवा, तूं त्या नळाच्या हातानें मजवर सेतु बांधून लंकेला जा. असें सांगून सागर आपल्या परिवारासह निघून गेल्यावर रामानें सुग्रीवादि सकळ कपींस जवळ बोलावून नळाच्या हातानें सागरावर सेतु सिद्ध करण्याचा विचार त्या सर्वांस कळविला आणि नळाला

जवळ बोलावून त्याच्या वराबद्दल स्तुति करून त्याचा फार गौरव केला. तेव्हां सर्व कपि भुभुःकार करून अपार पाषाण व पर्वत आणून नळाजवळ देऊं लागले व तो ते सागरावर ठेवून सेतु तयार करूं लागला. बहात्तरकोटि रीस आणि अठरापद्मं वानर, असंख्य पर्वत आणून समुद्रांत टाकूं लागले. त्यांत मारुतीमात्र एकटा एका खेपेंत किती पर्वत आणीत होता, याची मल्लकाव्यांत गणना केली आहे ती—चारलक्ष पर्वत तो पुच्छांत गुंडाळीत असे. सहालक्ष डोक्यावर ठेवी. दोनलक्ष हातांत धरी आणि कित्येक नगांच्या पंक्ति स्कंधावर ठेवून आकाशमार्गानें अनंत खेपा करीत असे. इतर वानर थकून जागोजागीं पडत असत; पण मारुती कांहीं कधीं दमला नाहीं. त्याचें बळ व अपार श्रम पाहून रामालाही आश्चर्य वाटत असे. पहिल्या दिवशीं नळानें चौदा गांवें सेतु सिद्ध केला; पण माझ्या हातानें पाषाण तरतात असा त्याला किंचित अभिमान होतांच रात्रींतल्या रात्रीं तो प्रचंड सेतु एका मत्स्यानें गिळिला.

दुसऱ्या दिवशीं वानर पाहतात तों सेतु जाग्यावर नाहीं. तेव्हां सुग्रीवप्रभृतिकांनीं तर्क केला कीं, राक्षसांनीं सेतु उचलून नेला असावा. त्यांनीं तें वर्तमान रामाला कळविलें. तें ऐकतांच रामचंद्रानें शरभाला सांगून तिमिंगिल मत्स्याला आणविलें. तेव्हां तो सांगूं लागला—हे रामचंद्रप्रभो, मी तुझ्या दर्शनासाठीं येत असतां माझ्यामागून कांहीं मुलें येत होतीं. त्यांनीं बाल्यस्वभावानें तो सेतु भक्षण केला असेल. त्यांजकडूनच मी तो पुनः बांधवीन किंवा मी आपल्या पाठीचा सेतु करून तुझें सैन्य पलीकडे उतरीन. याप्रमाणें त्याचें भाषण ऐकतांच रामाला त्या मत्स्यबालकांच्या अगाध करणीचें आश्चर्य वाटलें व नळ गर्वहत

होत्साता खालीं पाहूं लागला, इतक्यांत मत्स्यबाळकांनीं तो सेतु पूर्वस्थळीं आणून ठेविला. नंतर नळ त्यापुढें सेतु बांधूं लागला; पण त्या दिवशीं पाषाण पाण्यांत टेवतांच मत्स्य त्याला भक्षण करूं लागले. तेव्हां मत्स्यरूपी श्रीहरीनें सर्वांचे निवारण करीत असतां असें सांगितलें कीं, राम आणि मी एकच आहों. त्याच्या कार्याला विघ्न नकरितां मात्र व्हा आणि प्रत्येक पाषाणाखालीं आपापली पृष्ठि लावून तें सांवरून धरा. असें एकतांच मत्स्य पर्वत गिळीनासे झाले. तरी पर्वत पाण्यावर ठेवतांच उसळून दूर वाहून जात. अशी स्थिति झाली आणि नळ तटस्थ होऊन पाहूं लागला. तेव्हां हनुमंत त्याला म्हणाला—मित्रा नळा, किंचितही गर्व करूं नको. सर्व कर्ता करविता राम आहे, असें असतां अभिमान काय म्हणून करावा? ज्यानें स्तंभाशिवाय आकाशमंडप सांवरला आहे, ज्यानें ही धरणी उदकावर तारली आहे आणि जो मित्र, शशि, इत्यादि प्रचंड गोल वायुचक्रांत प्रमाणानें चालवितो, त्या अनंतब्रह्मांडनायकापुढें जीवांचा अभिमान कितीसा चालणार आहे बरें? आतां तूं असें कर—एका शिळेवर ' रा ' आणि दुसरीवर ' म ' अशीं अक्षरें खोदून मग त्या शिळा पाण्यावर ठेव, म्हणजे एकापुढें एक जडून राहतील. आतां तूं म्हणशील कीं, पवित्र रामनामावर कपींचे पाय पडतील, तर मुख्य भेदाला कारण जो अभिमान आहे तो सोड, म्हणजे सर्व एकत्व प्रत्ययाला येईल.

याप्रमाणें मारुतीच्या सत्य व तीक्ष्ण वचनकुठारानें नळाच्या मनांतील अभिमानतरु छेदून पडतांच त्यानें राममुद्रांकित पाषाण लहान, थोर, सम विषम न पाहतांच सागरावर ठेवण्याचा सपाटा चालविला आणि पांच दिवसांत तें सेतूचें काम सुवेळाचलापर्यंत नेऊन

पोंचविलें. तेव्हां वानरांनी रामाजवळ येऊन सांगितलें–प्रभो, नळानें शंभरयोजनें लांब व दहा योजनें रुंद सेतु पूर्ण केला आहे. असें ऐकतांच रामाला अत्यानंद झाला व त्यानें नळाला बोलावून त्याचा गौरव केला आणि सर्वांना "आतां सुवेळाचलावर चलावें" अशी आज्ञा केली. त्या वेळेस सर्व कपि भुभुःकार करीत उठले, त्यामुळें पृथ्वी डळमळूं लागली. देव विमानांत बसून सेतु पहात असतां त्यांना तो शतयोजनें लांबायमान देह धरून भोगेंद्रच पसरला आहे असें वाटलें.

रामाचें प्रचंड कपिसैन्य सेतुपंथानें सुवेळाचलावर जेव्हां निघालें. तेव्हां सेतूच्या कडेनें चालणारे कपि समुद्रांत पडत आणि चक्राकार उडी घेऊन परत सेतूवर येऊन चालूं लागत. राम व लक्ष्मण चरण-चालीच्या इच्छेनें चालूं लागतांच सुग्रीव आणि हनुमंत पुढें येऊन विज्ञापना करूं लागले की, महाराज, आपले चरण जर या शिळांना लागतील, तर कदाचित् सगळ्याच स्त्रिया होऊन वानरांच्या गळीं पडतील; यास्तव कृपा करून आमच्या खांद्यावर बसून चलावें. असें ऐकतांच स्मितवदन करून गरुडावर विष्णु जसा बसतो, तसा राम मारुतीच्या व लक्ष्मण अंगदाच्या खांद्यावर बसून निघाला.

सैन्यासहवर्तमान राम जो सागरतटाक सोडून निघाला होता, तो अर्धप्रहरांत सुवेळाचलावर आला. नंतर वानरांनीं ज्या शुकनामक राक्षसाला बांधून ठेविलें होतें; त्याला रामानें सोडवितांच तो त्याचें चरण वंदून लंकेंत गेला आणि रावणाजवळ रामाचा अद्भुत महिमा सांगूं लागला. सर्व नद्यांसह सागराचें शरण येणें व चमत्कारिक प्रकारानें सेतुबंधनवृत्त ऐकतांच रावण मनांत भय पावला. तरी शुकाला म्हणाला–तुला त्या वानरांनीं बांधून ठेविलें

होतें, ह्मणून भय पावलास आणि त्यांचेंच वर्णन करीत सुटलास, परंतु त्या शत्रूची थोरवी जर मला सांगशील तर मरण पावशील. असें बोलून त्यानें त्या शुकाबरोबर दुसरा सारण नामक असुर दिला आणि दोघांला आज्ञा केली कीं, आतां जाऊन रामसैन्याची गणती करून या. त्यांत मुख्य मुख्य वीर कोण आहेत व कोणाबरोबर किती सैन्य आहे, याविषयीं पूर्ण माहिती काढून आपले प्राण राखून लौकर परत या. असें ऐकतांच दोघे आकाशमार्गानें येऊन रामसैन्यांत उतरले आणि वानरवेष धरून माहिती घेत इतस्ततः संचार करूं लागले.

राम, लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण, इत्यादि सर्व सभा करून बसले होते. त्या ठिकाणीं ते मायावी राक्षस कपिवेषानें जरी उभे राहिले होते, तरी बिभीषणानें ओळखून त्या दोघांलाही धरलें आणि रामाजवळ आणलें. तेव्हां राजाधिराज रामचंद्र हास्यवदन करून ह्मणाला–यांना हातांत धरा आणि आपलें सर्व सैन्य दाखवा. दूत हो, तुह्मींही सर्व वृत्तांत ध्यानांत ठेवून रावणाकडे जा आणि त्याला सांगा बरें. आह्मांला त्याचें मुळींच भय नाहीं. असें ऐकतांच ते दोघेही रामचरणीं लीन होऊन त्याची स्तुति करीत परत लंकेस आले.

नंतर सोळा मजल्यांची उंच गच्ची होती, त्या गच्चीवर चढून रावण त्या हेरांला ह्मणाला–आतां येथून कोणाचें सैन्य किती व कोणत्या ठिकाणीं आहे तें मला दाखवा. असें ऐकतांच ते दोघे सांगू लागले. वानरसेना सागराच्या अगदीं मध्यभागीं. जुत्पति जे हात जोडून उभे आहेत, त्यांच्याही मध्यभागीं तमालनील राम वस्त्राभरणांनीं मंडित होऊन बसलेला दिसत आहे पहा? तो हरिणचर्मावर सुग्रीवाच्या मांडी उशाला घेऊन पडला आहे व कौतुकानें गोष्टी सांगत आहे.

जो लंकानगर जाळून गेला व रामासह परत आला, तो मारु रामाचे चरण चुरीत बसला आहे. तुमचा बंधु बिभीषण रामाच्या अगदीं जवळ बसून त्याच्या कानांत गोष्टी सांगत आहे. सूर्यप्रमा तेजस्वी वीर सौमित्र रामाच्या पाठीमागें उभा आहे. तो अंगद वालि पुत्र आपणांकडे क्रोधानें पहात आहे. त्याच्या पलीकडेच तो सुग्रीव चा सासरा सुषेणवैद्य, त्याजबरोबर वीसकोटी सैन्य आहे. तो जां वंत पहा; त्याजबरोबर बहात्तरकोटि रीस आहेत. तो पलीकडे सेन पति नल, ज्यानें सागरावर अद्भुत सेतु बांधला! ते पर्वताप्रमाणें दे धारी शरभ व ऋषभनामक वानरवीर युद्धसमयाची वाट पहात आहे याप्रमाणें सर्व वानरांच्या खुणा सांगून शेवटीं ते ह्मणाले—महारा यांच्या बरोबर युद्ध करून निभाव लागणार नाहीं असें वाटतें. त रामाची सीता परत देऊन हा युद्धप्रसंग टाळावा. आह्मीं हेर आहे आह्मांला जे दिसेल तें सत्य सांगितलें पाहिजे. अशीं त्यांचीं भाष ऐकतांच रावणाला क्रोध आला व त्यांस तो दाबूं लागला.

इकडे बिभीषणानें रामलक्ष्मणादिकांस गच्चीवर चढून सैन्य पहा असलेला रावण दाखविला. त्याच्या छत्राखालीं सर्व कपिसेना झ कली होती, तरी त्याला पाहतांच सर्व कपि क्रोधाविष्ट झाले. इतक्यां लक्ष्मणानें भात्यांतून अर्धचंद्राकार बाण काढला आणि चापावर लावू असें अचुक संधान मारिलें कीं, त्याबरोबर रावणाच्या मस्तकावरी दाहीं छत्रें आणि किरीट छेदून भूमीवर पाडले. तेव्हां रावण भयभी झाला आणि गच्चीखालीं उतरून गेला. त्या वेळेपासून त्याला अन्न पाणीही गोड वाटेनासें झालें आणि महाचिंता उत्पन्न झाली. य ठिकाणीं रामायणाचें सुंदरकांड समाप्त झालें.

# अध्याय २४ वा.

एकाएकीं छत्रछेद झाल्यामुळें चिंता पावलेला रावण म्लानवदनानें सभेंत आला आणि सर्व प्रधानासहित विचार करीत बसला. तो ह्मणाला—वीरहो, माझ्या अत्युत्कट दोन इच्छा आहेत; त्या कधीं पूर्ण होतील हें कांहीं कळत नाहीं. रामलक्ष्मणांचा वध व्हावा आणि जनकतनया वश व्हावी, याशिवाय माझ्या मनांत दुसरें कांहीं येत नाहीं. असें ऐकतांच वज्रदंष्ट्र ह्मणाला—महाराज, आपण सीतेची इतकी भीड काय ह्मणून धरली आहे ? तिला बळेंच मंदिरांत आणावी आणि आपली इच्छा पूर्ण करून घ्यावी. रावण ह्मणाला—मला तसें करितां येत नाहीं हो ! परस्त्रीवर बलत्कार करशील तर तुझी तनु शतचूर्ण होईल, असा मला विधीचा शाप आहे; त्यामुळें गारुड्यानें ांत पडलेल्या भुजंगासारखा मी दीन झालों आहें. कोणीतरी प्रयत्न रून ती मला वश होय असें वशीकरण योजा. तिचें मन रामा र आहे तें विटलें पाहिजे. असें ऐकतांच विद्युज्जिव्हप्रधान ह्मणा ।—महाराज, मी मायेनें रामाचें शिर आणि कोदंड हुबेहुब उत्पन्न रीन. तें जर सीतेनें पाहिलें तर राम मरण पावला असें मानून दाचित् ती आपणांला वश होण्याचा संभव आहे. असें ऐकतांच वणाला परम संतोष वाटला आणि त्यानें त्या विद्युज्जिव्हाला मा ाचीं वस्त्रें देतांना त्याची अतिशय स्तुति करून सांगितलें कीं, तूं ा कापट्यकर्मांत केवळ बृहस्पति आहेस; यासाठीं त्वरा कर आणि ाप व शिर घेऊन लौकर अशोकवनांत ये. याप्रमाणें सांगून तो याच्या आधीं जानकीला पाहण्याकरितां अशोकवनांत गेला.

राम कपिसैन्यासह सुवेळाचळावर येऊन उतरला हें वर्तमान त्रि-जटेकडून जरी सीतेला समजलें होतें, तरी " कधीं भेट होईल कोण जाणे ! " अशी विवंचना करीत ती अधोवदनानें बसली होती. इत-क्यांत हरीणीपुढें व्याघ्र किंवा कमळणीजवळ जसा वारण येऊन उभा राहतो, तसा रावण जानकीपुढें येऊन उभा राहिला आणि बोलूं लाग-ला--जानकी, त्वां आजपर्यंत जें धैर्य धरिलेंस तें सर्व व्यर्थ गेलें. या-साठीं आतां तूं मलाच वर. माझी पट्टराणी मंदोदरी तुझ्या सेवेला अधीन आणि तुझ्या अनुमतानें मी या लंकेचें राज्य चालवीन. पहा वेळ्सर कर. तुझ्या पतीला मृत्यु आला; तें वर्तमान पहिल्यानें सांग-तों ऐक--सर्व कपिसेना घेऊन काल तो सुवेळाचळावर येऊन राहिला असतां आमचा प्रहस्तप्रधान सैन्य घेऊन रात्रीं तेथें गेला आणि सर्व सैनिकांसह तुझा पति निद्रिस्त असतां त्यानें अकस्मात् घाला घालू-न त्याचा शिरच्छेद केला ! त्याची तशी स्थिति होतांच सौमित्र प्राणधाकानें अयोध्येस पळून गेला. सुग्रीव, अंगद इत्यादिकांचा वध प्रहस्तानेंच केला आणि बाकीचे वानर इतर राक्षसांनीं भक्षण केले. यांच्या जाण्याचा मार्ग जो सेतु तोच आह्मीं पाडून टाकला, मग ते कोठें जाणार ? सर्व बिचारे प्राणाला मुकले ! आतां तुला जर हें खोटें वाटत असेल तर, एकाक्षणांत अनुभवही पाहशील. याप्रमाणें तो म-लीनमति रावण भाषण करीत आहे तों विद्युज्जिव्ह मायेचें शिरकमल आणि चाप घेऊन आला व येतांच त्यानें तें जानकीच्या पुढें ठेविलें आणि चालता झाला.

किरीटकुंडलांनीं मंडित तें कमलाकार वदन, सरळ नासिका, कपाळीं केंशराचें गंध आणि आरक्त रेखांकित आकर्णनयन असें तें

रामवदनाप्रमाणें हुबेहुब मायावी शिर कंठनालासह तुटून रक्तानें माखलेलें दृष्टीस पडतांच अग्नीनें जशी कर्दळी करपून जाते, तशी सीता एकाएकीं करपली आणि प्रथम मूर्च्छित होऊन कांहीं वेळानें शुद्धीवर आल्यानंतर तें शिरकमल हृदयाजवळ धरून अपार शोक करूं लागली. तो शोक कोठवर वर्णन करावा! आपल्या कन्येचे शोकस्वर ऐकून भूमि उकलूं लागली आणि पशुपक्षीही रुदन करूं लागले. सीता शोक करीत असतां ह्मणाली—हे राजीवाक्षा रघुवीरा, हे स्मरारिमित्रा, हे अनंतगुणसंपन्ना, कायरे हें केलेंस! माझ्यासाठीं रात्रंदिवस घोष घेऊन सीतेसीते ह्मणून वृक्षपाषाणादिकांस आलिंगन देऊन अती श्रमलास! वानरसेना घेऊन सागरावर सेतु बांधून सुवेलाचलापर्यंत आलास आणि शेवटीं शत्रूला यश दिलेंस! प्रियकरा, आतां या अनाथ व दीन अबलेनें जगांत जिवंत राहून काय करावें! प्राणनाथ! नकाहो माझा त्याग करून जाऊं! आलें मी. देवा! वाल्मीकऋषीचें भाष्य आज मिथ्या झालें किंवा पतंगांनीं दिव्याला गिळिलें! झाले तरी काय? कांहीं कळत नाहीं. हरहर! सौमित्र बंधु असतां संकटीं साह्य करण्याचें सोडून पळून गेला हें आश्चर्यच आहे. प्राणनाथ! आतां मात्र कैकयीच्या मनासारखें झालें. कौसल्यासासुबाई मात्र हें ऐकतांच प्राणत्याग करतील.

याप्रमाणें अनेक प्रकार आठवून विलाप करीत असतां, ती जानकी शेवटीं रावणाला ह्मणाली—हे दशमुखा, होणारें असतें तें कधींही चुकत नाहीं. मी तुला मिथिलेश्वर जनकाप्रमाणें आपला पिता असें मानून शेवटची एकच विनंती करितें कीं, मला चिता रचवून दे,

करून एवढें माझें माहेर करशील तर आह्मीं उभयतां परलोकीं तुझें कल्याण चिंतीत आनंदानें राहूं. असें सीतेचें भाषण ऐकतांच ही सत्वच्युत होणार नाहीं, असा निश्चितार्थ समजून रावण तेथून चालता झाला. नंतर जानकी पूर्ववत् शोक करीत असतां सरमानामक बिभीषणाची पत्नी गुप्तरूपानें तेथें आली आणि सीतेचें शांतवन करून ह्मणाली–बाई जानकी, ही तुला वश करण्यासाठीं रावणाची कृत्रिम करणी आहे. तूंच जर मुळापासून विचार करशील तर तुला न सांगतां समजण्यासारखें आहे. तुझ्या स्वयंवरसमयीं रावणाच्या उरावर भर्गचाप पडलें होतें तें तुझ्या पतीनें दूर केलें. त्या भर्गचापाहून रामकादंड जड, तें मेल्या प्रहस्तास कसें बरें उचलेल? याप्रमाणें ती सरमा सीतेची समजूत करीत आहे, तों मायावी चाप व शिर तेथून गुप्त झालें. तेव्हां सीतेची त्याबद्दल खात्री होत चालली, इतक्यांत राम सुखी आहे! अशी आकाशांतून देववाणीही झाली. तेव्हां तर सीता अत्यानंदानें राक्षसांच्या कपटकृतींचें आश्चर्य मानीत बसली. तिनें सरमेचेही आभार मानले.

रावण सीतेला शोकांत टाकून जो निघून गेला होता, तो मंदोदरीच्या मंदिरांत जाऊन त्या परम सज्ञान पतिव्रतेला ह्मणाला--हे कल्याणी, तूं अशोकवनांत जाऊन सीतेला बोध करावास आणि ती माझ्या शयनीं वश होईल असा कांहीं उपाय योजावास, अशी माझी इच्छा मी निरुपायास्तव तुला सांगतों, नाहींतर तुझ्या सारख्या मानिनीला हें कृत्य जिवावरचें आहे; हेंही मला कळतें. परंतु काय करावें? ती जर मला वश झाली नाहीं; तर मी जिवंत राहणार नाहीं. याप्रमाणें रावणाचें भाषण ऐकतांच ती लावण्यखाणी मंदोदरी

तेथून उठली व अशोकवनाकडे निघाली. तिच्याही मनांत सीतेच्या दर्शनाची इच्छा फार दिवस उद्भवली होती. ती अनायासें पूर्ण हो- ण्याची वेळ येतांच तिनें साधली.

जानकी व त्रिजटा ह्या दोघी आनंदानें राम व रामसैन्याविषयी गोष्टी करीत बसल्या होत्या, इतक्यांत मयजा त्या ठिकाणीं आली. तेव्हां त्रिजटेनें सीतेला सांगितलें कीं, जानकी, तुझ्या दर्शनासाठीं मंदोदरी आली आहे. असें ऐकतांच जानकी आनंदानें उठून पुढें झाली. इतक्यांत मंदोदरी पुढें येऊन सीतेला नमस्कार करूं लागली; तेव्हां सीतेनें तिला हृदयाजवळ धरून प्रेमालिंगन दिलें. त्या वेळेस त्या दोघी गंगायमुनांप्रमाणें दिसल्या. दोघींनांही अत्यानंद झाला. नंतर मयजा ह्मणाली—बाई जानकी, आज तुझी भेट झाली, त्यामुळें आजचा हा मोठा सुदीन, असें मी समजतें. याप्रमाणें बोलून क्षण- भर स्तब्ध राहिल्यावर मंदोदरी पुनः ह्मणाली–जानकी, तूं सूज्ञ आहेस, तुला मी बोध करावा असें नाहीं; तरी ओठीला आलें, ह्मणून दोन शब्द बोलणें भाग आहे. माझ्या ऐकण्यांत असें आहे कीं, राम पूर्णब्रह्मसनातन असल्याकारणाने सर्वांभूतीं समसमान आहे. जसें–अनेक मातृका जरी आहेत तरी ओंकार एकच; अलंकार जरी अनेक असले तरी सुवर्ण एकच; त्याचप्रमाणें परब्रह्म राम जर सर्वांघटीं भरला आहे, तर व्यर्थ दुराग्रहास पडून रामरावणांत भेद कां मानतेस? याप्रमाणें त्या मयकन्येचें भाषण ऐकतांच सीता हंसून ह्मणाली–बाई दोदरी, तूं ह्मणतेस त्याप्रमाणें चापपाणी सर्वांभूतीं भरलेला असल्या- रणानें अभेदच आहे. जसें घटांत व मठांत आकाश अभेदत्वेंकरून कच भरलें आहे, किंवा अनेक तरंगांत उदक अभेदत्वेंकरून एकच

आहे, तसें दुजेपण कोठेंही नाहीं; मग राम आणि रावण असा द्वैतभाव तरी काय ह्मणून ? जशी स्वप्नांतील संपदा मिथ्या, तसेच राम व रावण मिथ्या. ब्रह्मानंद स्वरूपाचे ठिकाणीं दुजा भास नाहींच; ह्मणून सीता आणि मंदोदरी हाही मिथ्या भास होय. पृथ्वी, आप, तेज, पवन, आकाश आणि त्रिगुण, हेच जर मिथ्या आहेत, तर राम आणि रावण तरी सत्य कसे होतील. आतां उपाधिभेदानें जर भासमान झाले, तर त्याच भेदानें सीता आणि मंदोदरी ह्याही भासल्याच पाहिजेत. निर्विकार जगजेठीच्या ठिकाणीं द्वैतभावाच्या गोष्टी जशा व्यर्थ आहेत तशा रावणाच्या भेटी विषयींच्याही गोष्टी अगदीं व्यर्थ आहेत.

याप्रमाणें जानकीचें भाषण ऐकतांच मयजा पुनः ह्मणाली— अयोध्यानिवासी राम सर्व व्यापक आहे किंवा एकदेशी आहे ? याचें मला निश्चयात्मक स्पष्ट उत्तर दे. असें ऐकतांच सीता ह्मणाली— परब्रह्माच्या ठिकाणीं मुळींच त्रिपुटी विरून गेल्या आहेत. ह्मणजे ज्ञेय, ज्ञाता आणि ज्ञान त्या विचाराचे ठायीं लीन होत आहे. ध्येय कोण? ध्याता कोण ? आणि ध्यान कसें करावें ? याचें भान रहात नाहीं आणि भज्य, भजक व भजन हाही भाव असत नाहीं. कारण जें जें दिसतें तें तें नाश पावणारें असल्यामुळें जेथें एक अभेद शाश्वत आहे, तेथें मयजा व जानकी कोणीकडून दिसतील आणि राम व रावण हे शब्द तरी कसे असतील ? रज्जूचे ठायीं सर्पाचा भास किंवा शिंपींत रुप्याचा चकचकाट ज्ञानेंकरून जसा व्यर्थ आहे, तसा रामही व्यर्थ आणि रावणही व्यर्थ होय. जेथें हा सर्व मायोपाधिक मिथ्या विकार असतां अज्ञानानें सत्य मानला जातो, तेथेंच राम रावणही सत्यत्वें-करून मानले जातात; परंतु अद्वैतदृष्टीनें पाहतां सर्व एकच आहे.

मग तेथें तूं व मी हा भेद कां असावा? जी वस्तु अव्यक्त व अनाम आहे; तिच्याठायीं राम व रावण ह्या व्यक्ति व नामें नाहींतच. हें वर्म ज्याला कळलें तोच प्रत्यक्ष आत्माराम. त्याचे ठिकाणीं समाधि आणि विधान व भाषण आणि मौन हेंही विरून गेलें आहे.

याप्रमाणें जगन्माता सीता भाषण करीत असतां मंदोदरी ब्रह्मानंदांत निमग्न होत्सातीं डोलूं लागली. तिचा हेतु विराला, संवाद खुंटला आणि सर्वत्र एक अभेद ब्रह्मानंद दिसूं लागला. नंतर एकाक्षणानें सावध होऊन तिनें जानकीचे पाय धरिले आणि सद्गदित होऊन ह्मणाली—बाई जनकराजतनये, आज तूं आपल्या अपूर्वज्ञानानें माझा सर्व संशय दूर केलास! सत्संगाशिवाय आत्मविचार होत नाहीं व सारासार कळत नाहीं. आतां मजवर लोभ ठेव आणि मला जाण्यासाठीं निरोप दे. असें ऐकतांच जानकीनें तिला प्रेमालिंगन दिलें आणि भाते कधीं वेळ सांपडेल तेव्हां येऊन भेटत जा, असें सांगितलें. नंतर पुनः पुनः नमन करून मंदोदरी तेथून निघून गेली.

रावण तिची वाट पाहतच बसला होता. तिनें सदनांत पाय ठेवितांच "काय झालें प्रिये!" असा रावणानें प्रश्न केला. तेव्हां मंदोदरी ह्मणाली—प्राणनाथ, तप्तलोहावर पडलेलें उदक कदाचित् पुन्हां हातीं येईल, पण जानकी कांहीं तुह्मांला वश होणार नाहीं. ज्या गोष्टीनें अनर्थासह कुलाचा घात होण्याचा संभव आहे, त्या गोष्टींत पंडित कधींही मन घालीत नाहींत. हातांतील सुवर्ण टाकून मुद्दाम शेण कां घ्यावें! शर्करा पलीकडे लोटून तोंडांत बळेंच कोणी तरी राख घालील काय? राम पूर्णब्रह्मसनातन महाविष्णु अवतरला आहे, ह्मणून त्याची चिच्छक्ती जी जनकतनया, ती त्याला अर्पण करून शरण गेल्यांत खरोखर

कल्याण आहे. आपला अविवेक पाहतांच आपला बंधु बिभीषण रामाला शरण गेला आणि त्यानें आपलें जन्ममरण चुकविलें. आपण कांहींतरी विचार करायचा होता. जो पूर्ण प्रतापी रघुनंदन, ज्यानें उदकावर पाषाण तारले, त्याचा पराक्रम आपण जाणत असतांही त्याच्याशीं द्वेषबुद्धि धरली आहे, याचें कारण तरी काय असावें ?

याप्रमाणें अनेक शब्दसुमनांनीं मयजेनें रावणाची पूजा करितांच तो आनंदित होऊन ह्मणाला—हे मयकन्यके, तुझीं भाषणें मला मान्य आहेत, परंतु जगांत पुरुषार्थ टाकणाऱ्याचें जिणें व्यर्थ, हें तूं जाणत नाहींस ! बिभीषण चिरंजीव झाला ह्मणतेस तो प्रळयीं तरी मरण पावणारच आहेना ! यांत त्यानें विनाकारण देहाचा लोभ धरून आपलें सार्थक करून घेतलें नाहीं असें नाहींका होत ! कल्पपर्यंत जिवंत राहणें ह्मणजे शरीररूपी बंदिखान्यांत वास्तव्य करणें होय. तर हे कल्याणी, या पुरुषार्थाला जगांत कोण बरें मान देईल ? तो राम आदिपुरुष आहे, हें मी जाणतों. तरी ज्यापेक्षां युद्धकामुक होत्साता तो सागर उतरून आला आहे, त्यापेक्षां मी सीता परत न देतां त्याची युद्धकामना तृप्त करीन; त्याला आपला पुरुषार्थ दाखवीन आणि जिंकीन; समजलीस ! तूं काळजी करूं नको. असें ऐकतांच मंदोदरी चिंताक्रांत व विमनस्क होऊन परम क्लेश मानीत आपल्या मंदिरांत निघून गेली.

नंतर जसा कृष्णवर्णमेघ पर्वतशिखरावर येतो, तसा रावण गोपुरावर चढून पुनः रामसैन्य पाहूं लागला असतां, बिभीषणानें रामाला सांगितलें—प्रभो, रावण आपल्या गोपुरावर चढून आपलें सैन्य पहात आहे.

असें ऐकतांच सर्वांनुमतें राम सुवेलाचलाच्या शिखरावर जाऊन लंकानगरी अवलोकन करूं लागला; इतक्यांत कोणास न सांगतां सुग्रीव जो उडाला तो अत्यंत आवेशानें येऊन रावणाच्या उरावर आदळला ! त्यानें उजव्या हाताच्या चापटीनें रावणाच्या शिरावरील दाही छत्रें आणि डाव्या हातानें दाही मुगुट खालीं पाडले. लागलीच एक लाथ मारली आणि चपलतेनें असा एक मुष्टिघात केला कीं, त्या मुळें रावण अगदीं घाबरून गेला, तरी दोघांचें मल्लयुद्ध त्याच ठिकाणीं एक घटकाभर चाललें होतें. तों रावणाच्या मनांत आलें कीं, वालीप्रमाणें हाही मला कदाचित् रामाकडे धरून नेईल ! तो पळण्यासाठीं मार्ग पाहूं लागला, पण तोही त्याला दिसेना ! तेव्हां त्या गोपुरावरून तो रावण सुग्रीवाला उरावर घेऊन एकदम खालीं कोसळला. त्या वेळीं सगळें लंकानगर गजबजून गेलें ! कोणी ह्मणत कीं, हा मारुती पुनः लंका जाळण्यासाठीं आला ! कोणी ह्मणत आज हा वानर लंका समुद्रांत पालथी घालणार ! असो. खालीं पडतांच सुग्रीवाला चुकवून रावण पळून जातांच कपिपति सुग्रीवही उड्डाण करून सुवेलागिरीवर आला. तेव्हां सर्व कपींनीं जयजयकार केला आणि रामानें त्याला हृदयाजवळ धरून सांगितलें—सुग्रीवा, आज तूं हें काय बरें विपरीत आचरण केलेंस ? सर्व दळभार जवळ असतां नृपतीनें पुढें उडी घालण्याचेंसाहस करूं नये. आज पूर्वदैवानें व आमच्या भाग्यानें तुला जय आला व पुनः परत येऊन तूं आह्मांला भेटलास ! याप्रमाणें राम बोलत आहे, तों वानरांनीं अनेक वनपुष्पें आणून सुग्रीवाची पूजा केली आणि मग सर्वांसह राम पर्वताखालीं उतरला.

नंतर सकलजुत्पतींसह रघुनंदन राम सभा करून बसला असतां,

सुग्रीव आणि बिभीषण रामाच्या अगदीं जवळ बसले; तेव्हां राम राजनीतीला अनुसरून विचार करण्यासाठीं ह्मणाला–मित्रहो, आतां कांहीं रावण युद्ध केल्याशिवाय सीतेला परत देत नाहीं; हें सिद्ध झालें. तर पुढें काय विचार करावा ? बिभीषण ह्मणाला–प्रभो, राजनीति अशी आहे कीं, साम, दाम, दंड आणि भेद यांची समयानुसार योजना करून शत्रूला वश करावें. आपला हात पाषाणाखालीं सांपडला आहे, तो युक्तीनेंच काढून घेतला पाहिजे. यासाठीं माझें मत असें आहे कीं, पहिल्यानें कोणी सज्ञान, जाणता व चतुर बोलका पाहून रावणाकडे शिष्टाई करण्यासाठीं पाठवावा. जो सभेंत जाऊन बसतांच बृहस्पतीप्रमाणें प्रवीण दिसेल, ज्याला सरस्वती प्रसन्न असून जो समयोचित भाषण करणारा असेल, जो वेद, शास्त्र आणि पुराण यांच्या प्रमाणांसह भाषण करण्यास शक्य, धैर्यवान्, निर्भीड आणि निष्कपट असेल, तोच शिष्टाई करण्यास योग्य होईल. यासाठीं या रीस आणि वानरांतून शिष्टाई करण्यास योग्य असा पुरुष आपण व किष्किंधापतीनें निवडून काढावा व त्याला रावणाकडे पाठवून शिष्टाई करवावी.

याप्रमाणें बिभीषणाचें भाषण ऐकतांच रामाला परम संतोष झाला. नंतर अनंत रत्नराशींतून जसें दिव्यरत्न निवडून काढावें, तसा बिभीषणादि सर्वांनीं अंगद निवडून काढला. तेव्हां तो वालीपुत्र रामापुढें हात जोडून उभा राहिला आणि ह्मणाला–हे जगद्वंद्या रामचंद्रा, तुझ्या चरणकृपेंकरून मला कोणाचेंही भय नाहीं. जी आज्ञा करशील, ती शिरसावंद्य आहे. हे अज अजित आत्मारामा, आज्ञा कर. रावणकुंभकर्ण या ठिकाणीं बांधून आणतों, किंवा आज्ञा असेल तर ही लंकानगरी उचलून पालथी घालतों. याप्रमाणें अंगदाचें भाषण ऐ-

कतांच परमानंद पावलेला तमालनील राम ह्मणाला—ज्या पुण्यशील वालीनें रावणाला कक्षेंत घेऊन चतुःसमुद्राचें स्नान केलें, त्याचा तूं महाबलवान् पुत्र अगाध पराक्रमी आहेस, तरी या वेळेस लंकेंत जाऊन रावणाजवळ सामोपचारास्तव शिष्टाई कर. त्याला माझा निरोप सांग कीं, मी आश्रमांत नसतां त्वां चोराप्रमाणें येऊन जानकीचिद्रत्न हरण केलेंस, तरी एकवेळ मीं क्षमा केली आहे. त्या जानकीला परत आणून दे. सीता जर परत पाठविशील तर पुत्रपौत्रांसह या लंकानगरीचें राज्य चिरकाल करशील, परंतु गर्वोन्मत्त होऊन जर युद्धेच्छा धारण करून तिला अशोकवनांतच ठेवशील, तर तुझ्या मातेला दुःख देण्यासाठीं तुझ्या सर्व कुळाचा क्षय करण्यास मला वेळ लागणार नाहीं.

असें ऐकतांच रामाज्ञा घेऊन अंगद जो गगनपंथेंकरून उडाला, तो रावणाच्या सभेंत वानररूपानें आदित्य उतरल्याप्रमाणें येऊन उभा राहिला. त्याला पाहतांच सर्व राक्षसवीर दचकले आणि जागच्याजागीं शस्त्रास्त्रें सांवरून बसले. ते मनांत ह्मणूं लागले—पूर्वी एकच वानर आला होता, तो लंकानगर जाळून गेला. सुग्रीव एकटाच आला होता, तो रावणाचीं छत्रें पाडून गेला. त्याचप्रमाणें हा एकटाच निर्भय व निःशंक सभेंत येऊन उभा राहिला आहे. हा काय करील कांहीं कळत नाहीं.

असो. वालीपुत्र अंगद चोंहोंकडे न्याहाळून पाहून ह्मणाला—परस्थळाहून जो कोणी सभेंत आला, त्याला जर सभाजन न विचारतील, तर त्यानें ते सर्व महामूर्ख आहेत असें जाणावें. सृगालसभेंत पंचानन येतांच ते सर्व जसे गर्भगलित होतात, तसे तुह्मीं मला दिसत आहां.

तरी तुह्मांला सांगतों–व्यर्थ भीति धारण करूं नका. मी ज्या कार्या-साठीं आलों आहें, तें कार्य करून परत जाईन. असें बोलून तो सभास्तंभ पाठीशीं घेऊन रावणापेक्षां उंच पुच्छासन करून त्यावर बसला आणि ह्मणाला–हे गर्विष्ठा दशानना, मी कोण व कोणत्या कारणास्तव या ठिकाणीं आलों आहें, हें कां विचारीत नाहींस? तुझ्या मतीला असा भ्रम कशानें झाला? चिंता नाहीं. तुझी वाचा बसली, अथवा तुला भय वाटलें, असें मानून मीच सांगतों–श्रवण कर. मी शक्रात्मज वालीचा पुत्र व अयोध्याधीश रामाचा दूत आहें. या ठिकाणीं तुझ्याजवळ शिष्टाई करण्यासाठीं प्राप्त झालों आहें.

---

# अध्याय २५ वा.

अगंद ह्मणतो—रावणा, नरदेहास येऊन प्राण्यानें जगत्रयांत सत्कीर्ति राहील असें वागावें. आपल्या मागें जनांकडून बहुत दिवसपर्यंत धन्य होता, असे ह्मणवावें. विवेकानें दुर्बुद्धीचा त्याग करून सद्वासना धरावी. सत्संगतीनें असून त्यांचीं वचनें अंगिकारावीं. कोणाची हेलना करूं- नये. दुष्टवचन बोलूंनये. दुसऱ्याचे गुण पाहून उपकार करीत असावे. कामक्रोधादि शत्रु दूर करावे. हें शरीर नाशवान् जाणून सारासार वि- चार करीत असावें. वेदवचनांप्रमाणें सर्व सत्कर्में करावीं; पण मी कर्ता असा अभिमान कधींही धरूं नये. जसें कमलपत्र सदोदित जलावर राहून भिजत नाहीं, तशी पवित्र कर्में करूनही त्यांत लिप्त होऊं नये. मनोजय करून मति भगवद्भजनीं योजावी. हा जगदाभास मिथ्या मा- नून आत्मस्वरूपीं रत व्हावें. परधन व परदारेंचे ठायीं कधींही मन घालूं नये. शमदमादि साधनें साधून असावें. भक्ति, वैराग्य आणि ज्ञान व आनंद, सद्विद्या आणि समाधान केवळ आत्मप्राप्तीस्तव सन्निध असूं द्यावीं. दैवेंकरून अपार विद्या आणि भाग्य आलें तरी तिलमात्रही गर्व धरूं नये. त्याचप्रमाणें कालगतीनें दरिद्र आलें तरी धीर सोडूंनये. हे दशकंठा, यासाठीं माझे शब्द ऐकून तूं दाशरथी रामाजवळ सख्य कर. तो राम शुद्धांतःकरणाचा असल्यामुळें दुसऱ्याचे दोष लौकर विसरतो. जो अनंतगुणनिधान पराचे किंचित् गुण ऐकले तरी वाखाणतो. जो एक बाणी, एक वचनी व एकपत्नी व्रती राम त्याला जनकतनया अर्पण करून तूं या लंकेचें अक्षय राज्य कर. तूं ज्याची आराधना करतोस, तो शिव अहोरात्र रामस्मरण करीत असतो. त्या रामाजवळ वैर करशील

तर तूं स्वामिद्रोही होशील. सनक, सनंदन, सनत्कुमार, मुख्य विं चि, पुरंदर हे सर्व रामाचे आज्ञाधारक आहेत. त्यांजपाशीं वैर करशील त तुझें कधींही कल्याण होणार नाहीं. शतकोटि अपराध करणारा जर श रण आला, तर रामचंद्र त्यावर सर्वांहून अधिक प्रीति करितो. तूं परम सज्ञान वेदवेदांगें जाणता असून असें अज्ञान कां स्वीकारिलें आहेस आतां जनकजा आपली तनया मानून त्या विषकंठमित्राला अर्पण कर ह्मणजे तो तुजवर पूर्ण प्रीति ठेवून तुला निर्भय करील.

याप्रमाणें अंगदाचें भाषण ऐकतांच घृतसिंचित वैश्वानर जसा प्रदी होतो तसा रावण कोपायमान् होत्साता त्याचें वर्म पाहून त्याला ह णाला—अरे पालाखाणाऱ्या माकडा, तूं शिष्टाई करणारा कोण? हें अ धीं मला सांग. तुझा पिता कोण? असें ऐकतांच अंगद ह्मणाला—ज्या तुला कक्षेंत घेऊन चतुःसमुद्रांचें स्नान केलें तो वाली माझा जनक होय अरे दुर्जना, पामरा रावणा, बाळपणीं मी तुझ्या मिशा व दाढ्या आप ल्या मूत्रोदकानें भिजविल्या आहेत; हे तुला स्मरत नाहीं काय? तुझ्या पित्यानें माझ्या पित्याकडे येऊन तुजबद्दल जेव्हां भिक्षा मागितली; तेव्हां माझ्या पित्यानें तुझें पांच पाट काढून तुला लंकेंत भिकावून दिलें तें विसरलास? अधमाधमा, मी वालीचा पुत्र अंगद सांप्रत तुला बोध करण्यासाठीं अयोध्याधीश रामचंद्राकडून आलों आहें. ज्यानें ताटिके- सह सुबाहूचा वध करून सीतास्वयंवरसमयीं तुझ्या उरावर पडलेलें भर्ग- चाप काढलें, ज्यानें तुझी बहीण निर्नासिका करून खरदूषणादि असंख्य रजनीचरांचा संहार केला; त्या रामपंचाननाची वस्तु तूं जंबूक आहेस तरी चोरून आणलीस; ह्मणून तुझा चोराचा शोध करीत तो सुवेळेपर्यंत आला आहे. तर तूं आपल्या आयुष्याची सीमा झाली असेंच मान. अ-

थवा जानकी बरोबर घेऊन त्याला शरण जा आणि सुखानें चिर-काळ नांद.

याप्रमाणें अंगदाचें भाषण ऐकतांच पुच्छावर पाय पडलेला सर्प जसा खवळतो, तसा रावण खवळला आणि बोलूं लागला—हे मर्कटा, मी कुंभकर्णाला सांगून सहसैन्य रामलक्ष्मणांस एका क्षणांत गिळून टा-कीन. सुरांसह इंद्रास बांधून बंदींत घालण्यास ज्याला वेळ लागला नाहीं, तो रामलक्ष्मणांची काय पर्वा करणार आहे! अरे त्या मानवांस तर मी जिवंत धरून आणवीन. गरुडानें सर्पमस्तकींचा मणि हरण केला असल्यास तो परत देईल, परंतु मी जानकी परत देणार नाहीं. या महासमर्थ रावणाजवळ नरवानरांची तर मुळीं गणनाच नाहीं. मागें एक तुझ्या सारखाच वानर चोरून लंकेंत आला होता, त्यानें अशोक-वन उपटतांच आम्हीं त्याला सभेंत धरून आणलें व पुच्छाला अग्नि ला-वून सोडलें. त्यावेळेस तो लंका जाळून पळाला आहे; पण आतां जर तो दृष्टीस पडेल, तर आधीं त्याचा वध करीन. असें ऐकतांच अंगद ह्मणा-ला—मूर्खा राक्षसाधमा, तुझ्या असंख्य सैन्याचा संहार करून तुझे सात पुत्र त्यानें मारले व इंद्रजिताला नग्न करून विवरांत कोंडून ठेवलें, त्या वेळेस तुझा पराक्रम कोठें गेला होतारे? मलीना, तोच वातात्मज पुनः तुला शिक्षा करण्यासाठीं आला आहे. जो त्रिभुवनपति सीतावल्लभ राम त्याला मानव मानणारा तूं महामूर्ख आहेस. तूं शिववरानें प्रमत्त झालेला बस्त आहेस. त्या सीतादेवीनिमित्त तुझा बळी पडणार! रावणा, एक त्या रणयज्ञाला आरंभ झाला, ह्मणजे त्यांत असंख्य राक्षसांच्या ती पडतील व तो यज्ञकर्ता आणि भोक्ता राम शेवटीं तुझी पूर्णाहु-ईल. जसा खरपृष्ठीवर चंदन केवळ त्याला भारमात्र; तसें तुझें वेदा-

ध्ययन फुकट गेलें. षड्रसांत जरी दर्वी फिरविली तरी त्यांचा तिला गंधही लागत नाहीं, तसें तुझें ज्ञान व्यर्थ गेलेलें आहे. मूर्ख निशाचरच तूं. तुझा वध करण्यासाठीं रणरंगधीर रामचंद्र येऊन उभा आहे सावध रहा.

याप्रमाणें अंगदाचे तीक्ष्ण शब्दबाण ऐकतांच रावण हृदयांत खोंचला आणि क्रोधानें संतप्त होत्साता बोलूं लागला—अरे वनचरा मर्कटा, तूं केवळ भूमार आहेस असें मला वाटतें. तुझ्या पित्याचा वध करून तुझी माता तारा रामानें सुग्रीवाला दिली. तुझ्याच्यानें पितृसूड घेववत नाहीं. क्रूर समुद्रोदकांत प्राण दे, अथवा माझ्यापाठीशीं ये; मी तुला आश्रय देतों. सुग्रीवाचा वध करून तुला किष्किंधेचें राज्य देतों. तुझी माता व्यभिचारिणी आहे, तिनें पति मरतांच सुग्रीवाला वरलें; याची तुला मुळींच लाज वाटत नाहीं ? अरे सुग्रीव आणि राम हे तर तुझे मुख्य शत्रु; असें असतां मूढा, तूं त्यांच्याच पक्षांत आनंदानें राहून मजपाशीं शिष्टाई करण्यास आलास, या गोष्टीची तुला शंका कशी वाटत नाहीं ! असें ऐकतांच अंगद ह्मणाला—अरे मूर्खा, माझा पिता वाली रामबाणानें मुक्त होत्साता सायुज्यसदनीं जाऊन पोंचला आहे. आतां तुला मात्र माझ्या हातून शिक्षा भोगण्याची वेळ आली आहे. मी आपल्या पाणिप्रहारेंकरून तुझीं दहाही मस्तकें छेदून टाकीन. तुझाही सर्व पुरुषार्थ मला माहीत आहे. सहस्रार्जुनाच्या व बळीच्या बंदींत पडून दासींच्या हातानें विटंबना करून घेणारा जो तूं त्या तुला जनांत तोंड दाखववयाला लाज कशी वाटत नाहीं ? तूं फार निर्लज्ज ह्मणूनच तुला पुरती शिक्षा करण्यासाठीं राम सिद्ध होऊन आला आहे.

याप्रमाणें अंगद बोलत असतां रावण अत्यंत कोपाविष्ट होत्साता

सेवकांस ह्मणाला—या मर्कटाला धरून बांधून ठेवारे ? असें बोलून त्यानें विद्युत्प्राय सतेज शस्त्र काढितांच चौघां राक्षसांनीं धांवून जाऊन अंगदाला धरलें; परंतु त्या वेळेस त्या वालिपुत्रानें आपला अद्भुत पराक्रम प्रगट केला. त्यानें कृतांताप्रमाणें भयंकर आरोळी दिली आणि रावणाच्या वक्षस्थलावर पुच्छाचा सपाटा मारून त्याच्या दाही मस्तकांवरील मुगुट उलथून पाडले. नंतर त्यानें जें उड्डाण केलें, त्याबरोबर रावणाचा चौदागांवें विस्तीर्ण सभा-मंडप उचलला आणि अंगाला झोंवलेल्या चौघां राक्षसांसह सुवेला-चलाचा पंथ लक्षून आकाशमार्गानें निघाला. तो अंतरिक्षांतून चालूं होतांच त्याला धरून राहिलेल्या चौघां राक्षसांचे जीव गेले आणि ते प्रेतस्थिति अवलंबनकरून लोंबत राहिले. अंगद मंडप घेऊन येत असलेला कपींनीं ओळखतांच आनंदानें भुभुःकार केला. इतक्यांत तो खालीं उतरला व मंडप भुईवर ठेवून दंडाचीं प्रेतें सोडवून रामचरणीं लीन झाला. त्याला पहातांच रामालाही अत्यानंद झाला. नंतर अंगदानें रावणाचा किरीट आणला होता, तो रामापुढें ठेवला. तो रामानें बिभीषणाच्या मस्तकीं घातला. इतकें झाल्यावर राम अंगदास ह्मणाला—तूं रावणाचा सभामंडप उचलून आणलास, पण पुढें आपला बिभीषण सभा करून कोठें बसेल ? असें ऐकतांच अंगदानें तो भव्यमंडप पुनः उचलला आणि जागच्या जागीं नेऊन ठेवला. त्यावेळेस राक्षसही त्याच्या अतुल पराक्रमाबद्दल चकित झाले. नंतर तो अंगद परत येऊन रामाला लंकेंतील वर्तमान सांगूं लागला—

हे प्रभो दाशरथे रामचंद्रा, तुझ्या आज्ञेप्रमाणें तेथें जाऊन मी

अनेक प्रकारें त्या दशकंठाला बोध केला; परंतु तो दुरात्मा कोणतीही गोष्ट मान्य करीत नाहीं. गिरिमस्तकावर कितीही वर्षाव झाला तरी तेथें जसें उदक रहात नाहीं, किंवा प्रेताला अलंकार घातलेले जसे व्यर्थ होतात; तसा त्या दशकंठाला केलेला बोध अगदीं व्यर्थ गेला. यावरून मला असें वाटतें कीं, जोंपर्यंत चंद्रसूर्य आहेत, तोंपर्यंत लंकेचा राजा बिभीषण असें जें आपलें वचन गेलें आहे, तेंच सत्य होणार यांत संशय नाहीं. तो साफ असें सांगतो कीं, मी युद्ध केल्यावांचून कदापि सीतेला परत देणार नाहीं. असें ऐकतांच रामचंद्र चंडदोर्दंड पिटून क्रोधानें उभा राहिला. जसा निशांतीं वासरमणि उदय पावतो, तशी रामानें कोदंडाची गवसणी काढली. एक क्षण लागला नाहीं तों त्यानें चापाला गुण चढविला आणि तें कर्णांपर्यंत आढतांच सप्तमहाद्वीपें दणाणून गेलीं. काळाचेही मनांत दचका बसला. सुग्रीवानें हाक देतांच अठरापद्में वानर गर्जना करीत उठले. बहात्तरकोटी रीस गर्जना करूं लागतांच पृथ्वी डळमळूं लागली व दिग्गजांचे कानठाळे बसले. कपि व रीस यांनीं एकदम शब्द करितांच निर्जर दचकले आणि धुळीनें आकाश भरून गेलें.

पहिल्यानें वीसकोटि वानर बरोबर घेऊन गर्जना करीत सुषेण लंकेवर धांवून गेला. मारुती भुभुःकार करीत निघाला. सर्व वानरांसह सेनापति नीळ धांवूं लागला, तेव्हां भूमंडळ डळमळूं लागलें. एकच हाहाःकार झाला. लंका नगर गजबजून राहिलें आणि समुद्र मर्यादा सोडून पृथ्वी बुडवूं लागला. नक्षत्रें रिचवूं लागलीं आणि लंकेंतील प्रत्येक जीव प्रळयकाळ मानूं लागला.

मेरूपर्वताप्रमाणें लंकादुर्गावरील बुरुजांवरून विद्युल्लतेप्रमाणें

नमशस्त्रें झळकूं लागलीं, तरी प्रतापशूर वानर राक्षसांचे केश धरून त्यांना दुर्गावरून खालीं ओढूं लागले. उल्हाटयंत्रांचा भडिमार सुरू झाला. भिंडीमाला, तोमर इत्यादि शस्त्रें राक्षस दुर्गावर उभे राहून भिर्कावून देऊं लागले. कोट्यावधि वानर एकदम अनंत पर्वतांच्या पंक्ति दुर्गस्थ राक्षसांवर टाकूं लागले; त्यामुळें यंत्रांसह राक्षसांचा चुराडा उडूं लागला. असुरांच्या प्रेतांनीं दुर्गपरिघ बुजून गेला. वानर आपलीं पुच्छें दुर्गावर सोडून राक्षसांस ओढून खंदकांत पाडूं लागले कोणी राक्षसांस धरून गरगर फिरवून आपटूं लागले. कोणी राक्षसांचीं पोटें फोडूं लागले. कोणी कर, चरण, नासिक तोडूं लागले. कोणी राक्षसांचीं प्रेतें लंकेंत भिर्कावून देऊं लागले. असंख्य राक्षसांचा संहार होत असल्याची वदंता ऐकून रावण गोपुरावर चढला आणि पाहूं लागला, तों सर्व दिशा आणि अंबर वानरमय दिसूं लागलें. तेव्हां अपल्या सैनिकांस तो दशकंठ आज्ञा करूं लागला कीं, पहातां काय ? उठा. असंख्य दळभार सिद्ध करून लंकेच्या बाहेर निघा. असें ऐकतांच असंख्य सेनापति चतुरंग दळभार घेऊन लंकेबाहेर निघाले. ज्यांचीं पर्वताकार शरीरें, विशाळ दाढा, भयंकर दंत, कपाळीं शेंदुर लावलेला, भयंकर बाबरझोटी माकळ्या सुटलेल्या, खंदिरांगाराप्रमाणें नेत्र, मद्यपी आणि उन्मत्त असे असंख्य रजनीचर लंकेबाहेर निघतांच शूळ, तोमर, गदा, परीघ इत्यादि आयुधांचा जलधाराप्रमाणें वर्षाव करूं लागले. सगळे एकदांच हांका देऊं लागले, त्यामुळें ब्रह्मांड दणाणून गेलें. देवहो, तुमच्या रामासह मर्कटसेना गिळून टाकलीं; पहा रे ? असें ह्मणत भयंकर पायदळामागें अश्वांवर बसलेले राऊत निघाले. त्यांच्यामागून पर्वताकार गज डोलत चालूं लागले.

घोडेस्वार असि, लत्ता व गजावर असणारे शूळ घेऊन बसले होते. सर्वांनीं देवांच्या प्रतिमा करून पायांत ब्रिदें बांधलीं होतीं. सर्व राक्षसवीर सिंहनादानें आकाश गाजवूं लागले. गजांच्या मागून कित्येक पराक्रमी असुर रथांत बसून धांवूं लागले. भयंकर संग्रामभेरी दणकूं लागल्या.

याप्रमाणें राक्षसदळभार सिद्ध होऊन लंकेच्या बाहेर निघतांच जययशस्वीरघुवीर ' ह्मणून वानर वृक्षपाषाणांचा वर्षाव करून राक्षसांचा चुराडा उडवूं लागले. राक्षसही उठाव धरून कोट्यावधि वानरांचीं शिरकमळें आकाशांत उडवून देऊं लागले. इक्षुदंडाच्या खंडांप्रमाणें करचरणांचीं खंडें होऊन वळवळत पडूं लागलीं. राक्षस ढालीआड लपून भाले व बर्च्या खोंचूं लागले व जागोजाग वानरांचा पाडाव करूं लागले. त्याचप्रमाणें वानरही राक्षसांचीं काळिजें नखांनीं ओरबाडून घेऊं लागले. तेथें अगणित प्रेतें पडूं लागलीं, त्यांची कोणालाही गणती होईना. रणांत भय पावलेल्यांस तुटलेलीं शिरें उर्ध्वपंथें जातांना गदगदां हसून आह्मीं 'मोक्षगति पावलों' असें ह्मणत परत सीतापतीला पाहण्यासाठीं भूमीवर येऊं लागलीं. समरंगभूमींत पायदळांचीं धडें नाचूं लागतांच सबळ गजभार पुढें लोटला! तों वानर त्या गजांचे दांत उपटून वर बसलेल्या वीरांला झोडूं लागले. हत्तींच्या शेंपट्या धरून गरगर फिरवून त्यांना आकाशांत उडवून देऊं लागले. त्याचप्रमाणें वृक्षमंडितपर्वत रथांवर टाकून त्यांचा चूर उडवूं लागले. कोणी घोड्यांचे पाय धरून त्याला स्वारांसह आपटूं लागले. कोणी याप्रमाणें अहोरात्र तीन दिवस युद्ध होऊन राक्षसांचा मोड होण्याचें चिन्ह उघड दिसूं लागलें. तेव्हां धूम्राक्षनामक राक्षस रथांत बसून बाणांचा वर्षाव करित पुढें आला व त्यानें आपल्या प्रखर बाणांनीं लक्षावधि वानरांचीं शिरें

उडविली. त्या धूम्राक्षानें असंख्य वानरवीर पाडतांच कपींच्या पराजयाचें लक्षण दिसलें.

तेव्हां रुद्रावतार मारुती त्या धूम्राक्षावर एक विशाळ पर्वत घेऊन धांवला. त्यानें हातांतील पर्वत रथावर टाकतांच अश्वसारथ्यासह रथाचें चूर्ण झालें; परंतु चपल धूम्राक्ष बाजूला उडाला आणि शूळ घेऊन मारुतीवर आला; पण त्याला पाहतांच मारुतीनें एक सबळ मुष्टिघात करून त्याचा चुराडा उडविला. त्याची तशी स्थिति होत आहे, तों असंख्यात वानरांनीं बळ धरून सर्व राक्षसांचें मर्दन मांडलें. धूम्राक्ष पडतांच जेव्हां राक्षसांचा पूर्ण नाश झाला, तेव्हां तें वर्तमान घायाळ राक्षसांनीं लंकेंत जाऊन रावणाला कळविलें.

नंतर चिंतेंत पडलेल्या रावणानें पुनः सैन्य सिद्ध करून वज्रदंष्ट्र नामक असुराला पाठविलें. तो वायुवेगानें वानरसेनेंत येऊन मिसळला आणि युद्ध करूं लागला. त्याला पाहतांच एक शतशृंगांचा पर्वत घेऊन अंगद वीर धांवला व तो पर्वत त्यानें वज्रदंष्ट्रावर टाकतांच त्यानें बाण सोडून त्या पर्वताचें पीठ केलें. इतक्यांत त्या तारापुत्रानें एक महावृक्ष उपटून त्यानेंच त्या वज्रदंष्ट्राला झोडून त्याचा प्राण घेतला. इतक्यांत अकंपननामक राक्षस दळासह रणांत आला आणि बाणवर्षाव करूं लागला; पण त्याचा मारुतीनें प्राण घेतला आणि इतर कपींनीं सर्व राक्षस छिन्नविच्छिन्न करून रणांतून पळविले. अवशिष्ट राक्षससैन्य विटंबना पावलेलें शंख करीत लंकेंत प्रवेश करितांच रावण फार चिंताक्रांत झाला. तेव्हां त्याचा ज्येष्ठपुत्र इंद्रजीत ह्मणाला—ताता, आपण चिंता करूं नये. आज आपले शत्रु समरभूमीवर निजवीन; तरच आपला पुत्र इंद्रजीत ! असें बोलून त्यानें

सैन्य सिद्ध केलें आणि येऊन रणमंडळ गांठलें. त्याचा असंभाव्य सेनासागर पाहतांच वानरवीरही चौताळले.

पहिल्यानें वानर व राक्षस एकमेकांत मिसळून एकमेकांचा संहार करूं लागले; पण त्या कपींचा उत्कर्ष पाहून इंद्रजितानें आपला रथ लोटला, त्याच्यावर वालीपुत्र अंगद पर्वत घेऊन धांवला. जंबुमाळी पुढें येतांच मारुती त्याजबरोबर भांडूं लागला. विद्युन्माळ्याबरोबर सुषेण झगटला. जंघनामक प्रबळ राक्षसाला नळानें गांठलें. वानर व राक्षसांचीं प्रेतें जागोजागीं पडूं लागलीं, इतक्यांत हनुमंतानें जंबुमाळी पायांखालीं चुरून मारिला. विद्युन्माळ्याला सुषेणानें आपटून मारलें. नळानें जंघाला यमलोकीं पोंचविलें, इतक्यांत सूर्य अस्तास गेला आणि परस्पर एकमेकांस विचारून अंधारांतही वीर एकमेकांचें वर्म लक्षून प्रहार करूं लागले. त्या रात्रींत असंख्यात राक्षसांचा संहार झाला आणि सूर्योदयीं राक्षसवीरांचा पराभव होतो, असा रंग दिसूं लागला, तेव्हां इंद्रजीत रथासह सैन्यांतून जो उडाला तो मेघमंडळा आड जाऊन लपला आणि तेथून सर्पबाण सोडूं लागला, ते बाण सुटतांच सर्परूपानें कपींच्या अंगांत संचार करूं लागले, त्यामुळें कपि विकळ होत्साते आरंबळत पडून लोळूं लागले, तों इंद्रजीत रामलक्ष्मणांवरही सर्पबाण सोडूं लागला, तेव्हां रामही तटस्थ होत्साता संधानकर्ता कोण ह्मणून चोंहोंकडे पाहूं लागला. याप्रमाणें महत्संकट उत्पन्न होतांच कित्येक वानर उर्ध्व उडून शरसंधानकर्त्याचा शोध करूं लागले; पण कांहीं ठिकाण लागेना. वानर परत आले व रामलक्ष्मणांला खडतर बाण लागल्यामुळें ते दोघेही मूर्च्छित होऊन जमिनीवर पडले. तेव्हां वरून शक्रारि

ह्मणूं लागला—अरे, निवांत कां राहिलां ? तुमचे पराक्रम कोठें गेले ? खरदूषणांचा वध करून सागरावर सेतु बांधलात. तुह्मीं क्षत्रियराजकुमार ह्मणवितां, तर बाण कां सोडीत नाहीं ? याप्रमाणें बोलून त्यानें वरकड कपींवरही सर्पबाण सोडले आणि खालीं उतरून मुख्यमुख्य राक्षसांचीं कुणपें उचलून जयवाद्यें वाजवीत तो लंकेंत चालता झाला.

जयवाद्यांचा घोष ऐकतांच रावणाला अत्यानंद झाला. त्यानें पुत्राला आलिंगन दिलें आणि त्रिजटेला बोलावून आज्ञा केली कीं, सीतेला पुष्पकविमानांत बसवून ने आणि रणाची शोभा दाखीव. त्या मानवांचीं प्रेतें पाहून ती आह्मांला वश होण्याचा संभव आहे. असें ऐकतांच तिनें सीतेला विमानांत बसवून रणभूमि दाखविण्यासाठीं नेलें. अनुजासह राम मूर्च्छित पडलेला पाहतांच सीताही मूर्च्छित झाली. तिला त्रिजटेनें सांवरून सावध केलें आणि सांगितलें—बाई जनकतनये, शोक करूं नको. एका क्षणांत राम सावध होईल. इतक्यांत बिभीषणाची पत्नी सरमा गुप्तरूपानें तेथें येऊन सीतेचें शांतवन करूं लागली. नंतर दोघींनीं मिळून सीतेसह विमान अशोकवनांत नेलें आणि रावणाला त्रिजटा सांगून आली कीं, कांहीं झालें तरी जानकी तुह्मांला वश होणार नाहीं.

इकडे सरमा सीतेचें शांतवन करीत असतां तिला ह्मणाली—जानकी, तूं शोकवश न होतां आधीं त्या पुराणपुरुषाच्या करणीचा पूर्ण विचार कर. आपला प्रताप वाढविण्यासाठीं त्यानें शत्रूला पहिल्यानें यश दिलें आहे. नाहींतर बाणानें जो हें ब्रह्मांड एकाक्षणांत जाळणार, त्याला इंद्रजिताचा वध करण्यास उशीर होता असें नाहीं. रावण,

कुंभकर्ण, इंद्रजीत इत्यादि बाहुलीं निर्माण करून त्यानें हा खेळ मांडला आहे, हें जाणून तूं अज्ञान कां बरें स्वीकारतेस? निशा संपतांच सूर्योदयाविषयीं चिंता करण्याचें कांहीं कारण नाहीं, त्याचप्रमाणें रामाला जय मिळेल कीं नाहीं, या गोष्टीचीही चिंता करायाला नको. ज्या रामाचें स्मरण करितांच भक्त जयासह कल्याणपात्र होतात, त्याला अपजय कां यावा? याप्रमाणें त्रिजटा व सरमा शांतवन करीत असतां सीतेनें विवेक केला.

इकडे बिभीषण डोळ्यांत पाणी आणून सुग्रीवास सांगूं लागला—राक्षस कदाचित् पर्वत आणून रामलक्ष्मणावर टाकतील, यासाठीं सूर्योदयापर्यंत दोघांचीही चांगली जतन केली पाहिजे. असें ऐकतांच जे वानर सावध होते ते रामावर पुच्छमंडप करून त्याचें रक्षण करीत बसले. नंतर मारुती व बिभीषण रण शोधूं लागले, तों विव्हळत असलेले वानर रामस्मरणानें आपलें दुःख विसरून त्यांस चराचरजीवन राम सुखी आहेना? असें विचारीत असत. इतक्यांत विकळ पडलेला जांबुवंत शुद्धीवर आला आणि रामप्रभु सुखांत आहे काय? असें ऐकतांच बिभीषण शोक करीत सांगूं लागला कीं, दोघेही नागपाशांत बद्ध होऊन मूर्च्छित झालेले आहेत. इतक्यांत सुषेण सावध होऊन ह्मणाला कीं, द्रोणाचळावरील दिव्य औषधी जर मिळतील तर मी एका क्षणांत रामलक्ष्मणासह सर्व कपिसैन्य उठवीन. असें ऐकतांच बिभीषण ह्मणाला—रात्रींत जाऊन त्या पर्वतावरील औषधी आणील असा बलवान् आपल्या सैन्यांत कोण आहे? जांबुवंतानें सांगितलें कीं, हें काम मारुतीशिवाय कोणाच्यानेंही होणार नाहीं. असें ऐकतांच जांबुवंत व सुषेण यांस बिभीषणानें उठविलें आणि तिघेही

एकमेकांचा हात धरून बोलत बोलत रामाजवळ आले. तों हनुमंतही रण सोडून परत आला होता. त्यास पहातांच सुग्रीवानें सांगितलें— तुह्मीं आतां रामसौमित्रांला उचलून किष्किंधेस घेऊन चला. मी सह-परिवार रावणाचा वध करून बिभीषणाला लंकाधिपत्य देईन आणि सीतेला घेऊन येईन. देवांचेंही मग बंदिमोचन होईलच:

याप्रमाणें सुग्रीव बोलत आहे तों आकाशवाणी झाली कीं, कपि-वीरहो,भिऊं नका. चापपाणि राम आतां सावध होईल. ही अशरीरी-वाणी ऐकतांच वानर तटस्थ झाले, तों रामानें डोळे उघडले व तो इकडेतिकडे पाहूं लागला, तों कपिगण प्रीतीनें आपल्या सभोंवती बसले आहेत, त्यांस पहातांच उदासीनवृत्तीनें राम ह्मणाला— सुग्रीवा, तूं आपला दळभार घेऊन किष्किंधेस परत जा. आह्मीं दोघेच या ठिकाणीं राहूं. असें ऐकतांच सर्वांच्या नेत्रांतून पाणी आलें. सुग्रीव सद्गद होऊन ह्मणाला—महाराज, असें विपरीत कसें घडेल? सूर्याला सोडून त्याचीं किरणें कोणीकडे जातील? सागराला सोडून लहरी कधींतरी गेल्या आहेत? याप्रमाणें त्यांचें भाषण चाललें आहे, तों अकस्मात् वायूनें येऊन सीतावल्लभाचे कानांत गरुडमंत्राचा उपदेश केला. त्या मंत्राचा जप करितांच दश दिशांतून अगणित सुपर्ण उत्पन्न झाले आणि त्यांस पाहतांच ज्या नागपाशांनीं रामासह सर्वसेना बद्ध झालेली होती, ते नाग त्यांस सोडून जीवभयानें पळून जाऊं लागले. निशांतीं वासरमणीच्या उदयाप्रमाणें सर्व वानर भुभुः—कार करीत पुनः उठले आणि आपापली युद्धेच्छा दर्शवूं लागले. सु-ग्रीवादि कपि दुःखरहित होत्साते आज रावणाचा कुलक्षय करूं, असें ह्मणूं लागले आणि रामलक्ष्मणही आपापलीं चापें सज्ज करून अरि-पंथ लक्षीत उभे राहिले, तेव्हां देवांनीं पुष्पवृष्टी केली.

# अध्याय २६ वा.

दाशरथी राम धनुष्य सज्ज करून शत्रूची वाट पहात उभा राहतांच कोट्यावधि वानरांनीं सिंव्हनाद केला, त्यामुळें लंकेंतील पिशिताशन गजबून गेले. इतक्यांत वानर लंकेवर शिळा व पर्वत टाकूं लागले, त्यामुळें राक्षसांचीं मंदिरें मोडूं लागलीं. तेव्हां राक्षसदूतांनीं रावणाकडे जाऊन सांगितलें कीं, रामसौमित्र सावध होऊन युद्धाच्या तयारीनें उभे आहेत व वानर पुनः लंकादुर्गापर्यंत चाल करून आले. असें ऐकतांच रावण प्रहस्तप्रधानाला ह्मणाला—पुत्रानें शत्रुकानन दग्ध केलें होतें; परंतु पुनः त्याला अंकूर फुटले, आतां काय करावें? प्रहस्त ह्मणाला—महाराज, आह्मां राक्षसांपुढें नर आणि वानर यांची गणनाच नाहीं; मला आज्ञा करावी. मी शत्रुसैन्य आटून आपलें दर्शन घेण्यासाठीं परत येतों. असें ऐकतांच त्याला उत्तम वस्त्राभरणांनीं गौरवून आज्ञा दिली आणि सेनेसह रणांत पाठविलें.

तो रावणाचा प्रधान प्रहस्त लंकेच्या उत्तरद्वारानें सैन्यासह बाहेर निघतांच अद्भुत प्रभंजन वाहूं लागला. धुळीनें आकाश भरून गेलें. प्रहस्ताच्या रथाचा ध्वज उन्मळून खालीं पडला आणि पक्षांनीं आकाशमार्गानें एक शोणितचर्चित भुजदंड आणून त्या प्रधानापुढें टाकला. तो मदोन्मत्त असे अपशकून पहातांच मनांत खोंचला; तरी त्याविषयीं खंती न करितां वीरश्री दाटल्यामुळें तसाच रणांगणांत येऊन उभा राहिला. दोन्हीं सैन्यें एक होतांच पुनः संग्रामाची झगड लागली. ते बलाढ्य पिशिताशन वानरांचा मार सहन करूनही कपिसेनेवर कहर करूं लागले. वानरही महाप्रतापी व रणपंडित होते, त्यांनीं

जेव्हां असुरांचा मोड करण्याची वेळ आणली; तेव्हां प्रहस्तानें आपला रथ पुढें लोटला आणि तो असंख्यात् बाणांचा वर्षाव करूं लागला.

तेव्हां नूतन लंकापति बिभीषण रामाला ह्मणाला—प्रभो, हा रावणाचा मुख्य प्रधान प्रहस्त आला आहे. याजबरोबर प्रतियोद्धा सेनापति नीळ पाठवावा असें मला वाटतें. याप्रमाणें दोघांचें भाषण होत आहे, तों प्रहस्तानें असंख्यात वानरांचा संहार केला. त्याचा अनिवार मार सहन होईना ह्मणून वानर माघार घेऊं लागले, असें पाहतांच रामानें चाप चढविलें; इतक्यांत सेनापति नीळ येऊन रामाजवळ आज्ञा मागूं लागला. तेव्हां ‘विजयी होऊन ये’ असें सांगून रामानें त्याला आज्ञा देतांच तो हातांत एक महा पर्वत घेऊन प्रहस्तावर धांवला आणि त्याला समोर गांठून ह्मणाला—अरे, तुह्मीं राक्षसवीर मोठे योद्धे ह्मणवितां आणि हे शस्त्रांचे भारे कशाकरितां वागवितां? हा केवळ तुला भार आहेरे प्रहस्ता! आज तुला मृत्यूनेंच बोलावणें पाठवून याठिकाणीं आणलें आहे; ह्मणून तुझे पितृगण यमपुरींत काय करीत आहेत त्यांचा समाचार घेण्यासाठीं आतां तुलाही तिकडे पाठवितों. तो दशानन महामूर्ख! त्यानें जनकतनया चोरून आणून सर्व राक्षसकुळांचा क्षय आरंभिला आहे. आतां तूं परत लंकेंत कसा जातोस हे मी पाहतों. असें ऐकतांच प्रहस्त ह्मणाला—माकडा, तुझ्या जिव्हेला मृत्युसमयीं फांटा फुटला आहे. ह्मणून तूं अशी बडबड करूं लागलास. चिंता नाहीं. असें बोलून त्यानें चापाला बाण लावितांच नीळानें हातांतील पर्वत त्यावर टाकला; पण त्यानें बाण सोडून त्या पर्वताचे तुकडे उडविले, तों

नीळानें दुसरा अचळ फेंकला. याप्रमाणें एकामागून एक शंभर पर्वत नीळानें प्रहस्तावर टाकले आणि त्यानें बाण सोडून तितक्यांचेंही चूर्ण केलें. नंतर त्या प्रतापी प्रहस्तानें नीळाच्या सर्वांगावर बाण मारिले, तरी मागें न सरतां नीळानें शतयोजनें उंच असा एक ताडाचा वृक्ष उपटला आणि त्यानें झोडून रथासह प्रहस्ताचें चूर्ण केलें. तेव्हां कपींनीं जयजयकार केला आणि घायाळ परत लंकेंत जाऊन तें अपजयाचें वृत्त रावणाला सांगूं लागले.

तेव्हां तो लंकानाथ शोकक्रोधमिश्रितभावानें आपल्या सैनिकांस ह्मणाला—पहातां काय? आतां सर्व सैन्य सिद्ध करून बाहेर पडा. मी आज रामासह सर्व कपि जिंकल्याशिवाय परत येणार नाहीं. असें ऐकतांच निशाणावर घांव मारून कोट्यानकोटि राक्षसवीर सिद्ध होऊन सिंव्हनाद करूं लागले; त्यामुळें लंकानगर दणाणून गेलें. तेव्हां मंदोदरीचे चतुर दूत सभेंत होते, त्यांनीं जाऊन तें वर्तमान त्या पतिव्रतेला कळवितांच ती सुखासनीं बसून दासीजनांच्या परिवारासह सभेस निघाली. तिच्याबरोबर तिचा पुत्र अतिकाया आणि माल्यवान् नामक जाणता वृद्ध प्रधान होता. वेत्रपाण्यांनीं पुढें येऊन ती महापतिव्रता आपल्या दर्शनासाठीं येत आहे, असें रावणास कळवितांच सर्व सभाजन अधोवदनानें निघून गेले. नंतर मंदोदरीनें येऊन पतिचरणीं नमस्कार केला आणि ती सलज्ज उभी राहिली. तेव्हां रावण हास्यवदनानें तिला विचारूं लागला— आज आपलें येणें सभास्थानीं कां झालें बरें? असें ऐकतांच क्षणभर निवांत राहून ती मयकन्या अमृताहूनही मधुरवाणीनें बोलूं लागली—

प्राणनाथ, जो शुद्धपंथ सोडून आड वाटेनें जातो, त्याजवर अनेक

संकटें येतात. सर्वांबरोबर विरोध करून आपलें कल्याण व्हावें असें जो इच्छितो, तोही संकटांतच पडतो. वेदशास्त्रमतानें जें अनुचित कर्म त्या कर्माला प्रवृत्त होणाराही संकटेंच भोगितो; ह्मणून कुशलेच्छु जो आहे, त्यानें विवेक आणि सद्बुद्धीच्या बळानें अनर्थ टाळावे. प्रियकरा, जो परदारा आणि परधन वमनाप्रमाणें पाहतो, त्यालाच शास्त्र पुरुषार्थी अशी संज्ञा देतें. नंदनवनांतील दिव्य सुमनांचा सुगंध घेणाऱ्या मिलिंदाला पलांडूच्या पुष्पाचा वेध लागणें आश्चर्याचें नव्हे काय? हे लंकेश्वरा, जो सर्व गोष्टी यथार्थ जाणूनही अनुचित कर्मी प्रवृत्त होतो; त्याचा विनाशकाळ जवळ आला असें ज्ञाते ह्मणतात. 'मी सर्वज्ञ व सर्व जाणता आहे' असें ह्मणून जो दुराग्रहास पडतो, त्याचें कधींही कल्याण होत नाहीं; ह्मणून मी आपणांला सांगतें, याची क्षमा असावी. आजपर्यंत या कामानें थोरथोरांला नाडून त्यांचा मातेरा उडविला आहे. तुमचा स्वामी जो त्रिनेत्र शिव, त्याचा शत्रु काम असतां आपण त्याला आश्रय दिला ह्मणून तोच आपणावर कोपला आहे; यासाठीं स्मरारि-मित्र जो रामचंद्र त्याच्याशीं सख्य करा, ह्मणजे तोच उमापति आपणांला अक्षयपद देईल. ती पतिव्रता सीता रामाजवळच योग्य. इतरानें हरण केल्यास कल्लोळसरिता आहे. असें मानलें पाहिजे. रामचंद्राचें बळ किती आहे, याबद्दल मी वारंवार आपणांला सांगावें असें नाहीं. ज्या सहस्रार्जुनानें आपणांला बंदींत घातलें होतें, त्याचा वधकर्ता भार्गव; पण त्याचाही रामचंद्रानें पराभव केला! तर तो आपल्याला आटपणार नाहीं, असा निश्चय करून जर भक्तिभावानें त्याला शरण जाल; तर तो निश्चयानें आपल्याला जन्ममर-

आपासून मुक्त करील. ज्यांनीं सुरांचे मुकुट रणांत लोळविले त्या कोट्यावधि वीरांचा ज्यानें संहार केला; तो राम आपणांस युद्धांत आटपणार नाहीं, असा निश्चय करून जसे पूर्वी प्रल्हाद, बळी इत्यादि दैत्यवंशीं असतांही पुरुषोत्तमाला शरण गेले; तसेच् आपणही जर रामाला शरण जाऊन त्याच्या इच्छेप्रमाणें वागाल तर आपणांस कोणी नांवें ठेवणार नाहीं.

याप्रमाणें मंदोदरीचें भाषण ऐकतांच रावण ह्मणाला–प्रिये, तूं जें सारांशोत्तरांनीं मला हित सांगितलेंस, तें मी सर्व समजतों. परंतु मी पुरुषार्थी असुर रामाजवळ मित्र व कधींही करणार नाहीं. आज रणांत जाऊन नरवानरांचा क्षय केलेला तूं ऐकशील. मी आपल्या बाहुबलानें जसा कैलास हालविला व देव बंदींत टाकले तसेच आज शत्रु नाहींसे करून त्यांचीं शिरकमलें आणीन तीं तूं पाहशील. माझ्या पराक्रमाचा अंत आजपर्यंत कोणालाही लागलेला नाहीं. कदाचित् तमकूपांत गभस्ती बुडेल व मृगजळांत अगस्ती पडेल; परंतु मी रामाला शरण जाणार नाहीं. याप्रमाणें त्या मयजेचीं सारवचनें रावणानें अमान्य करितांच ती दुःखित होऊन आपल्या मंदिरांत निघून गेली. नंतर संग्रामसंकेत भेरी ठोकून आपल्या परिवारासह रावण लंकेबाहेर निघाला; त्या वेळेस त्याबरोबर सर्व प्रधान, पुत्र आणि लंकेतील राक्षससैन्य गर्जना करीत लंकेचीं सर्व महाद्वारें उघडून बाहेर पडलें. चित्रविचित्र शृंगार करून पहिल्यानें अपार पायदळ पुढें आलें. त्याच्यामागून असंख्यात तुरंगांचे संभार लोटले. त्यांच्यामागून चपळ, श्वेत व चारचार दंतांचे पर्वताकार गज चालूं लागले. त्यांच्यामागून असंख्य रथ धडधडत बाहेर आले आणि असंख्य रणवाद्यें वाजूं लागल्यामुळें ब्रह्मांड दणाणून गेलें.

सर्व सेनेसह रावण बाहेर पडतांच परमभक्त बिभीषण रामास सांगूं लागला कीं, आज सर्व संतति बरोबर घेऊन रावण स्वतः युद्धाला आला आहे. त्यानें प्रत्येकाचें नांव आणि खूण सांगतांच ती अवाढव्य संपत्ति व संतति. पाहून सर्व कपिगणांसह रामाला महदाश्चर्य वाटलें. त्या सर्व सैन्याच्या मध्यभागीं विरंचिनिर्मित रावणाचा दिव्यरथ कोटिसूर्यांप्रमाणें चमकत होता. असो. शत्रूचें अगाध वैभव पाहतांच सुग्रीवाला अनिवार क्रोध उत्पन्न झाला आणि एक पर्वत घेऊन तो आवेशानें रावणावर धांवला; पण रावणानें एकाच बाणानें त्याच्या हातांतील पर्वताचें पिष्ट करून त्याला दहा बाण मारून खिळून टाकलें. तरी सुग्रीवानें ते बाण उपटून दुसरा एक पर्वत रावणावर टाकला. त्याचेंही चूर्ण करून जेव्हां रावणानें सुग्रीवावर शंभर बाण सोडले; तेव्हां त्याच्या अंगांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या व त्याला मूर्च्छना आली. असें पाहतांच अठरापद्में कपिसैन्य रावणावर वृक्ष पाषाणांचा वर्षाव करूं लागलें, परंतु एकट्या रावणानें सर्वांचें निवारण करून बाणजालानें कपिसैन्य जर्जर करितांच शरभ, गवय, गंधमादन, मैंद, कुमुद, द्विविद आणि गवाक्ष, हे सात वीर पर्वत उचलून रावणावर धांवून आले; परंतु रावणानें त्या सातांचाही पराभव करितांच रामानें धनुष्य चढविलें. तेव्हां लक्ष्मण ह्मणाला—महाराज, माझे बाहू आज स्फुरण पावताहेत, तर रावणाबरोबर समर करण्याची मला आज्ञा द्यावी. असें ऐकतांच रामानें 'अवश्य' ह्मटलें. तें ऐकून लक्ष्मणानें धनुष्य चढविलें आणि तो रावणापुढें आला व ह्मणाला—अरे हे बुद्धिहीना तस्करा मूर्खा दशमुखा, जनककन्यकेला चोरून आणून व्यर्थ आपला कुलक्षय करून घेण्यास पात्र झालास ? अधमाधमा,

आतां या कृतांताच्या दाढेंतून सुटून परत कसा जाशील ? याप्रमाणें लक्ष्मण भाषण करीत आहे तों विशाळ पर्वत घेऊन मारुती रावणावर धांवत आला आणि जशी वीज कडकडून पडते तसा त्यानें तो हातांतील पर्वत रावणावर टाकला; परंतु रावणानें त्याचें वरच्या-वरच चूर्ण केलें. इतक्यांत मारुतीनें रावणाच्या रथावर जाऊन त्याला एक लाथ मारली, तों रावणानेंही त्याचें उसनें फेडलें इतक्यांत रावणाचे हृदयावर मारुतीनें सबळ मुष्टिघात केला, त्यामुळें त्याला मूर्च्छना येत होती; ती सांवरून रावण जों त्याला परत मुष्टिघात करतो, तों विशाळ पर्वत घेऊन नळवानर धांवत आला व त्यानें तो पर्वत रावणाच्या रथावर टाकला; पण रावण त्याचें वरच्यावरच बाणानें पीठ उडवीत आहे, इतक्यांत नीळ आला, त्याला पाहतांच रावणानें पांच बाण सोडले. तों नळानें ब्रह्मदत्त अद्भुत मंत्राचा जप करून आपल्याप्रमाणें कोट्यावधि नळ उत्पन्न केले व ते सर्व पर्वत घेऊन रावणावर धांवून आलेले पाहतांच त्या कौतुकानें रावण क्षणभर विस्मित झाला. एक मुहूर्तपर्यंत दोन्हीं सैन्यें चमत्कार पाहूं लागलीं. रामालाही त्या नळाच्या अद्भुत करणीचें नवल वाटलें. नंतर रावणानें ब्रह्मास्त्र सोडलें. तेव्हां मायावी नळ गुप्त होऊन एकटा नळवानर मात्र उभा राहिला. इतक्यांत सिंहनाद करून लक्ष्मण पुढें आला, त्याला पाहतांच रावण गर्वानें ह्मणाला-अरे मानवा, तूं अजून अज्ञान आहेस; अजून तुझ्या मस्तकावरील जावळही वाळला नाहीं. असें असतां मजबरोबर युद्धाला आलास तर आजपर्यंत तूं कोणत्या ठिकाणीं युद्ध केलें आहेस, तें मला सांग आणि मग मजबरोबर युद्ध कर. असें ऐकतांच लक्ष्मण ह्मणाला-

मूर्खा, मी जरी कोठेंही युद्ध केलेलें नसलें तरी तूंच आज माझा संग्राम पहा. तुझी आयुष्यमर्यादा संपली असें समज. आह्मीं या लंकेचें राज्य बिभीषणाला दिलें आहे. सिंहदरींत चालून आलेला कुंजर जसा जिवंत परत जात नाहीं, तसा आज तूं लंकेंत जिवंत जाणार नाहींस. असें बोलून जेव्हां तो लक्ष्मण बाणापाठीं बाण सोडूं लागला, तेव्हां ते सपक्ष रावणाच्या हृदयांत जाऊन भरूं लागले. रावणही प्रखर बाण सोडूं लागला; पण ते लक्ष्मण वरच्यावरच तोडीत असे. शेवटीं त्या लक्ष्मणाचा अनिवार शरमार पाहून रावणानें ब्रह्म-शक्ति बाहेर काढून ती लक्ष्मणावर टाकली. ती अनिवार शक्ति सुटलेली पाहतांच लक्ष्मणानें एक बाण सोडून आकाशांतच तिचे दोन तुकडे केले; पण अर्धखंड जें राहिलें होतें, तें लक्ष्मणाच्या हृदयावर येऊन आदळलें. त्यामुळें लक्ष्मण निचेष्टित होऊन भूमीवर पडला व त्याचे श्वासोच्छ्वास बंद झाले. इतक्यांत रावणानें त्याच्याजवळ येऊन त्या-जवर मुष्टिप्रहार केला. तों मारुतीनें येऊन रावणाच्या छातींत अशी एक लाथ दिली कीं, ती बसतांच तो रक्त ओकत आपल्या रथांत जाऊन बसला; इतक्यांत लक्ष्मणानेंही सावध होऊन जो एक प्रखर बाण सोडला, तो रावणाचें हृदय भेदून पार निघून गेला. परंतु बंधूची व्यथा पाहून रामाला अत्यंत क्रोध आला होता; तो लक्ष्मणाला पाठीशीं घालून आपण पुढें झाला. इतक्यांत रावण रथांत आहे व राम पादचारी असून युद्ध करणार; असें पाहतांच मारुतीनें त्याला आपल्या खांद्यावर घेतलें. हनुमंतस्कंधावर रावणासमोर उभा राहतांच रामानें एक बाण सोडून रावणाच्या मस्तकावरील दाही छत्रें छेदून पाडलीं. दुसऱ्या बाणानें चामरें व मित्रपत्रें पाडलीं व तिसऱ्या बाणानें

काही मुकुट छेदून भूमीवर पाडले. नंतर रामानें आणखी एक बाण सोडला आणि रावणाचे दाही भाते व धनुष्यें छेदून खालीं पाडलीं. याप्रमाणें विचित्र करणी करून राम गर्जना करून त्याला ह्मणाला—रावणा, जा आज परत जा आणि सर्व संपत्तीचा उपभोग घेऊन आपल्या पुत्र पौत्रादिकांस भेटून परत ये. आज तुला जिवंत सोडतों. मूर्खा, इतकी सेना असतां तूंच कशाला आज पुढें आलास? जा या वेळेस तुला जीवदान दिलें आहे. असें ऐकतांच रावण भग्नदर्प होत्साता अवशिष्ट सैन्यासह लंकेंत निघून गेला.



# अध्याय २७ वा.

रामानें रणांत अपमान व निर्भर्त्सना केल्यामुळें थिजून काळवंडलेला रावण अत्यंत चिंतातुर होत्साता सभेंत येऊन बसला; पण त्याला छत्र सिंहासन आवडेना. त्याला प्रत्येक वस्तु रामरूप दिसूं लागली. कपाळशूळानें महाव्याघ्र जसा आरंबळतो तशा वेदना वाटूं लागल्यामुळें तो अगदीं उतरून गेला आणि महोदराला ह्मणाला—कसा विपरीतकाळ आला आहे पहा ! मक्षिकेनें भूगोल हालवावा, किंवा चित्रांतील सर्पानें खगपाळ गिळावा, तसें हें झालें ! महापराक्रमी रावण मानवानें पळविला ! हायहाय ! केवढा हा अपमान ! याप्रमाणें रावणाचीं भाषणें ऐकतांच प्रधान ह्मणाले—आतां कुंभकर्णाला जागृत करावें, ह्मणजे तो रामसौमित्रांस एका क्षणांत गिळून टाकील. हें प्रधानाचें भाषण रावणाला रुचलें आणि त्यानें त्यावेळीं आज्ञा केली कीं, आतां त्वरा करून कुंभकर्णाला जागृत करा. असें ऐकतांच दहालक्ष राक्षस बरोबर घेऊन विरूपाक्ष आणि महोदर कुंभकर्णास उठविण्यासाठीं निघाले. त्यांनीं हत्तीवर घातलेल्या मद्याच्या पखाला चारहजार व अन्नाचे पर्वत बरोबर घेतले आणि भयंकर वाद्यें वाजवीत ते कुंभकर्णाच्या मंदिरांत आले.

कुंभकर्णाचें विशाळ व भयंकर शरीर पाहून राक्षसांसही कंप सुटला. तो घोरत होता व त्याच्या नाकांत कित्येक वनगज, म्हैशी, तरस इत्यादि श्वापदें अडकलेलीं होतीं, तीं श्वासोच्छ्वासाबरोबर आंत व बाहेर जात येत असत; पण त्यांचीं कांहीं तेथून मोकळीक होत नसे. सवालक्ष गांवें खोल समुद्राचें उदक ज्याच्या नाभीबरो-

वर होत असे, तो विशाळ कुंभकर्ण निद्रार्णवीं निमग्न झालेला आहे; असें पाहतांच राक्षस त्याला जागृत करण्यासाठीं भयंकर हांका फोडूं लागले; त्यामुळें वापी, कूप व तडाग आटूं लागले. स्वर्गापर्यंत ऐकूं जातील अशा नौबदी वाजवूं लागले. गगनचुंबित महावृक्ष घेऊन नाकांत चढवूं लागले. कोणी नाकपुड्या दाबून श्वासावरोध करूं लागले; तरी तो जागा होईना. कोणी पाषाण घेऊन वर्मस्थळें भेदूं लागले आणि कडू व तीक्ष्ण औषधें नाकपुड्यांत ओतूं लागले आणि कोणी कोणी मोठमोठालीं दांडकीं घालून त्याला कुशीस वळवूं लागले, परंतु तो जागा होईना. शेवटीं विरूपाक्षनामक राक्षसानें दोन किन्नरी आणून त्याच्या कानांत बसविल्या. त्यांचें अति सुस्वर गायन फार वेळपर्यंत जेव्हां चाललें, तेव्हां तें ऐकून कुंभकर्ण जागा झाला. त्यानें उठून जांभाई देतांच सर्व मद्य प्राशन केलें व कित्येक पशु दाढेखालीं घालून रगडले. त्याचप्रमाणें अन्नाचे व मांसाचे पर्वत गिळल्यानंतर डोळे पुसून प्रधानाकडे पाहिलें, तेव्हां त्यांनीं सीता हरण करून आणली, येथपासून जें वर्तमान झालें तें सांगण्याला आरंभ केला आणि कालच्या युद्धांत रावणाचा पराजय झाला तेथपर्यंत सांगून संपविलें आणि आतां रावण परम चिंताक्रांत झाला आहे, ह्मणून आपणांस जागृत केलें, असें शेवटीं सांगितलें. तें एकतांच कुंभकर्ण उभा राहिला आणि असाच रणांत जाईन, असें ह्मणूं लागला. तेव्हां प्रधानादिकांनीं पहिल्यानें राजदर्शन घ्यावें अशी विनंती केल्यावरून तो सभेकडे निघाला.

राम, सुग्रीव, लक्ष्मण, बिभीषण इत्यादि सर्व सुवेलाचलावर बसले होते, तों सभेकडे निघालेला कुंभकर्ण त्यांच्या दृष्टीस पडला. भयंकर

व गगनचुंबित लंकादुर्ग त्याच्या गुढघ्याला लागत होता. तो उभा राहतांच देव विमानें पळवूं लागले. लंकादुर्ग वेष्टून असलेले वानर पळूं लागले व कित्येक मूर्च्छित पडले. इतक्यांत बिभीषण रामाला सांगूं लागला—महाराज, ज्याला पाहतांच सूर्यचंद्र भय पावतात, तो हा कुंभकर्ण आज जागृत झाला आहे. याच्या जन्मकाळीं भूमंडळावर प्रळय झाला ! हा मातेच्या उदरांतून बाहेर येतांच तीसहजार स्त्रिया सहज गिळून बसला. यानें इंद्राचा ऐरावत भूमीवर आपटला आणि त्याचे दंत मोडून त्यांनीं इंद्राला ताडन केलें. इंद्रानें वज्र उचलून याजवर प्रहार केला; पण याचें रोमही वक्र झालें नाहीं. याच्यावर निद्रेचें आवरण आहे, म्हणूनच जग वांचलें आहे. याप्रमाणें रामाजवळ बिभीषण बोलत आहे तों कुंभकर्णास पाहिल्यामुळें वानरांस हिमज्वरानें व्याप्त केलें. कित्येकांच्या मुरकुंड्या वळल्या आणि कोणकोणाच्या दांतखिळच्या बसल्या. रामानें चोहोंकडे पाहिलें तों कुंभकर्णदर्शनानें सर्व वानर भयभीत झालेले आहेत असें दिसलें; म्हणून शेवटीं तो मारुतीकडे पाहूं लागला. इतक्यांत मारुतीनें लंकेंत उडी मारली आणि आपलें अद्भुतबळ वानरांस दाखविण्यासाठीं त्यानें कुंभकर्ण सभेंत चालला होता, त्याला कटीपर्यंत तीन वेळ उचललें. हें कौतुक राम व सर्व कपि तटस्थ होऊन पाहत होते; पण मद्यपानानें उन्मत्त झालेल्या कुंभकर्णास आपल्याला कोण उचलतो हें कळलेंही नाहीं. तों मारुतीनें चवथ्यानें कुंभकर्णाला उचललें आणि गरगर फिरवून त्याला सुवेळेवर फेंकून द्यावें, असें मनांत आणलें; पण इतक्यांत त्याच्याच मनांत असें आलें कीं, याला गगनांत भिरकावून द्यावें अथवा लंकेवरच आपटून सगळ्यांचें चूर्ण करावें. इतके प्रकार

जरी त्याच्या मनांत आले, तरी प्रत्येकाला मोठमोठाले अपवाद आढळले. लंकेवर आपटला तर सगळें चूर्ण होईल खरें, पण मग बिभीषण कोठें नांदेल! सुवेळेवर टाकावा तर वानर चुरून जातील. भूमंडळावर आपटावा तर धरा पाताळीं जाईल. इत्यादिक अनेक प्रकार मनांत आल्यामुळें त्यानें कुंभकर्णाला तसेंच खालीं ठेवलें आणि परत येऊन रामचरणीं वंदन केलें. हनुमंताचा पराक्रम पाहतांच सर्व कपींस भयानें जो हिमज्वर लागला होता, तो नाहींसा झाला. सर्व कपींनीं धांवत येऊन हनुमंताच्या गळ्याला मिठ्या मारल्या आणि अज्ञानपणानें त्यास विचारूं लागले कीं, कुंभकर्ण आयता सांपडला होता, मग त्याला सोडलेंस काय ह्मणून? असें जरी सर्वांनीं विचारिलें तरी मारुतीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हां रामानें सर्वांना सांगितलें कीं, त्या कुंभकर्णाचा मृत्यु माझ्या हातून आहे, ह्मणून मारुतीनें त्याला सोडलें.

असो. कुंभकर्ण सभेंत पोंचतांच त्याला पाहून रावणाला हर्ष झाला. इतक्यांत त्यानें वडील बंधूला वंदन केलें आणि आपलें स्थान स्वीकारिलें. नंतर मेघांच्या गर्जनेप्रमाणें तो रावणाला विचारूं लागला—हे बंधो, तुला कोणतें संकट पडलें आहे, ह्मणून मला जागृत केलेंस? या लंकेंत महाप्रळय उत्पन्न झाला, किंवा भूमंडळ रसातळास चाललें, अथवा तुझ्यावर काळ चालून आला, ह्मणून तूं मला जागृत केलेंस? असें ऐकतांच रावण ह्मणाला—मी रूपवान् जानकी हरण करून आणली, ह्मणून राम वानरसैन्य घेऊन सुवेळाचळावर आला आहे. त्यानें धूम्राक्ष, वज्रदंष्ट, प्रहस्त इत्यादिकांचा समरांत संहार केला, ह्मणून काल मी स्वतः युद्धाला गेलों; पण त्या दाशरथीनें माझाही पराभव केला. तेव्हां प्रसंगीं बंधूशिवाय कोणी साह्यकर्ता नाहीं, असें ह्मणून मी तुला जागृत केलें

आहे. मला चिंताव्याधीनें ग्रस्त केलें. आतां तुजवांचून औषध देणार कोणीही नाहीं.

असें ऐकतांच कुंभकर्ण रावणाला ह्मणाला—जानकीला आणून व्यर्थ कुलक्षयाला कारण केलेंस. राम हा आदिनारायण अवतरला आहे व त्याचें साह्य करण्यासाठीं सर्व देव अंशरूपानें वानर झाले आहेत, हें वर्तमान मला पूर्वी नारदानें सांगितलें होतें, " बुद्धिःकर्मानुसारिणी" ही सुभाषितोक्ति कधींही खोटी होणार नाहीं. त्याप्रमाणें तूं सीतेला घेऊन आलास; पण तिचा उपभोग तरी घेतलास ? रावण ह्मणाला—ती सीता रामा शिवाय कधींही कोणाला वश होणार नाहीं: असें धोरण स्पष्ट दिसतें. मी अनेक उपाय केले, पण ते व्यर्थ गेले. असें ऐकतांच कुंभकर्ण ह्मणाला—कापट्यमंत्र जप करून तूं सुंदर रामरूप धारण कर; ह्मणजे तुझी इच्छा तृप्त होईल. ही कुंभकर्णाची युक्ति रावणाला मान्य झाली नाहीं. तो ह्मणाला—मी जर स्वतः रामरूप झालों; तर माझी दुर्वासना मुळींच नाहींशी होईल. तो एकवाणी, एकवचनी व एकपत्नी व्रती आहे. तोच मी झाल्यावर परस्त्री मला मातेसमान वाटणार ! यासाठीं हे मत्प्रियबांधवा, तूं सकळ सैन्यासह रामलक्ष्मणांचा संहार केल्याशिवाय ती मला वश होणार नाहीं. असें ऐकतांच कुंभकर्णानें त्याला सांगितलें—चिंता नाहीं. तुझ्या इच्छेस्तव आतांच जाऊन सर्व सैन्य भक्षण करतों आणि रामसौमित्राला धरून आणतों पहा ! असें ऐकतांच रावणानें आनंद मानून त्याच्याबरोबर असंख्य राक्षससैन्य दिलें, तेव्हां तो कुंभकर्ण रावणाला वंदून सैन्यासह रणभूमींत आला.

सुवेळाचळासन्निध रणांगणांत कित्येक कपि बसलेले होते, ते कुंभक-

पास पाहतांच रामाला सांगण्यासाठीं धांवत गेले. इतक्यांत रणांगणांत येऊन उभा राहिलेला कुंभकर्ण विचार करूं लागला कीं, जंबुकावर केसरीनें चाल केल्याप्रमाणें मी वानरांवर काय जावें ? त्यांत कांहीं पुरुषार्थ दिसत नाहीं. असें मनांत आणून त्यानें पहिल्यानें युद्ध करण्यासाठीं राक्षससैन्य पुढें केलें. तेव्हां कपीही वृक्षपाषाण घेऊन त्यांवर धांवले आणि दोघांचें युद्ध सुरू होऊन अशुद्धाचे पूर वाहूं लागले, तरी तें युद्ध कुंभकर्णाच्या मनास येईना. शेवटीं हें कसलें युद्ध ! असें ह्मणून त्यानें हातांत मुद्गल घेऊन रामावर चाल केली, त्या वेळेस अठरापद्मे वानर त्या कुंभकर्णावर शिळा व पर्वतांचा पाऊस पाडूं लागले; परंतु त्याची तो गणतीच करीना ! तेव्हां मारुतीनें एक सहस्रशृंगांचा पर्वत उचलून तो कुंभकर्णावर टाकला, त्याचें त्यानें सहज मुष्टिघातानें चूर्ण केलें. नंतर मारुतीकडे पाहून ह्मणाला– माकडा, तूंच पहिल्यानें येऊन माझें लंकानगर जाळलेंस नव्हे ! इतकें बोलून त्यानें हातांतील शूळ गरगर फिरवून मारुतीवर मारतांच त्या पवनात्मजाला क्षणिक मूर्च्छना आली, असें पाहतांच सेनापति नीळ वायुगतीनें त्याजवर धांवला, पण त्यानेंही टाकलेला पर्वत एका मुष्टिघातानें चूर्ण करून कुंभकर्णानें त्याजवर एकच प्रहार करून त्याला मूर्च्छित पाडलें. तों ऋषभ, शरभ, गवाक्ष आणि गंधमादन चौघे काळालाही दंड करणारे वीर त्याजवर धांवले व चौघांनीं एकदम चार पर्वत कुंभकर्णावर टाकले. ते त्यानें एकच मुष्टिघातानें चूर्ण करून शरभ व गवाक्ष यांस भूमीवर आपटलें आणि उरलेल्या दोघांस आकाशांत भिरकावून देऊन तो रणांत गर्जना करूं लागला, त्यामुळें ब्रह्मांड ढळून जातें कीं काय, असें वाटूं लागलें. तो भयानक कुंभ-

कर्ण वानरांस ग्रासण्याकरितां त्यांजवर धांवूं लागला. एकदांच कव घालून शतावधि वानर त्यानें धरावे आणि तोंडांत घालून गिळावे असा प्रळय मांडला ! ऐशीं हजार वानर त्यानें तोंड पसरून गिळले, त्यांपैकीं कित्येक कर्णरंध्रांतून व कित्येक नाकांतून पळाले आणि बाकी उरले होते ते त्याच्या धाकानेंच पळत सुटले, ते गिरिकंदरीं जाऊन दडूं लागले. कित्येक वानर जेव्हां सुग्रीवाला शरण गेले, तेव्हां तो हातांत पर्वत घेऊन कुंभकर्णावर धांवला. त्यानें पर्वत टाकलेला कुंभकर्णानें मुद्गल मारून फोडतांच सुग्रीव त्याला ह्मणाला—हे दुष्टा वृथा-पुष्ट राक्षसा, आतां मी तुझें नासिक आणि कर्ण छेदन करितों, ह्मणजे विमानस्थ सुरगणांस आनंद होईल. मूर्खा, तुझा अग्रज जो दशकंधर, तो जानकीला चोरून अपराधी झाला आहे त्याचा तूं बंधु, ह्मणून तुलाही शिक्षा अवश्य केली पाहिजे. असें ऐकतांच कुंभकर्ण ह्मणाला—मशका, फार बडबडतोस रे. तूं रागानें माझ्या समोर आला आहेस, पण तुझें मत्कुणप्राय शरीर सहज चिरडून टाकीन ! याप्रमाणें तो भाषण करीत आहे, तों हातांत पर्वत घेऊन सुग्रीव त्या कुंभकर्णाच्या वक्षस्थलावर आदळला. त्याबरोबर पर्वताचा तर चुराडाच उडाला आणि कुंभकर्णानें सुग्रीवाला रागानें धरून गरगर फिरविलें व आपटण्याची इच्छा केली. इतक्यांत त्याचा हात पिळून सुग्रीव निसटला व आकाशांत उडाला; पण ग्रहमंडलापर्यंत कुंभकर्णाचें डोकें गेलेलें, त्याहून उंच त्याचे हात, तेव्हां त्यानें पुनः सुग्रीवाला धरलें आणि कक्षेंत दाबून ह्मणाला—माझ्या बंधूला वाळीनें कक्षेंत दाबून चतुःसमुद्रांचें स्नान केलें होतें, त्याचा सूड घेतला ! आतां या सुग्रीवाला दाबून मारतों. बिचारा सुग्रीव, कुंभकर्णाच्या कक्षेंत दुर्गंधीनें कंटाळून

गेला, इतक्यांत राक्षस जयवाद्यें वाजवूं लागले आणि कुंभकर्ण परत लंकेंत जाण्यासाठीं निघाला.

संसारजाळ्यांत सांपडलेला साधक जसा त्यांतून सुटण्यासाठीं यत्किंचित् रंध्र पहात असतो, तसा तो वानरेश्वर सुग्रीव कुंभकर्णाच्या कक्षेंतून निघण्याची सवड पहात होता. इतक्यांत मस्त झालेल्या कुंभकर्णाचीं कुक्षि सैल होतांच तो त्यांतून निसटला व नेत्रपातें लवतें न लवतें इतक्यांत दोन्ही हातांनीं दोन कर्ण उपटून आणि दांतांनीं नाक तोडून पळाला, तो रामचरणीं येऊन लीन झाला, तेव्हां कपींनीं जयजयकार केला व देवांनीं पुष्पवृष्टि केली. रामानेंही परम प्रीतीनें सूर्यपुत्राला आलिंगन दिलें.

इकडे कुंभकर्ण जो आपल्या मतें विजय संपादन करून रावणाकडे चालला होता, त्याला सुग्रीवानें कान व नाक तोडून नेल्याची शुद्धीही नव्हती; पण कुंभकर्णाची विटंबना केली, असें रावणाला कळतांच त्यानें परमचिंताक्रांत होऊन नापिताला आज्ञा केली कीं, तूं नगरद्वारावरून कुंभकर्णाला आरसा दाखीव, ह्मणजे त्याची विटंबना झाली आहे ती त्याला कळेल. असें ऐकतांच नापित गगनचुंबित वंशाला ( वेळूला ) आरसा बांधून सत्वरणी महाद्वारावर जाऊन उभा राहिला व त्यानें कुंभकर्णाला आरसा दाखविला. तेव्हां आपली विटंबना झाली व सुग्रीव सुटून गेला, त्याचें त्याला स्मरण झालें. आपलें स्वरूप पाहतांच तो मनांत अगदीं विटला आणि आतां रावणाला तोंड काय दाखवायाचें आहे ! कपींसह रामलक्ष्मणांस एका क्षणांत गिळीन, पृथ्वी पालथी घालीन आणि सर्वांचा निःपात करीन; असें ह्मणत व रागानें दांत ओंठ चावीत तो जो परत फिरला तो रणांत येऊन कृतांताप्रमाणें

हांक देऊं लागला. तेव्हां सर्व वानर आतां आमचें रक्षण कर, असें ह्मणत रामाला शरण आले; इतक्यांत तो कुंभकर्ण रामावर चालून येऊं लागला; तेव्हां सौमित्र त्याला आडवा होऊन मजबरोबर युद्ध कर असें ह्मणूं लागला; तरी तो ऐकेचना. तेव्हां लक्ष्मणानें बाण सोडला, तो सपक्ष त्याच्या विशाळ देहांत गुप्त झाला. नंतर लक्ष्मणानें पुष्कळ बाण सोडले, पण कुंभकर्णानें तें ध्यानांतच आणले नाहींत; इतक्यांत हातांत गदा घेऊन बिभीषण त्याच्यापुढें आला आणि ह्मणाला—नकुल्या आतां मजबरोबर युद्ध कर. मी पूर्वी रावणाला अनेक प्रकारें बोध केला, पण त्याला कामविकार झाल्यामुळें मानवला नाहीं. आतां त्याच्या दुष्कृतवल्लीचीं फळें चाखण्यासाठीं तूं पुढें आला आहेस, तरी चिंता नाहीं. पहा कशी रुची आहे ती. असें ऐकतांच कुंभकर्ण ह्मणाला—हे स्वकुलवनछेदककुठारा शतमूर्खा बिभीषणा, मी कोण हें तूं जाणत नाहींस वाटतें. तुझा याचवेळीं वध केला असता, परंतु वंशवृद्धीला कारण आहेस व तिलांजुली देण्यासाठीं उपयोगी पडशील ह्मणून जिवंत सोडतों. जा रामाच्या पाठीमागें लपून बैस. जंबुका, आमच्या राक्षससिंहकुळांत तूं एक भित्रा ससा उत्पन्न झालास ! अशीं बंधूचीं भाषणें ऐकतांच बिभीषण मागें फिरला आणि कुंभकर्ण रामासमोर जाऊन उभा राहिला. तेव्हां राम त्याला ह्मणाला—दुष्ट निशाचरहो, तुह्मीं त्रिभुवनाला पीडा केलीत; ह्मणून तुमचा वध करण्यासाठीं मी अवतार घेतला आहे. तूं जे वानर गिळले आहेस; ते तुझें पोट फोडून बाहेर काढतों. तुझा मरणकाल सन्निध आला आहे; असें समजून सावधानवृत्तीनें मजकडे पहा. असें बोलून रामानें धनुष्याला शर लाविला आणि त्याला पुनः सांगितलें—तूं महापातकी आहेस,

ह्मणून तुला यातना भोगण्यासाठीं पहिल्यानें मृत्युपुरीस पाठवितों; मागून रावणालाही तुझ्या समाचारासाठीं पाठवीन आणि चंद्रार्क आहेत तोंपर्यंत बिभीषणाला या लंकेचा राजा करीन. तेव्हां कुंभकर्ण रामाला ह्मणाला—तूं आमचा जन्मांतरींचा वैरी आहेस, हें मी पूर्णपणें जाणतों. तूं आपलें सामर्थ्य वर्णन केलेंस, पण तें मजपुढें चालणार नाहीं. दांताला दांत न लावतां तुला गिळून टाकीन. त्वां खरदूषणादिकांस मारलें, पण तो अभिमान माझ्यापुढें चालणार नाहीं. मी निद्रार्णवीं निमग्न झालों, नाहींतर हें त्रिभुवन उरूं दिलें नसतें. तुला वीर ह्मणतांना मला हंसें येतें. कुंजर अरण्यांतील इतर पशूंना त्रासद असला तरी मृगेंद्रा पुढें त्याचें कांहीं चालत नाहीं; तसाच तूं सोड, तुझें किती बाण असतील ते. असें ऐकतांच रामानें चाप चढवून क्रोधानें असंख्य बाण सोडले, पण ते सर्व त्या घटकर्णानें तोंड पसरून गिळून टाकले. तेव्हां सर्व वानरही भयभीत होऊन कुंभकर्णाकडे पाहूं लागले इतक्यांत हातांतील मुद्गल भोंवंडीत रामावर प्रहार करण्यासाठीं पुढें आला; तों रामानें एक प्रखर बाण चापावर लावला आणि त्याच्या मुखीं अग्नीची स्थापना करून तो आकर्ण ओढून सोडतांच त्या बाणानें कुंभकर्णाचा सव्यहस्त मुद्गलासह तुटून आकाशांत गेला. इतक्यांत रामानें दुसरा सूर्यमुख बाण मारला व त्याचा दुसरा हातही तोडून पाडला; परंतु ते दोन्ही हात वळवळत वानरांचा चूर उडवूं लागले. तेव्हां कपि वृक्षपाषाण घेऊन ते हात जागच्याजागीं ठेंचूं लागले. तों रामानें दुसरे दोन प्रखर शर सोडून कुंभकर्णाचे दोन्ही चरण तोडले. तरी तो पोटचालीनेंच तोंड पसरून धांवूं लागला? त्याच्या नेत्रांतून, नासिकांतून व तोंडांतून क्रोधाग्नीच्या ज्वाळा चालूं लागल्या, तेव्हां देवांसही त्याचें

आश्चर्य वाटलें, इतक्यांत रामानें आणखी एक बाण काढून त्यावर भीमकाळाची स्थापना केली व चापाला लावून सोडतांच तो वायूचें खंडन करणारा बाण कुंभकर्णाचें विशाळ शिर उडवून त्यासह आकाशांत गेला. तेव्हां देवांनीं भयानें आपापलीं विमानें पळविलीं, तों तें शिर लंकेवर पडलें व असंख्य सदनें मोडलीं. कुंभकर्णाचा नाश होतांच जयजयकारासह अमरांनीं पुष्पवृष्टि केली. कुंभकर्णाबरोबर आलेलें अवशिष्ट राक्षससैन्य परत लंकेंत गेलें. तेव्हां बंधूचे गुण आठवून रावण शोक करूं लागला आणि सुवेळाचळावर सर्व कपि आनंदानें येऊन रामचरणीं लीन झाले.



प्राण घेतला. तों त्रिशिरा धांवला, तेव्हां त्यालाही मारुतीनेंच हातांतील वृक्षानें झोडून गतप्राण केलें. इतक्यांत ऋषभानें महापार्श्वाचाही शेवट केला, तेव्हां आपल्याबरोबर आलेल्या पांचांचाही शेवट झाला, असें पाहतांच अतिकायानें सारथ्याला आज्ञा केली कीं, आतां सर्वांना सोडून माझा रथ रामाच्या अंगावर ने. असें ऐकतांच सारथ्यानें त्याचा सहस्रघोड्यांचा रथ एका सूत्रानें आवरून पुढें काढला; तों त्याला गवय, गवाक्ष, कुमुद, शरभ आणि मैंद, हे पांच वानर आडवे आले. इंद्रजितासारखाच अतिकाया प्रचंडवीर व भव्यशरीरधारी होता, त्याला पाहतांच सर्व कपि आश्चर्य करूं लागले. तों पांचांनींही पांच पर्वत त्याच्या रथावर टाकतांच त्यानें बाणानें त्यांचें चूर्ण उडविलें आणि पांचही वीरांस शर मारून खिळून टाकलें. तेव्हां हा कोणाचा कोण ? असा बिभीषणाला प्रश्न करितांच तो सांगूं लागला.

हा अतिकाया रावणाचा पुत्र. हा तेजाधिक दिव्यरथ याला ब्रह्मदेवानें दिला आहे. हा देवांसही अनिवार महापराक्रमी आहे हा इतर कोणासही आटपणार नाहीं, यासाठीं त्याजबरोबर युद्ध करण्यास आपणच उठावें किंवा लक्ष्मण स्वामीला पाठवावें. अ ऐकतांच राम चापाची गवसणी काढूं लागला, तें पाहतांच याजबरोबर युद्ध करण्याची मला आज्ञा असावी, असें लक्ष्मण ह्मणूं लागला; तेव्ह रामानें त्याला आज्ञा दिली. ती आज्ञा मिळतांच धनुष्य चढवून लक्ष्मण अतिकायापुढें धांवत आला आणि त्याला ह्मणाला—हे स्थूल शरीर धारण करणाऱ्या अतिकाया, आज तुझें शरीर बाणांनीं छिन्नविच्छिन्न करितों. तुला काळानेंच पाश घालून या रणांत ओढून आ

णलें आहे. असें ऐकतांच अतिकाया त्याला ह्मणाला—अरे मानवा, एखादा नट जसा नृपाचा वेष घेऊन येतो, तसे तुह्मी वीर बनून आलां आहां; तर आतां तुमचे पितर स्वर्गी काय करीत आहेत, त्यांचा शोध करण्यासाठीं मी आज तुह्मां दोघांलाही पाठवून देतों. असें ऐकतांच लक्ष्मणानें त्याला सांगितलें कीं, संभाळरे, आला माझा बाण ! इतकें ऐकतांच अतिकायानें त्याच्यावर रथ लोटला. तो लक्ष्मणानें पांच बाण त्याच्यावर टाकले; पण ते त्यानें एकाच बाणानें जेव्हां तोडले, तेव्हां सौमित्रानें त्याच्यावर हजार बाण सोडून दिले. नंतर लक्ष्मण लक्षावधि बाण जेव्हां पर्जन्याप्रमाणें सोडूं लागला, तेव्हां असंख्य राक्षसांचीं शिरें तटातट उडूं लागलीं. गजमस्तकें फुटून त्यांतून मौक्तिकें उसळूं लागलीं आणि अशुद्धाचा पूर वाहूं लागला. त्यांत कित्येक वीरांचीं प्रेतें वहात चाललीं. अतिकायानेंही लक्ष्मणावर अनेक शस्त्रास्त्रांचा वर्षाव केला, तरी शेवटीं सुमित्रानंदनानें एक दिव्यबाण काढून त्याजवर ब्रह्मास्त्राची स्थापना केली आणि चापावर लावतांच आकर्ण ओढून कल्पांतचपलेप्रमाणें तो बाण सुटतांच अतिकायाचें शिर उडालें, तेव्हां एकच जयजयकार झाला आणि देवांनीं पुष्पांचा वर्षाव केला.

नंतर अवशिष्ट राहिलेल्या घायाळवीरांनीं जाऊन तें वर्तमान दशकंधरास सांगतांच तो सिंहासनाखालीं पडला आणि शोक करूं लागला. तेव्हां इंद्रजीत त्याचें शांतवन करीत असतां ह्मणाला—महाराज, होणार गोष्ट असते ती कोणत्याही काळीं चुकत नाहीं. यासाठीं आतां शत्रुक्षय करण्याकरितां मी जातों. असें बोलून तो चतुरंगदळासहवर्तमान रणमंडळांत आला आणि प्रथम आपल्यासभोंवती सेना-

दुर्ग रचून त्यानें रक्तानें स्नान केलें, रक्तवस्त्र परिधान केलें आणि बिब्याच्या समिधा व शिरस हीं द्रव्यें जवळ घेऊन हवन केलें, तेव्हां त्या हवनांतून धनुष्य, तूणीर, शस्त्रें, सारथी आणि अश्व, यांसहित दिव्य रथ बाहेर आला. त्या रथावर बसून तो इंद्रजीत झडकर मेघांआड गेला आणि तेथून अपार शरवर्षाव करूं लागला. ते बाण केवळ विजेचा पर्जन्य पडत होता असे भासले. त्यामुळें कपींचे करचरण तटातट् तुटून पडूं लागले व सहस्रावधि वानर निश्चेष्ट होऊन भूमीवर पडूं लागल्यामुळें एकच हाहाःकार उडाला. रामसौमित्रांसही प्रखर बाण लागल्यामुळें त्यांच्या हातांतील धनुष्यें गळून पडलीं आणि तेही धरणीवर पडले. इंद्रजितानें शंभर बाणांनीं रामसौमित्रांस खिळून टाकलें, सुग्रीवाला सात बाण मारून भूमीवर पाडलें, सहा बाणांनीं गंधमादनास निजविलें, बारा बाणांनीं ऋक्षभ व मैंद यांस निचेष्टित केलें, सोळा बाणांनीं सेनापति नीळ मूर्च्छित केला, सात बाणानीं जांबुवंतास विंधिलें आणि तीस बाण टाकून अंगदासही निजविलें. नंतर वरकड वानरांस पांच पांच बाणांनीं विकळ करून त्यानें जयवाद्यें वाजवीत लंकेंत प्रवेश केला. तेव्हां रावणानें अत्यानंदेंकरून त्याला प्रेमालिंगन दिलें आणि त्याच्या पराक्रमाला वाखाणून त्याचा गौरव केला.

रामासह सर्व कपिसैन्यास जर्जर करून जरी इंद्रजीत परत गेला होता, तरी मारुती व बिभीषण हे दोघे चिरंजीव सावध होते. ते दोघेही रामाचे प्राणमित्र अंधकार पडला होता तरी एकमेकांस भेटून स्फुंदस्फुंदून रडूं लागले व दोघेही मोठा कठीण काळ आला, असें म्हणूं लागले. नंतर दोघांनींही चुड्या पाजळल्या आणि रण शोधण्याचा आरंभ केला. वानर त्या वेळीं महावृक्ष उन्मळून पडल्याप्रमाणें जागोजागीं पड-

लेले होते. त्यांत जांबुवंत दृष्टीस पडतांच मारुतीनें त्याला हात देऊन उठविलें, तेव्हां तो नेत्रांत अश्रु आणून रामलक्ष्मण सुखी आहेत काय? असें विचारूं लागला. तें ऐकतांच दोघांनींही रुदन करीत ते निश्चेष्ट पडले आहेत असें सांगितलें. तेव्हां ऋक्षपाळ म्हणाला—जर कोणी द्रोणाचळ घेऊन येईल तर त्यावरील दिव्य-औषधींच्या सुवासानें आपलें सर्वसैन्य सावध होईल. कोणीतरी जाऊन सूर्योदयाच्या आंत त्यावरील वल्ली आणल्या पाहिजेत. असें ऐकतांच मारुतीला आवेश आला व तो बिभीषणास म्हणाला—तुम्ही सूर्योदयापर्यंत दोन्ही मूर्ति नीट संरक्षण करा, मी द्रोणाचळावरील वल्ली घेऊन येतों; मला ठाऊक आहे. क्षीराब्धीच्या पैलतीरीं चार कोटि योजनांवर द्रोणाचळ आहे. असें बोलून त्यानें रामस्मरणपूर्वक उड्डाण केलें आणि एका क्षणांत सप्तद्वीपें व सप्तसमुद्र ओलांडून तो त्या द्रोणाचळाजवळ जाऊन उभा राहिला. नंतर त्या पर्वतापुढें हात जोडून त्याची स्तुति करीत असतां म्हणाला—हेनगोत्तमा, तुझें स्मरण करितांच सर्व रोग पळून जातात, तरी सांप्रतकालीं रामलक्ष्मण शरजाळांत सांपडले आहेत; म्हणून मी तुजपाशीं दिव्य औषधींची याचना करण्यासाठीं आलों आहें. असें ऐकतांच तो मूर्तिमंत द्रोणाचळ प्रगट होऊन म्हणाला—मर्कटा, रामलक्ष्मण कोण? व तूं कोठून आलासरे? मूर्खा, देवांसही दुर्लभ ज्या औषधी त्या तुला कशा मिळतील? या गोष्टीचा तूं आपल्या मनांत मुळींच विचार केला नाहींस. तुला जर जीवाशा असेल, तर तूंच माझ्या आश्रयानें रहा.' असें ऐकतांच मारुतीला क्रोध आला आणि तो त्याला म्हणाला—हे पाषाणहृदया द्रोणाचला, तूं मंदबुद्धि आहेस; म्हणून तुला, कार्याकार्य कळत

नाहीं. तर पहा आतां माझा पराक्रम ? असें ह्मणून त्यानें त्या द्रोणाचळाला पुच्छानें बांधलें आणि सहस्रसौदामिनींच्या दीप्तीप्रमाणें तो पर्वत मारुती आपल्या हातावर घेऊन जो आकाशांत उडाला, तो रात्रीच्या चौथ्या प्रहरीं सुवेळेवर येऊन उभा राहिला. त्याला. पाहतांच नूतन लंकापति बिभीषण धांवत पुढें आला व त्यानें मारुतीला आलिंगन दिलें. इतक्यांत थंडगार वाऱ्याची झुळूक, द्रोणाचळावरील दिव्य औषधींचा सुवास घेऊन वाहूं लागली. त्या सुवासानें रामासह सर्वसैन्य सावध झालें. सर्वांच्या अंगावरील जखमाही त्या दिव्यौषधींच्या सुवासानें भरून आल्या. नंतर जसा चेंडू उडवीत जातात त्याप्रमाणें तो मारुती त्या पर्वताला जागच्याजागीं ठेवून आला.

नंतर देवांनीं वेष्टित इंद्र जसा सभेंत बसतो, तसा कपिवेष्टित राम सुवेळावर सभा करून बसला; त्या वेळेस सर्व कपि जयजयकार करूं लागले. रामानें मारुतीला हृदयाजवळ धरून त्याचा फार गौरव केला आणि सर्व शांतता झाल्यावर सुग्रीव सर्व कपिगणांस ह्मणाला— आतां लंकेवर जाऊन सर्व सदनांस अग्नि लावा. असें ऐकतांच नळ, नीळ, मारुती इत्यादि अठरापद्में हरिगण चुडी पेटवून निघाले व ते रामभवानीचे दिवटे रणांगणांत गोंधळ घालण्यास तयार झाले. सर्व वानर चुडी घेऊन " जययशस्वीरघुवीर " असें ह्मणून भुभुःकार करीत जेव्हां लंकादुर्गाच्या आंत गेले, तेव्हां अद्भुत प्रभंजन वाहूं लागला. ते वानर प्रत्येक सदनाला अग्न लावूं लागल्यामुळें दशदिशा धूम्रानें व्याप्त झाल्यां; कोणास कोणी दिसेना. अग्नीच्या ज्वाळा आकाशापर्यंत जाऊं लागल्या व सर्व लोक एकच कल्लोळ करूं लागले. कोट्यावधि घरें जळूं लागल्यामुळें राक्षसस्त्रिया अहाळूं लागल्या. राक्षसांस पाहतांच वानर चुडीनें भाजूं लागले.

रावण सभेंत बसला होता, त्याला कळलें कीं, मारुतीनें द्रोणाचळ आणून सर्व कपिसैन्य सावध केलें आणि सर्व कपि चुडी पाजळून लंकानगर जाळीत आहेत; हें वर्तमान समजतांच जंघ, प्रजंघ, क्रोधन, विरूपाक्ष, शोणिताक्ष, कुंभ आणि निकुंभ नामक आपल्या सात पुत्रांस रावणानें वानरांचें निवारण करण्यासाठीं सैन्यासह पाठविलें. त्यांनीं पहिल्यानें पर्जन्यास्त्र टाकून अग्नि शांत केला; तेव्हां राक्षस आणि वानर सर्व महाक्रोधानें सिंहनाद करीत रणभूमींत आले आणि तुंबळ युद्ध करूं लागले.

अंगद रणभूमींतील सेनामुखावरच होता, त्यानें क्रोधनाच्या रथावर पर्वत टाकून अश्वसारथ्यांसह त्याचें चूर्ण केलें. तों जंघ, प्रजंघ आणि विरूपाक्ष हे तिघे त्याजवर धांवून आले; पण अंगदानें एक प्रचंड वृक्ष उपटून जंघ व प्रजंघ यांचा वध केला. इतक्यांत विरूपाक्ष बाणांनीं वानरसेना जर्जर करूं लागला, त्याला मैंदानें गतप्राण केलें आणि शरभानें शोणिताक्षाचा वध केला, तेव्हां कुंभकर्णाचा पुत्र पुढें आला आणि त्यानें नऊ बाण सोडून मैंद व शरभ यांस खिळून टाकलें. इतक्यांत अंगद विशाळ पर्वत घेऊन त्याजवर धांवत आला, पण त्या कुंभानें बाण सोडून पर्वतासह त्याचे हस्त खिळून टाकले, तेव्हां वानरवीरांत हाहाःकार झाला. तो ऐकतांच सुग्रीव जो वेगानें आला, तो कुंभाच्या हृदयावर आदळला आणि त्यानें त्याच्या हातांतील चाप घेऊन मोडून टाकलें. नंतर दोघांचें एक घटकाभर मल्लयुद्ध होत असतां शेवटीं सुग्रीवानें कुंभाच्या हृदयावर मुष्टिप्रहार करून त्याचा प्राण घेतला.

नंतर मोठ्या आवेशानें निकुंभ सुग्रीवावर धांवून आला, इतक्यांत मारुतीनें त्या निकुंभावर एक पर्वत टाकला; तो त्यानें मुष्टिघातानें

फोडून टाकला. तेव्हां मारुतीनें एक विशाळ वृक्ष उपटून त्याला मारला, पण त्याचेही त्यानें तुकडे करितांच मारुतीला कोप आला आणि त्यानें एक शतशृंगांचा विशाळ पर्वत टाकून निकुंभाचा चुराडा उडविला. नंतर बाकीच्या राक्षसांसही जेव्हां वानर अनिवार मार देऊं लागले, तेव्हां कित्येक मरण पावले आणि कित्येक घायाळ लंकेंत पळून गेले.

जेव्हां रावणानें सातही पुत्र मरण पावले ' असें ऐकलें, तेव्हां त्याला फार शोक झाला. तरी त्यानें खराक्ष, विशालाक्ष आणि मकराक्ष या तिघांस आज्ञा करून रणांत पाठविलें. ते सैन्यासह रणांत येतांच कुंत, असिलता, परिघ इत्यादि शस्त्रांचा वानरांवर वर्षाव करूं लागले. तेव्हां वानरही वृक्षपाषाणांचा वर्षाव करीत राक्षससैन्यांत मिसळले आणि जेव्हां राक्षसांस झोडूं लागले, तेव्हां त्यांचा मोड होण्याचा रंग दिसूं लागला. आपल्या सेनेचा मोड पहातांच मकराक्षानें जी अद्भुत बाणवृष्टि केली, ती सहन न झाल्यामुळें वानरवीर माघार घेऊं लागले; पण इतक्यांत त्याच्या हस्तलाघवाविषयीं मान डोलवून रामानें चापाला गुण चढवून एकच शर सोडला आणि त्याच्या असंख्य बाणांचें निवारण केलें नंतर दुसरा एक बाण सोडून प्रभूनें त्या मकराक्षाला मोक्षास पाठविलें. इतक्यांत खराक्ष आणि विशालाक्ष त्या कमलाक्ष रामाला युद्धास पाचारण करूं लागले. ते रामाला ह्मणाले—मानवा, प्रत्येक वेळीं 'तुझ्याच बाणांला जय मिळेल, असें तूं मानूं नको. काकतालीय. न्यायानें अकस्मात् मकराक्षाचा तुझ्या बाणानें वध झाला, परंतु आतां आमचे हे प्रखर शर सहन कर. असें बोलून ते दोघे अती-

चपलतेनें बाणवर्षाव करूं लागले. तरी रामानें एकाच शरानें त्यांच्या सर्व बाणांचें निवारण करून दोन बाण टाकले आणि दोघांसही गतप्राण केलें.

तें वर्तमान रावणाला कळतांच त्याची आज्ञा घेऊन इंद्रजीत सेनेसह रणांत धांवत आला व हवन करून त्यानें एक कृत्या निर्माण केली आणि तिच्या आड बसून बाणवर्षाव करूं लागला. तेव्हां सर्व वानर भयभीत झाले. इतक्यांत वायूनें येऊन रामाच्या कानांत सांगितलें कीं, अंगिरास्त्र सोडून कृत्येचें भस्म कर; म्हणजे इंद्रजीत दृष्टीस पडेल. असें ऐकतांच रामानें अंगिरास्त्र सोडलें व कृत्या भस्म होतांच इंद्रजीत रणांत येऊन उभा राहिला व अपार शरवर्षाव करूं लागला. इंद्रजिताला रणांत उभा पाहतांच सर्व वानर चौताळले, मारुती रागानें पर्वत घेऊन त्याजवर धांवला, बिभीषणानें गदा घेऊन चाल केली, परिघ हातांत घेऊन मैंद इंद्रजितावर गेला, याप्रमाणें सर्व वानर त्याजवर शिळा, वृक्ष, पर्वत आणि शस्त्रास्त्रें यांचा वर्षाव करूं लागले आणि रामलक्ष्मणही त्या इंद्रजितावर शर टाकूं लागले; परंतु त्यानें सर्वांचें निवारण करून असंख्य शरांनीं रामसौमित्रांसह सर्व वानरांस विकळ करून जयवाद्यें वाजवीत लंकेचा मार्ग धरिला.

रावणाच्या सभेंत जाऊन इंद्रजितानें जेव्हां आपली जयवार्ता त्याला कळविली, तेव्हां तो दशवदन आपल्या तनयास म्हणाला– पुत्रा, तूं वारंवार शत्रूचा पराभव करून परत येतोस हें खरें आहे, तरी रात्र संपतांच सूर्योदय झाल्याप्रमाणें ते शत्रू वरचेवर सावध होऊन पीडा करूं लागतात; त्यामुळें तो विजयानंद टिकून रहात नाहीं. असें

ऐकतांच इंद्रजीत प्रतिज्ञा करून ह्मणाला कीं, आतां जर रामलक्ष्मणांसह सर्व मर्कटसैन्याचा मी वध न करीन, तर तुह्मांला हें वदन कधींही दाखविणार नाहीं. जर माझ्या हातून ते मरण पावले नाहींत, तर तुमची व माझी हीच शेवटची भेट. असें बोलून त्यानें रावणाला शेवटचा नमस्कार केला आणि असंख्य सेना सिद्ध करून मोठ्या आवेशानें त्या शक्रजितानें रणभूमीचा मार्ग धरिला.



# अध्याय २९ वा.

इंद्रजितानें सैन्यासह रणांत येतांच आधीं कापट्यमंत्र एक कृत्रिम सीता निर्माण करून रथावर बसविली आणि से रुद्रावतार मारुती बसला होता, त्याला दाखवून ह्मणा मुखी ही तुझी स्वामिणी पहा? ही या त्रेतायुगांतील एक कृ –मर्कटा, रामाला वरून आमचा कुलक्षय केला. पंचव ीच होय! हिनें होण्यास कारण हीच कृत्या! कुंभक –पासून राक्षसांचा संहार ादिकांचा ग्रास हिनेंच केला! ही अत्यंत सुंदर ह्मणून वणानें आणली आणि कुलक्षय करून घेण्याचा प्रसंग आ ली. ही महापातकी स्त्री आहे, हें जर पहिल्यानेंच कळतें, तर ानें हिला आणलेंच नसतें. आतां ज्यापेक्षां हिच्या योगानें चा सर्वस्वी नाश झाला, त्यापेक्षां हिचाही नाशच करावा, ह्मणजे हीं अंशीं सूड उगविल्यासारखेंच होईल. असें बोलून त्यानें शस्त्र आणि त्या कृत्रिम सीतेचा वध केला. त्यानें तिचें शिर तोडून िला दाखविलें आणि ह्मणाला–रामाकडे जाऊन त्याला सांग ां अयोध्येस चालताहो, तुझ्या युद्धाचें कारण आतां अगदीं सं हे. असें बोलून त्यानें त्या कृत्रिमसीतेचें प्रेत तेथेंच मारुतीसम कलें आणि अ रथप्रामीस्तव निकुंबळेस जाऊन एका अति ीं न आ

ली पाहतांच मारुती एक घटकाभर अग आणि सावध होऊन फारच विलाप करूं ामाकडे जाऊन त्याला काय सांगावें? हें वर्तमान ंद्र प्राणत्याग करील! ज्या मुखानें पूर्वी जनकत ी आहे असें सांगितलें; त्याच मुखानें तिचा नाश झाला

...सांगूं ? बरें, ही गोष्ट गुप्त ठेवावी, तरीही दूषणच लागणार ! ह्मणून ...द अनेक गोष्टी मनांत येत असल्यामुळें तो स्फुंदस्फुंदत अधोवदनानें रामाजवळ आला. त्याची तशी स्थिति पाहतांच सर्व कपि भयभीत झाले आणि रामलक्ष्मणांसही कांहीं विपरीत वर्तमान आहे असें वाटलें. इतक्यांत हनुमंतानें आक्रोश करीत असतां लोळण घेऊन वक्षःस्थल बडवीत सांगितलें कीं—इंद्रजितानें जनकतनयेला रणांत आणून माझ्या समक्ष तिचा वध केला. असें ऐकतांच दोघेही दाशरथी दुःखानें उचंबळले. दोघांच्याही नेत्रांतून अश्रुधारा चालूं लागल्या आणि सर्व सैन्यांत मोठा हाहाःकार उडाला. मंगलरूप राम मंगलभगिनीचे गुण आठवून विलाप करूं लागला. तेव्हां लक्ष्मण शांतवन करीत असतां रामाला ह्मणाला—प्रभो, मिथ्या वस्तूची खंती काय ह्मणून करावी ? जें आकारास आलें, त्याचा लय होणार, हें जर निश्चयात्मक आहे; तर विवेकवज्रानें मोहपर्वताचे तुकडे उडवावे असें आपणास गुरुजींनीं अनेक प्रकारांनीं शिकविलें आहे. हा सर्व तुझ्या मायेचा खेळ होय. जानकी जर मरण पावली, तर ती तुला सोडून कोठें जाईल ? दीपाला प्रभा सोडून गेली, असें कधीं तरी झालें आहे ? तूं अनादिकालापासून तिचा पति आहेस; तर पार्वतीप्रमाणें ती पुनः उत्पन्न होऊन तुला वरील. तर आतां शोकाचा त्याग करावा. तुझ्या कृपेनें मी सपरिवार रावणाचा वध करून देवतांचें बंदिमोचन करीन आणि बिभीषणाला राज्यावर बसवीन. याप्रमाणें लक्ष्मण भाषण करीत असतां राम शोकानें अधोवदन होऊन बसला आणि सर्व वानर चिंताक्रांत झाले.

रामासह सर्व कपिसेना विमनस्क होतांच बिभीषणानें सीतेच्या समाचारासाठीं गुप्त हेर पाठविले होते, त्यांनीं येऊन जानकी कुश-

लवृत्त बिभीषणाला कळवितांच तो स्मितवदनानें रामाजवळ आला आणि हात जोडून ह्मणाला—प्रभो, जानकी अशोकवनांत सुखी आहे. मी दूत पाठवून मुद्दाम हा समाचार आणला आहे. इंद्रजितानें कपटी जानकीचा वध केला, पण ह्या निष्कपट हनुमंतास सत्य वाटलें. असें ऐकतांच सर्व कपि जयशब्द करूं लागले आणि रामलक्ष्मणांचीं मुखकमलें टवटवीत झालीं. नंतर बिभीषण पुनः सांगूं लागला. महाराज, निकुंबळाभुवनीं इंद्रजितानें कपटहोमाला आरंभ केला आहे, त्याच्या होमधूम्रानें आकाश व्याप्त झालें आहे व अवदानांचा परिमळ सुटला आहे. अश्व, सारथी आणि धनुष्यासह अर्धा विजयरथ बाहेर निघाला आहे; तो जर पूर्ण निघून इंद्रजिताला मिळाला, तर कांहीं इंद्रजीत आपणांस आटपणार नाहीं. त्यानें चार वेळ रणांत येऊन जय संपादन केला आहे; यासाठीं आतां पहिल्यानें त्याच्या हवनाचा विध्वंस केला पाहिजे. जो बारा वर्षेंपर्यंत निराहार व स्त्री असतांही ब्रह्मचारी असेल, त्याच्या हातून इंद्रजिताचा वध होईल असें भविष्य आहे.

याप्रमाणें बिभीषणाचें भाषण ऐकतांच रामानें लक्ष्मणाकडे पाहिलें; तों तो चाप सज्ज करून सिद्धच होता. तेव्हां त्याची बालयदशा पाहून रामाला कळवळा आला. नंतर त्यानें आपल्या त्या अनुजाला हृदयाजवळ धरून त्याच्या कर्णांत मंत्रोपदेश केला आणि त्याच्या मस्तकावर कृपाकर ठेवून ‘ विजयश्री संपादन करून ये ’ अशी आज्ञा केली व त्याला बिभीषण आणि मारुती यांच्या हवालीं केलें. तेव्हां नळ, नीळ, जांबुवंत, अंगद, गवय, गवाक्ष, ऋषभ, मैंद, केसरी इत्यादि असंख्यात वानर त्याच्याबरोबर निघाले. त्या सर्वांना मार्ग दाखविण्यासाठीं बिभीषण पुढें चालूं लागला. अंगदानें

लक्ष्मणाला खांद्यावर घेतलें आणि लंकादुर्गाहूनही अतिकठिण, असा सुवेळेचा मार्ग पुढें येतांच बिभीषण सर्व कपींस ह्मणाला— आतां सर्वजण्मांनीं उड्डाण करून जेथें इंद्रजीत हवन करीत बसला आहे, तेथें जातांच पहिल्यानें त्याच्या हवनाचा विध्वंस करावा. असें बोलून सर्व आकाशमार्गानें निकुंबळेंत जेथें इंद्रजीत हवन करीत बसला होता तेथें आले; परंतु त्यानें आपल्यासभोंवतीं रक्षणार्थ सेनेचे सात परिघ ठेविले होते; परंतु त्या परिघांचें खंडण करून हातांत विशाळ पर्वत घेऊन ज्या विवरांत इंद्रजीत हवन करीत बसला होता, त्या विवरांत ऋषभ, गवय व हनुमंत यांनीं प्रवेश केला. इंद्रजिताच्या सभोंवतीं कित्येक भूतावळी त्याच्या रक्षणार्थ उभ्या होत्या; त्या सर्व मारुतीनें पळविल्या. तेव्हां तो पापमूर्ती इंद्रजीत वज्रासनावर बसलेला त्यांच्या दृष्टीस पडला. त्यानें रक्तोदकानें स्नान करून रक्तवस्त्रच परिधान केलें होतें, आसनासाठीं सात प्रेतें पसरलीं होतीं, पिंगट जटा मोकळ्या सोडल्या होत्या व त्यांतून रक्त थबथबत होतें. ब्राह्मणांचीं प्रेतें अवदानें देण्यासाठीं जवळ ठेविलीं होतीं, त्याच्या गळ्यांत अस्थिमाळा असून डोकीला मेलेले सर्प गुंडाळले होते. द्विजदंतांच्या लाह्या आणि साजुक मांस, अशी भयंकर यज्ञसामग्री जवळ घेऊन तो नेत्र मिटून अग्निमुखीं अवदानें समर्पण करीत होता व कोटिसूर्याहून प्रकाशमान विजयरथ अग्निकुंडाबाहेर अर्ध्याहून अधिक निघाला होता; इतक्यांत 'अभाग्याला दिव्यनिधानप्राप्तीच्या समयीं जसें विघ्न यावें' तसा मारुतीनें हातांतील विशाळ पर्वत त्याच्या अग्निकुंडावर टाकून त्याचा विध्वंस केला. अग्नि चोहोंकडे विखुरतांच आराध्यदैवत कोपलें आणि बाहेर येत असलेला रथ पुनः अग्नींत गुप्त

झाला. ऋषभानें सर्व यज्ञपात्रें फोडून इंद्रजिताच्या अंगावर देहधर्म आरंभिला. इतक्यांत वानरांचा गलबला कानीं आल्यामुळें इंद्रजीत सावध झाला आणि सर्व विपरीत कृत्य पाहतांच फार दुःख मानूं लागला. आपलें आयुष्यसिंधूजल आजपासून आटलें, असेंही त्याच्या मनांत आलें. इतक्यांत आणखीही कित्येक वानर आपल्या सभोंवती जमताहेत, असें त्याच्या ध्यानांत आलें आणि मग विलंब न लावतां तो त्या जाग्यावरून उठला. सर्व मर्कटांस त्यानें तेथून हांकून लाविलें आणि दुसरा दिव्य स्यंदन आणवून त्यावर तो इंद्रजीत बसला आणि अपार दळासह निकुंबळेबाहेर आला, तों त्या ठिकाणीं कपिसैन्यांसह लक्ष्मण युद्धाच्या तयारीनें त्याची वाट पहातच उभा राहिलेला होता.

तो महाकपटी इंद्रजीत रागानें कराकर दांत खात रणभूमींत येऊन उभा राहतांच लक्ष्मणानें धनुष्य चढविलें आणि वज्रठाण मांडून चापावर दिव्य बाणाची योजना केली. तेव्हां सर्व देव लक्ष्मणाचें कल्याण चिंतूं लागले. इतक्यांत इंद्रजीत लक्ष्मणास ह्मणाला—ज्या प्रमाणें एखादा हरिण शार्दुलाजवळ झोंबी घेण्यासाठीं येतो; त्याप्रमाणें आज तूं मजबरोबर युद्ध करण्यासाठीं आला आहेस, परंतु माझे अनिवार प्रखर शर कसे सहन करशीलरे मानवा ? असें ऐकतांच लक्ष्मण ह्मणाला—भस्माच्छादित लहान अग्नि जसा महाकाननास जाळून टाकितो, तसा मी जरी तुला लहान दिसतों, तरी तुला खंडविखंड करून देवादिकांची इच्छा पूर्ण करीन. असें ऐकतांच इंद्रजितानें क्रोधेंकरून प्रळयचपळेसारखा एक बाण लक्ष्मणावर सोडला; पण त्या जनकाच्या कनिष्ठ जामातानें त्याचा तो बाण आपल्या बाणानें तोडून टाकला. नंतर इंद्रजितानें असंख्यात शर सोडले, तरीं लक्ष्मणानें एका बाणानेंच त्या सर्व बाणांचें

निवारण केलें. सौमित्रानें एक शर सोडतांच त्याचे अनेक शर व्हावे व जिकडे तिकडे पसरावे असे लक्षावधि बाण सौमित्रानें सोडले; तेव्हां इंद्रजितानें त्याच्या हस्तलाघवाबद्दल मान डोलविली आणि त्या सर्व बाणांचें निवारण केलें. नंतर इंद्रजितानें मंत्रजप करून लक्ष्मणावर पर्जन्यास्त्र सोडतांच लक्ष्मणानें वातास्त्र टाकून त्याचें निवारण केलें. तेव्हां इंद्रजितानें पर्वतास्त्र सोडलें, तें पाहतांच लक्ष्मणानें वज्रास्त्र सोडून पर्वतांचें चूर्ण केलें. इंद्रजितानें वडवानलास्त्र सोडतांच लक्ष्मणानें सागरास्त्र सोडून त्याचें निवारण केलें. तरी इतक्यांत इंद्रजिताचें सैन्य समुद्राच्या लाटांनीं वाहूं लागलें, तेव्हां इंद्रजितानें अगस्तिमंत्राचा जप करून सागराचें शोषण करविलें. नंतर त्या दशाननपुत्रानें पापास्त्र सोडतांच लक्ष्मणानें नाममंत्राचा जप करून बाण सोडला. इंद्र-जितानें माहेश्वर्यास्त्र सोडतांच लक्ष्मणानें ब्रह्मास्त्र सोडलें. याप्रमाणें श-स्त्रास्त्रांचें कौतुकयुद्ध चाललें असतां जांबुवंत, हनुमंत आणि सर्व देव तटस्थ होऊन पहात होते.

इंद्रजीत महापराक्रमी होता व तो त्याबद्दल अभिमानही बाळगीत असे; परंतु लक्ष्मणाचें हस्तलाघव पाहतांच तो क्षणभर चकित झाला आणि कांहीं वेळानें मनांत पूर्ण मत्सर आणून त्यानें पांच बाण प्रखर निवडून काढले आणि ते त्याणें लक्ष्मणाचें वक्षःस्थळ लक्षून अकस्मात् सोडले. ते मेरुमांदारांस चूर्ण करणारे पांच बाण अकस्मात् येऊन सौमित्राच्या हृदयांत संचरले, पण तो भोगेंद्रावतार लक्ष्मणच होता; ह्मणून त्यानें ते सहन केले आणि स्वतः प्रखर नऊ बाण सोडले, ते इंद्रजिताच्या कपाळावर लागून मोरांच्या पिसांप्रमाणें कपाळांत संपूर्ण-रुपून राहिले.

लक्ष्मणाची बाल्यदशा आणि इंद्रजीत भयंकर योद्धा, असें जाणून बिभीषण लक्ष्मणाला विसावा देण्यासाठीं गदा झेलीत पुढें आला व गरगर फिरवून त्यानें ती इंद्रजितावर टाकली, पण त्यानें एकच बाण सोडून ती बाजूला आडवी पाडली आणि पांच बाण सोडून बिभीषणाला जागच्याजागीं खिळून टाकलें इतक्यांत जांबुवंत धांवत आला आणि त्यानें हाताच्या एका चापटीनें इंद्रजिताच्या रथाचें अश्वांसह चूर्ण केलें. तेव्हां इंद्रजीत विरथ होऊन भूमीवर उभा राहिला व युद्ध करूं लागला, तों मारुतीनें एक महापर्वत त्याच्या अंगावर टाकला. त्याबरोबर नळ, नीळ, ऋषभ, अंगद इत्यादि सर्व वानर त्या रावणीवर शिळा व पर्वतांचा वर्षाव करूं लागले; परंतु त्या महापराक्रमी चतुर रणपंडित इंद्रजितानें बाण टाकून तितक्यांचेंही निवारण केलें. नंतर तो इंद्रजीत अकस्मात् उडाला आणि मेघाआड जाऊन त्यानें कपीवर बाणवर्षाव आरंभिला. सौमित्राचें उड्डाण गोजिरवाणें म्हणून मारुतीनें त्याला आपल्या हातावर घेतलें आणि इंद्रजीत बारागांवें उंच होता, त्यापेक्षां उंच शतगांवें भयंकर रूप धारण केलें. लक्ष्मणानें मारुतीच्या हातावर ठाण मांडून इंद्रजितावर बाणवृष्टि करितांच इंद्रजीत पृथ्वीवर आला; तेव्हां लक्ष्मणही खालीं उतरला. सर्व देव आणि ऋषि लक्ष्मणाचें कल्याण चिंतूं लागले. त्याच्या पाठिशीं महाकपिभार जयशब्दानें गर्जना करूं लागला आणि इंद्रजीत व लक्ष्मणही सिंहनादें करून ब्रह्मांड गाजवूं लागले. नंतर शिवाच्या तृतीय नेत्रांतील अग्नीप्रमाणें लक्ष्मणानें एक दिव्य रामनामांकित बाण काढला आणि चाप आकर्ण ओढल्यावर असें चिंतन केलें कीं, 'पूर्णब्रह्मसनातन राम सूर्य-

वंशीं अवतरला ' हें जर सत्य असेल, व ' माझी स्त्री असून मी जर आज चौदा वर्षें ब्रह्मचारी व निराहारी असेन ' आणि ' जगन्माता मंगलभगिनी सीता सत्य पतिव्रता असून, मारुती सत्य रामोपासक असेल ' त्याचप्रमाणें ' शिवकंठींचें हालाहल रामनामानें शमलें ' हें जर सत्य असेल तर या बाणानें इंद्रजिताचें शिर तुटेल. असें चिंतून इंद्रजिताच्या कंठावर त्यानें तो बाण सोडतांच आकाशांतून गर्जना करीत इंद्रजितावर आला; तो तीव्र बाण पाहतांच इंद्रजितानें चापावर बाण-लाविला, इतक्यांत लक्ष्मणाच्या बाणानें त्याच्या भुजेसह त्या शक्रजिताचा शिरच्छेद केला. वांकड्या विळ्यानें कृषीवल ज्याप्रमाणें कणीस तोडतो, त्याप्रमाणें तो बाण भुज व शिर छेदून गेला, तो भुज लंकेवर उडाला आणि शिर भूमंडळावर उतरलें, तें ऋषभ वानरानें झेललें. त्या वेळेस देव, ऋषि आणि कपि यांचा एकच जयजयकार झाला. इंद्रानें आकाशांत विजयदुंदुभि वाजविल्या आणि मांदारसुमनांची वृष्टि केली. इंद्राला परमानंद झाला आणि तो आपला भाग्योदय झाला असें मानूं लागला. इंद्रजीत रणांत पडतांच त्याची अवशिष्ट सेना दीनवदनानें पळून जाऊं लागली.

संपूर्ण जयप्राप्ति झाल्यामुळें बिभीषण, मारुती, अंगद इत्यादि वीर वारंवार लक्ष्मणाची स्तुति करूं लागले. लक्ष्मणाला इंद्रजिताचे असंख्य शर लागले होते व त्यामुळें त्याची तनु जर्जर झाली होती; म्हणून मारुतीनें त्याला आपल्या खांद्यावर घेतलें, नंतर सुवेळाचळाचा पंथ धरून कपिसेना निघाली असतां, इंद्रजिताचें शिर रामाला दाखविण्यासाठीं ऋषभवानरानें बरोबर घेतलें.

इकडे सुग्रीव आणि राम, लक्ष्मणाविषयीं चिंता करीत असतां

कित्येक वानर पुढें धांवत आले आणि इंद्रजिताचा वध करून सौमित्रस्वामि येत आहेत, असें सांगूं लागले. तेव्हां दोघेही त्या विजयी लक्ष्मणाला पाहण्याकरितां पुढें धांवले, इतक्यांत रामाला पाहिल्याबरोबर लक्ष्मण हनुमंताच्या स्कंधावरून खालीं उतरला आणि हळू हळू चालूं लागला. राम जवळ आलेला पाहतांच लक्ष्मणानें साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां रामानें त्याला उठवून प्रेमानें हृदयाजवळ धरलें आणि त्याचा अनेक प्रकारें गौरव केला. बिभीषण, हनुमंत, जांबुवंतादि सर्वांनीं रामचरणीं शिरकमलें नमविलीं. ऋषभवानरानें इंद्रजिताचें शिर रामापुढें ठेवून साष्टांग नमस्कार केला; तेव्हां रामानें त्याला सांगितलें कीं, या शिराची आरक्तपुष्पांनीं पूजा करून ठेव, जो कोणी मागायाला येईल त्याला हें दिलें पाहिजे. नंतर सौमित्राचें शरीर बाणव्यथित पाहून सुषेणवैद्याला रामानें आज्ञा केली कीं, तूं चतुरवैद्य आहेस; तर सौमित्राला उपचार कर. असें ऐकतांच सुषेणानें दिव्य औषधि देऊन लक्ष्मणाची व्यथा हरण केली. नंतर बिभीषणानें युद्धांतील सविस्तर वर्तमान रामाला कथन केलें. प्रत्येकाचा पराक्रम ऐकून रामाला परमसंतोष वाटला आणि इंद्रजितासारखा पुरुषार्थी वीर होणें नाहीं; असें ह्मणून त्यानें त्याची स्तुति केली.

---

अध्याय ३०वा.



# अध्याय ३० वा.

लक्ष्मणाच्या बाणानें इंद्रजिताचें शिर तुटलें, तें तर ऋषभवानरानें सुवेळेवर नेलें आणि भुजदंड तुटला होता, तो लंकादुर्गावर आदळून अकस्मात् सुलोचनेच्या अंगणांत येऊन पडला. रावणाची सून केवळ लावण्याची खाण सुलोचना आनंदानें आपल्या मंदिरांत बसली असतां तो पर्वतशिखराप्रमाणें इंद्रजिताचा महाबाहु अंगणांत पडतांच त्या दणक्यानें दचकली; तों भयभीत झालेल्या दासी सांगत आल्या कीं, कोण्या वीराचा महाभुज आकाशमार्गानें येऊन आपल्या अंगणांत पडला आहे, हे शब्द ऐकतांच सुलोचनेचें काळीज करपल्याप्रमाणें तिला वाटलें. कंठ सद्गदित झाला आणि नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. सर्वांग विकळ झाल्यामुळें तिच्यानें पाऊल पुढें टाकवेना. तिनें आपल्या वदनांतील तांबूल काढून टाकला आणि सख्यांस ह्मणाली– बायानों, प्राणनाथ आज रणांत गेले आहेत, त्यामुळें माझ्या मनाला फार हुरहुर लागली आहे.

याप्रमाणें भाषण करीत हळहळ ती सुलोचना अंगणांत येतांच तिनें आपल्या पतीचा भुजदंड ओळखला आणि अत्याक्रोशानें धरणीवर अंग टाकून ती विलाप करूं लागली. तिला आपल्या सौभाग्याचें जहाज बुडालें असें वाटलें आणि ती अनेक प्रकारांनीं पतीचे गुण आठवून शोक करूं लागली, सख्यांनीं तिला सांवरून बसविलें. नंतर ती पतीची महाभुजा हृदयाजवळ धरून ती त्या भुजेला ह्मणाली–प्राणपतीला कोणत्या कारणानें व कसें पंचत्व प्राप्त झालें; तें वर्तमान मला लिहून दाखीव. जर माझें मन पतिचरणीं दृढ असेल, तरच तें

वर्तमान लिहून विदित करण्याची शक्ति तुझ्यांत येईल. असें बोलून मषीपात्र, भूर्जपत्र आणि लेखणी पुढें ठेवितांच तो महाभुज लिहूं लागला. सर्व वर्तमान लिहून लेखणी बंद होतांच सुलोचनेनें तें पत्र घेऊन मस्तकीं वंदिलें आणि मंजुळस्वरानें वाचनाला आरंभ केला, तेव्हां सर्व सख्या ऐकूं लागल्या.

"हे मन्मानससरोवरमरालिके दशशतमुखतनये प्राणवल्लभे सुलोचने मी जयाशा धरून गूढस्थळीं विवरांत हवन करीत असतां, अग्नींतून दिव्यस्यंदन अर्धा बाहेर निघाला; इतक्यांत फळप्राप्तीचा समय लक्षून शत्रुसेना धांवत आली आणि हवनावर चंडशिळा घालून त्यांनीं आराध्यदैवत क्षोभविलें. त्यावेळेस पर्वत चढून शिखरावर जावें आणि तेथून अकस्मात् पडावें, किंवा सगळी नदी उतरून तीरासमीप येऊन बुडावें अथवा वैराग्यज्ञानप्राप्तीच्या समयीं अकस्मात् विषयांनीं येऊन घाला घालावा, तशी माझी अवस्था झाली. होणार चुकत नाहीं, या नियमाप्रमाणें माझें दैव उणें पडलें. पुढें घोर संग्राम केला परंतु मला जय पारखा झाला आणि सौमित्राचा पराक्रम वाढविण्याकरितां त्याला जाऊन मिळाला. तो दाशरथी महापराक्रमी वीर लक्ष्मण, त्याची अपार धनुर्विद्या पाहून त्याला मी आपलें शिर दिलें आणि रामाचें मित्रत्व जोडलें. देहाशा धरून बिभीषण रामाला शरण गेला; पण मी देहत्रय निरसून विदेहजामात मित्र केला. महातपस्वी सौमित्र बहुत दिवस निराहारी राहून मुद्दाम माझें शिर मागण्यासाठीं समुद्र उतरून आला, तेव्हां मीही कृपणता टाकून त्याला आत्मशिराचें दान केलें; तें नेऊन त्यानें रामचरणीं अर्पण केलें आहे. शरीर रणांत उभें आहे आणि तुला हा बाहु मूळ पाठविला आहे; तर विवेकवारूवर बसून त्वरेनें मजपाशीं ये.

मी मायानदी उल्लंघन करून पैलतीरीं तुझी वाट पहात उभा राहिलों आहें. या दुःखरूपी संसाराहून रामचरणीं अपार सुख आहे. हें जाणून हा कर पाठविला आहे; तर हे धराधरनंदिनी, तूं त्वरा कर आणि लौकर ये.''

याप्रमाणें पत्र वांचतांच तिनें धरणीवर देह टाकून अपार शोक आरंभिला. ती ह्मणाली–आज बलसमुद्र आटला किंवा धैर्याचा मेरु खचला, झालें तरी काय ? हाय हाय ! इंद्रजितसूर्यास सौमित्रराहूनें पूर्ण ग्रासलें. माझ्या सौभाग्यभांडारावर सौमित्रतस्करानें अकस्मात् घाला घातला. देवा, आतां मी काय करावें ? असा अनेकप्रकारें विलाप करीत असतां पशुपक्षीही रुदन करूं लागले. नंतर तिच्या सख्या ह्मणाल्या–बाई सुलोचने, आतां तुझ्या सारख्या साध्वीनें अधिक विलाप करणें योग्य नाहीं; संसारमायेचा त्याग करून परत्र साधन करावें, तें हिताचें होईल. जें जें दिसतें तें तें अहिकुंडलवत् मिथ्या मानून आतां त्वां आत्मसाधनीं मन घालावेंस,त्यांतच तुझें कल्याण आहे. असें ऐकतांच विवेक करून सुलोचना मंदिरांत गेली, तिला सदनांतील प्रत्येक वस्तु पाहून वीट आला. तिनें क्रीडेसाठीं पाळलेले शुक, मैना, मोर, हरिण इत्यादि पशुपक्षी सोडून दिले आणि पतीचा हस्त शिबिकेंत घालून स्वतः चपळ अश्वनीवर बसून लंकानगरीचा मार्ग धरिला.

वासरमणि अस्तास गेला असल्यामुळें घोर रजनी प्रवर्तली आहे व अंधकार पडला आहे, इतक्यांत सुलोचनेचे दूत पुढें धांवत आले; त्यामुळें लंकानगरीच्या दुर्गावरील रक्षक रजनीचर गडबडून गेले, तरी त्यांनीं 'सुलोचना येत आहे' असें ऐकतांच दुर्गाचीं लघुकपाटें उघडलीं आणि तिला आंत घेतलें.

रावण मंत्रिजनांसह सभेंत विचार करीत बसला होता, इतक्यांत विपरीत वृत्तीनें स्नुषेला येतांना पाहून घाबरला, तों सुलोचनेनें येऊन श्वशुरचरणीं मस्तक ठेविलें आणि भुजेसह पत्र पुढें ठेवून सर्व वर्तमान सांगितलें आणि शेवटीं ह्मणाली—माझा प्राणप्रिय स्वर्गीं गेला आहे, त्याजसहवर्तमान मी गमन करणार! असें ऐकतांच रावणानें वक्षःस्थळ बडवून घेतलें आणि आक्रोश करीत सिंहासनावरून खालीं पडून दाहीं वदनांत मृत्तिका घालून घेऊं लागला. त्यावेळेस त्या ठिकाणच्या महाशब्दांस अंतच नाहींसा झाला. तो गलबला ऐकून मयकन्या तेथें धांवत आली आणि पुत्रमरणवृत्त ऐकतांच मूर्च्छित होऊन पडली. त्यावेळेस त्या शोकग्रस्त मंदोदरीला सांवरण्यासाठीं ऐशीं हजार राजस्त्रिया धांवून आल्या. मंदोदरी शोक करीत असतां ह्मणूं लागली—हे स्नेहाळा बालका मेघनादा, मला न विचारतां एकाएकीं रणांत कसारे गेलास! बाळा, त्रिभुवन शोधूं गेल्यासही तुझ्यासारखा पराक्रमी देवांना बंदींत घालणारा पुत्र मिळणें नाहीं! पूर्वी तीव्र तपाचरण करीत असतां मध्येंच सोडून दिलें ह्मणून अशी हानि झाली कीं काय? हें कांहीं कळत नाहीं यापमाणें ती इंद्रजितमाता शोक करीत असतां धरित्रीही कंपित झाली. सुलोचनेला हृदयाजवळ धरून मंदोदरी व रावण अपार शोक करीत असतां ती शेषदुहिता रावणास ह्मणाली—मामंजी, मला सहगमन करणें आहे; यासाठीं तेवढें सुवेळेवरून शिर आणवून द्यावें. वाट पाहतां पाहतां त्यांचे नेत्र शिणले असतील. असें ऐकतांच रावणाला क्रोध आला आणि तो सेना सिद्ध करण्याची आज्ञा करून ह्मणाला—आज घोर संग्राम करून रामसौमित्रांचीं शिरें आणीन, अथवा ज्या मार्गानें

पुत्रानें गमन केलें, तोच पंथ लक्षून मी गमन करीन. दशमुखाला कोप आला आहे, असें पाहतांच मंदोदरीनें हळूच सुलोचनेला सांगितसें कीं—बाई, आतां तूंच तेथें जाऊन आपल्या पतीचें शिर मागून आण. तो सत्वस्थ मंगळभगिनीचा वर रामचंद्र तुला पीडा करणार नाहीं. शिवाय जांबुवंत, सुग्रीवादि महाभक्त आहेत आणि अशा प्रसंगीं बिभीषणही तुझा पाठिराखाच होईल. बरें, अनायासें त्या परात्पर प्रभूच्या दर्शनलाभानें तूं जन्ममरणापासूनही मुक्त होशील. असें ऐकतांच सुलोचनेनें मान्य केलें आणि रावणाजवळ सुवेळाचलावर जाण्यासाठीं आज्ञा मागितली. तेव्हां तो ह्मणाला—तुला जर त्यांनीं ठेवून घेतलें, तर आह्मीं काय करावें बरें! सुलोचना ह्मणाली—परस्त्रीचा अभिलाष धरून आजपर्यंत कोणाला जय आला आहे आणि कोणाचें कल्याण झालें आहे? असें ऐकतांच रावणानें अधोवदनानें तिला 'जा' ह्मणून सांगितलें आणि पुनः ह्मणाला—तुजपाशीं जर त्यांनीं विपरीत वर्तणूक केली; तर त्यांचें भस्म करीन. असें ऐकतांच सुलोचना सासू सासऱ्याला वंदन करून उठली. तिनें आपल्याबरोबर बृहस्पती सारखे विचक्षण सेवक आणि पांचशें दासी घेतल्या व पुनः अश्विनीवर बसून संसारमाया टाकून संत जसे स्वरूपीं लीन होण्यासाठीं निघतात, तशी ती जगद्वंद्य रामाला शरण जाण्यासाठीं निघाली आणि मोठ्या वेगानें रामसैन्याजवळ येऊन पोंचली.

कनकाद्रीला तरुवर जसे वेष्टन करून आहेत, तसे रामाला मध्यभागीं घेऊन वानर यंत्राकार उभे आहेत, असें पाहतांच सुलोचना अश्विनीवरून खालीं उतरली आणि पायांनीं चालूं लागली. तिला पाहतांच कित्येक वानर रामाजवळ धांवत आले आणि सांगूं लागले.

प्रभो, इंद्रजिताचा वध झाला; असें ऐकतांच भय पावून रावणानें जनकतनयेला सोडून दिलें! तेव्हां रामानें त्यांना सांगितलें कीं, तो महाअभिमानी रावण मरण पावल्याशिवाय जनकजा तुह्मांला दिसणार नाहीं. इतक्यांत सुलोचना जवळ आलेली पाहतांच रामानें बिभीषणाकडे पाहिलें, तों त्याचा कंठ सद्गदित झाला आणि डोळ्यांत आसवें आणून तो ह्मणाला—हे जगद्वंद्या राजीवनेत्रा रामचंद्रा, ही इंद्रजिताची स्त्री सुलोचना; महापतिव्रता आहे, हिनें नांव घेतांच अनंत पातकें भस्म होतील; परंतु कर्मगति कशी गहन आहे पहा? जिच्या नखाग्रावर सूर्यकिरणही पडणारें नव्हे, ती पतीचें शिर मागण्यासाठीं याठिकाणीं धांवत आली आहे. इतक्यांत सुलोचना जवळ आली आणि जयजयकार करून, रामापुढें लोटांगण घालून त्या परमपवित्राचें अपार स्तवन करूं लागली. तेव्हां राम तिला ह्मणाला—माते, पुरे आतां, फार श्रम पावलीस. पतिसहवर्तमान परत्रीं अक्षय सुख भोगण्यासाठीं गमन कर. असें ऐकतांच ती त्या पुराणपुरुषाचें पुनः स्तवन करीत असतां ह्मणाली—हे भववारणविदारकपंचानना, हे पापारण्यकुठारा, हे त्रिविधतापशमना रामचंद्रा, तुझे चरण पाहतांच माझा देह पावन झाला. घागरींत आणि रांजणांत वासरमणि एकच जसा बिंबून राहतो, तसा तूं चापपाणि सर्व व्यापक आहेस. या स्त्रीदेहाकृतीला इंद्रजिताची अंगना ह्मणतात; ह्मणूनच पतिशिरासह ही आकृति अग्नींत घालावी अशी इच्छा उत्पन्न झाल्यामुळें ही अनाथ स्त्री पतिशिराची इच्छा करीत आहे. तूं चित्तपरीक्षक आहेस. पतिशिराच्या निमित्तानें तुझे चरण पाहण्यासाठीं मी धांवत आलें आहें, आतां मला कृतार्थ कर.

याप्रमाणें त्या सुलोचनेचीं भाषणें ऐकतांच राम तटस्थ होऊन तिच्याकडे पाहूं लागला. तिचें चातुर्य पाहून सर्व कपि मान डोलवूं लागले आणि सुग्रीव रामास ह्मणाला–हिला हिच्या पतीचें शिर देऊन परत पाठवावी. जांबुवंत, अंगद आणि मारुती हे सर्व तिचें स्तवन करूं लागले. नंतर रामानें तिला विचारलें–आह्मीं तुझ्या पतीचें शिर इकडे आणलें हें तुला कसें कळलें ? असें ऐकतांच तिनें सांगितलें कीं, मला सर्व वर्तमान माझ्या पतिकरानें लिहून कळविलें. असें बोलून तिनें भुज आणि पत्र पुढें ठेवितांच राम आश्चर्य करूं लागला; परंतु सर्व कपि ह्मणूं लागले कीं, ही जर आपल्या मृतपतीचें शिर हंसविल तर 'निर्जीव करानें पत्र लिहिलें, ही गोष्ट आह्मीं सत्य मानूं, असें ऐकतांच रामानें सर्व कपींस सांगितलें कीं, पतिव्रतांचा महिमा अगाध आहे. तुमची इच्छा असेल तर ती आपल्या पतीचें शिर हंसवून घेऊन जाईल. असें बोलून तें भयंकर शिर आणून पुढें ठेव, अशी रामानें ऋषभाला आज्ञा करितांच त्यानें त्याची शेंडी धरून सुलोचनेच्यापुढें आणून टाकलें. आपल्या पतीचें शिर पाहतांच सुलोचनेनें अति स्नेहेंकरून हृदयाजवळ धरिलें आणि अपार शोक करून शेवटीं उत्तरीयवस्त्रावर ठेविलें आणि सर्वांसमक्ष त्यानें हास्यवदन करावें या हेतूनें त्याची तिनें प्रार्थना आरंभिली.

ती सुलोचना विनयवाणीनें शिरास ह्मणाली–प्राणनाथ, अयोध्याधीश रामचंद्र आणि या कपिगणांसह स्वर्गांतील सुरवर पहात आहेत; यासाठीं आपण एकवेळ हास्यवदन करून माझी लज्जा रक्षण करावी. माझे सर्व अपराध आपण क्षमा कराल अशी माझी खात्री आहे. आजपर्यंत मजपाशीं नानाप्रकारें विनोद करीत होतां; मग आ-

जच आपणांला इतका क्रोध कां बरें आला आहे? माझें सतेज पाि
ब्रत्य ह्या रघुपतीला दाखविण्यासाठीं तरी एकवेळ आपण हास्यवद
करावें. रणांत अपयश आलें ह्मणून आपण खिन्न आहां काय? किं
रामदर्शन झाल्याकारणानें आपणास सायुज्यपद मिळालें व आप
बोलणेंच खुटलें? याप्रमाणें अनेक प्रकारें विनवणी करून ती पतिव्र
किंचित् विनोद करीत असतां पुनः ह्मणाली–प्राणनाथ, आर
तुमच्या आतेचा गौरव करण्यासाठीं सुमित्रासुतानें तिचें नासि
आणि कर्ण छेदन केलें, नंतर भगिनीचें भूषण पाहून कुंभकर्णानें
सुग्रीवाला आपलें नासिक व कर्ण अर्पण केले, हें वर्तमान ऐकतां
आपणांस आश्चर्य वाटलें व आपण हास्यवदन केलें होतें, तसें य
वेळेस कांबरें करीत नाहीं? याप्रमाणें तिनें अनेक विनोदाचीं भाष
केलीं, तरी शिर हंसेना, तेव्हां तिला जरासा खेद झाला आणि
त्या शिराकडे पाहून पुनः ह्मणाली–प्राणनाथ, आपण कां रागाव
हें माझ्या ध्यानांत आलें. पूर्वीच जर आपलें साह्य करण्यासाठीं
आपल्या पित्याला बोलावलें असतें, तर आपणांस अपजय आल
नसता. असें ऐकतांच सव्यनेत्र उघडून तें शिर गदगद गदगद हंसलें.
तेव्हां सर्व कपि रामाला विचारूं लागले कीं, काय ऐकून हें शि
हंसलें, हें आह्मांला कळलें नाहीं. तेव्हां रामानें सांगितलें–हिचा पित
सहस्रवदन शेष त्याचाच अवतार हा लक्ष्मण. स्त्रीनें आपल्या पित्याच्य
साह्याची गोष्ट सांगतांच शिराला आश्चर्य वाटून हंसलें. हीं भाष
ऐकतांच लक्ष्मण मोहव्याप्त झाला आणि सुलोचनेकडे पाहून शोक क
लागला. तेव्हां रामानें त्याला सांगितलें–सौमित्रा, हा दारुण क्षत्रिय
धर्म असाच आहे. समरांत पिता, पुत्र, कोणीही येवो; त्याचा नाश

केलें पाहिजे. युद्धांत कोणाचाही वध केला तरी दोष लागत नाहीं. बरें, हें मायाचक्र असेंच आहे; सर्व मिथ्या असतां शोक करवितें. असें ऐकतांच लक्ष्मण ह्मणाला—मिथ्या ह्मणून उपदेशमात्र करितां येतो; प्रसंग आल्यावर त्या ज्ञानाची स्मृति रहात नाहीं. आपणही सीतावियोगाचें दुःख मानून आकांत करीत होतां. असें ऐकतांच राम कृपायुक्त अंतःकरणानें ह्मणाला—तुझी इच्छा असेल तर मी इंद्रजिताला पुनः जिवंत करून दोघांचें ऐक्य करतों. असें ऐकतांच सर्व कपि गजबजले. विमानस्थ देवही भयभीत झाले आणि कोणीतरी असें करूं नका, ह्मणून हस्तसंकेतहीं दाखवूं लागले. इतक्यांत मारुती निर्भीड होऊन ह्मणाला—महाराज, यावेळेस आपलें औदार्य एकीकडे ठेवा. इंद्रजिताच्या बळानेंच तर रावणानें सर्व देव बंदींत घातले आहेत. याचीं कपटें इंद्रालाही कळत नाहींत. जर आपण याला उठवाल तर मारण्यासाठीं पुनः अवतार धरावा लागेल. असें ऐकतांच लक्ष्मणानेंही सांगितलें कीं, आपण सर्वांस प्रिय असेल तेंच करावें.

नंतर सुग्रीवानें सुलोचनेला सांगितलें कीं, तूं आपल्या पतीचें शिर घेऊन जा. असें ऐकतांच तिची निराशा झाली आणि पतीचें शिर घेऊन रामाला सव्य घालून निघते वेळीं ती विनयानें ह्मणाली—प्रभो, तुझे चरण अवलोकन केल्यामुळें मी कृतकृत्य झालें आहें, तरी मला अग्निप्रवेश करणें आहे; ह्मणून विनंती करितें कीं, मी सहगमन करीपर्यंत लंकेवर कपि पाठवूं नयेत. माझ्या सहगमनाला विक्षेप होऊं नये, असें मी इच्छितें. असें ऐकतांच अवश्य ह्मणून रामानें तिच्या मस्तकीं पाकर ठेवितांच ती जयजयकार करून शिर घेऊन निघाली.

नंतर तिनें रणांतून पतीचें शरीर आणविलें आणि समुद्रतीरावर

विस्तीर्ण चिता तयार करविली. मंदोदरीसह लंकानाथ, त्याठिकाणीं आला व विमानचारी देवही तें कौतुक पाहण्यासाठीं जमले. सुलोचनेनें त्याठिकाणीं येतांच स्नान करून सौभाग्यवायनें दिलीं आणि कुंडांत महाअग्नि पेटवून त्यांत तिनें आपल्या पतीचें शव घातलें आणि प्रदक्षणा करून ती धर्मकुंडाजवळ येऊन उभी राहिली. नंतर तिनें वर पाहिलें तों दुंदुभी वाजत आहेत, सुरस्त्रिया सौभाग्यवायनें घेऊन तिच्या सत्कारार्थ उभ्या आहेत आणि इंद्रजीत दिव्य देह धारण करून विमांनांत बसला आहे असें तिला दिसलें. त्या वेळेसच तिचे प्राण कासावीस झाले आणि तिनें पतिशिरासह अग्निकुंडांत उडी टाकली आणि दिव्यरूप धरून ती स्वर्गीं गेली. नंतर शोक करीत असलेला रावण सहपरिवार सिंधुसंगमावर स्नान करून रुदन करीत लंकेंत निघून गेला. ही कथा अग्निपुराणांत आहे; परंतु रसिक जाणून रामचरित्रांत दाखल केली आहे.



अध्याय २१वा



# अध्याय ३१ वा.

रावणाचे सर्व बंधु व पुत्र रणांत पडले हें आठवून, आतां कोणी पाठिराखा राहिला नाहीं; ह्मणून तो शोक करीत असतां प्रधान विद्युज्जिव्ह त्याला ह्मणाला—महाराज, आतां शोक न करितां शत्रूचा नाश कसा होईल, याबद्दल आधीं विचार केला पाहिजे; ह्मणून आपण माझ्या विनंतीकडे लक्ष्य द्यावें. पाताळीं अहिरावण आणि महिरावण हे दोघे महाबलाढ्य राक्षस वास करीत आहेत. ते कपटविद्येंत परम विख्यात व महापराक्रमी आहेत; ते रात्रौ रामसौमित्रांस पाताळीं घेऊन जातील व कालिकेपुढें दोघांसही बळी देतील. असें ऐकतांच रावणास अत्यानंद झाला. नंतर विद्युज्जिव्हानें त्यांस पत्र लिहून पाठवितांच जसे काम व क्रोध येऊन अहंकाराला भेटतात, तसे अहिमहिराक्षस प्रगट होऊन रावणास भेटले. त्या दोघांस आलिंगन देऊन तो मयजापति रुदन करूं लागला. त्यानें इंद्रजिताचें वर्तमान त्या दोघांस सांगितलें. तें ऐकतांच ते दोघे रावणाचें समाधान करीत असतां ह्मणाले—महाराज, आतां गतगोष्टीविषयीं शोक करणें योग्य नाहीं. आजच्या रात्रींत आह्मीं त्या उभय मानवांस पाताळीं नेऊन कालिकेसमोर बळी देतों. वरकड मर्कटसैन्याचा संहार करण्यास तुह्मांला उशीर लागणार नाहीं. असें ऐकतांच त्या दशद्वयनेत्रास अत्यानंद झाला व त्यानें त्या दोघांचा अनेक प्रकारें गौरव केला.

रावणाच्या सभेंत बिभीषणाचे दोन प्रधान गुप्त बसून सर्व गोष्टी ऐकत होते; त्यांनीं तें वर्तमान रावणानुजास कळवितांच त्यानें नळ, नीळ, जांबवंत, मारुती इत्यादिकांस [illegible] केलें. [illegible]

भोंवती वेढ्यावर वेढे देऊन पुच्छाचा वज्रदुर्ग रचला आणि त्यावर जा- गोजागीं द्रुमपाणि रामचरित्र गात सावध बसले.

ज्ञानगजावर अविद्येनें अज्ञानाची खोळ घातल्याप्रमाणें, ती काळ- पुरुषाच्या कांबळीप्रमाणें काळोखी रात्र प्रवर्तली असतां, पक्षी नाना- प्रकारें शब्द करूं लागले. रीस व वाघळें वृक्षांवर ओळकंबूं लागलीं. स्मशानांत भूतें व यक्षिणी नानारूप व भयंकर ज्वाळा दाखवून गोंधळ घालूं लागल्या. प्रेतगण अपवित्रांचा छल व पवित्रांस पाहून पळ काढूं लागले. पिंगळे किल्बिल्ल करूं लागले. भालू आणि दिवाभीतें ओरडूं लागलीं. याप्रमाणें घोर निशा प्रवर्तली असतां अहि व महि हे दोघे राक्षस गुप्तरूपानें रामसैन्याजवळ प्राप्त झाले. त्यांच्या हातांत भयंकर शूळ होते, त्यांनीं ते प्रथम तो दुर्ग फोडण्याचा प्रयत्न करूं लागले; परंतु त्यांचे ते शूळ मोडून गेले, तरी दुर्गाचा तिळमात्रही भंग झाला नाहीं. तेव्हां ते आकाशांत ध्रुवमंडळापर्यंत उडाले आणि दुर्गमर्यादा अगदीं उल्लंघन करून जेथें रामसौमित्र निजले होते तेथेंच अकस्मात् उतरले, तों हरिणाक्षमावर दोघेही लीलावतारी नि- द्रिस्थ झालेले आहेत. आधींच ती सुखघननिद्रा, त्यांत राक्षसांनीं मोहन घातलें आणि त्याच ठिकाणीं बेताचें विवर कोरून त्यांनीं त्या दोघां बंधूंस शय्येसकट उचलून नेलें. त्या मायावी राक्षसांनीं त्या ठिकाणीं जें विवर कोरलें, तें सातहजार योजनें लांब होतें. ते या- मिनीचर सातघटिकांत तो विवरमार्ग ओलांडून, पुढें तेराहजार योजनें दधिसमुद्र होता, त्याचेंही उल्लंघन करून, त्याच्या पलीकडे लंकेहून- ही विशेष सुशोभित अहिकावती नामक नगर होतें; त्या नगरांत गेले. तीच त्यांच्या राजधानीची जागा. तेथें जातांच त्यांनीं दोघां-

सही उत्तम बंदोबस्तांत ठेविलें. त्या नगराच्या मध्यभागीं दशयोजनें उंच व सबळ भद्रकालीचें देवालय महाविशाल व भयंकर असें होतें. त्या राक्षसांनीं दधिसमुद्रतीरावर रक्षणासाठीं वीसकोटी पिशिताशन ठेविले होते; त्यांत मकरध्वजनामक मुख्य होता, तो महाबलाढ्य असे. सर्वप्रकारें उत्तम बंदोबस्त करून अहि व महिरावणांनीं मूर्च्छित रामलक्ष्मणांस नागपाशांनीं बांधलें आणि त्यांचें रक्षण करण्यासाठीं स्वतः जागत बसले.

इकडे सुवेळाचलावर सूर्योदय होतांच द्रुमपाणि रामदर्शनास गेले; तों शय्येसह त्या दोघांचाही ठिकाण नाहीं. त्याचठिकाणीं भयंकर विवरही त्यांच्या दृष्टीस पडलें व तें पाहतांच सुग्रीवादि कपि घाबरले. पुढें पाहतात तों बारा गांवें रुंद राक्षसांचीं पावलेंही उमटलीं आहेत. तीं पाहतांच या चराचराचें जीवन राक्षसांनीं चोरून नेलें, असें ह्मणून सुग्रीव हृदय पिटून शोक करूं लागला. सर्व वानरही रामा ! कांरे आमचा त्याग करून गेलास ? असें ह्मणून आकांत करूं लागले; इतक्यांत बिभीषण धांवत आला आणि सर्वांस स्थिर करून ह्मणाला कीं, हें वर्तमान कळतांच रावण युद्धाला येईल. जसें प्राणाशिवाय शरीर, तशी ही सेना रामाशिवाय व्यर्थ आहे; ह्मणून ही बातमी बाहेर न फोडतां पुढचा योग्य विचार करा. पिंड ब्रह्मांड आणि तत्व, यांचा शोध करून जसा आत्मज्ञानी स्वरूपाचा शोध करीत असतो, त्याप्रमाणें आतां आपण त्या सीताकांताचा शोध केला पाहिजे. तुह्मी सर्व कपि सभाग्य आहां, कारण मारुती तुमच्या हातांत आहे; तर त्यालाच पाठवून रामाचा शोध करावा. असें ऐकतांच सर्व कपि मारुतीला शरण गेले आणि तुझ्याशिवाय आह्मांला राम दिसत नाहीं, तूंच रामप्राप्तीला कारण आमचा सद्गुरु आहेस, यासाठीं पूर्वीं जशी सीताशुद्धि केलीस, तसा आतां रामाचा शोध कर.

याप्रमाणें सर्व कपींचें भाषण ऐकतांच राघवप्रियकर मारुती त्यांस ह्मणाला—तुह्मीं चिंता करूं नका. एका क्षणांत हा विरंचीगोल शोधून विजयश्रीसह रामसौमित्रांला घेऊन येतों. असें बोलून त्यानें नळ, नीळ, अंगद व जांबुवंत, या चौघांस आपल्याबरोबर घेतले आणि सुग्रीव व बिभीषण यांस सांगितलें कीं, तुह्मीं कपिसैन्याचें रक्षण करावें. मी रामाला घेऊन फारच त्वरेनें परत येतों. असें बोलून तो चौघांसह त्या भयंकर विवरांत उतरला आणि चालूं लागला; पण तो सातहजार योजनांचा अंधःकारांतील मार्ग, त्यांत हवेचा प्रवेशही नाहीं, त्यामुळें जांबुवंतादि चौघेही कासावीस होऊन पडले. तेव्हां मारुतीनें त्यांस पुच्छपाशांत बांधून उचलून घेतलें आणि विवराबाहेर उचलून आणलें. नंतर त्या ठिकाणीं शीत वारा लागतांच चौघेही सावध झाले.

त्या विवरद्वारावरच वीसहजार राक्षसांस घेऊन मकरध्वज संरक्षण करीत बसला होता, त्यास पाहतांच या कपींनीं यात्रस्थांचे वेष घेतले; पण तितक्यांत ते असुर त्यांना दटावून या मार्गानें कोठें जातां असें विचारूं लागले. तेव्हां हनुमंतानें सांगितलें—आह्मी प्रवासी आहों, महिकावती पहावी ह्मणून या मार्गानें जातों. अंतरिक्ष उड्डाण करून कालिकेचें दर्शन घेऊं व परत येऊं. असें ऐकतांच सर्व राक्षस क्षोभले आणि कपींस दंडानें ताडण करूं लागले. तेव्हां मारुतीलाही कोप आला व तो एकेकाला धरून आपटूं लागला. विपरीत प्रसंग पाहतांच सर्व राक्षस त्या पांचजणांवर धांवून आले, परंतु त्यांनीं त्या सर्व राक्षसांस आपटून ठार करून समुद्रांत फेंकून दिलें, तों मकरध्वज येऊन मारुतीजवळ भिडला आणि ते दोघे एकमेकांस सबळ मुष्टिघात करूं लागले; परंतु शेवटीं मारुतीनेंच मकरध्वजाच्या

हृदयावर एक वज्रमुष्टीचा प्रहार करून त्याला खालीं पाडलें आणि आतां तुला कोण सोडवील ? असें विचारलें. तेव्हां तो ह्मणाला–माझा पिता अंजनीतनय मारुती या वेळेस जर जवळ असता, तर त्यानें मला सोडविलें असतें. हें भाषण ऐकतांच मारुतीला शंका आली व त्यानें त्याला हातीं धरून विचारलें–मारुती पूर्णब्रह्मचारी असतां त्याला तूं पुत्र कसा झालास ? जें काय असेल तें वर्तमान सत्य सांग. असें ऐकतांच मकरध्वज ह्मणाला–लंकादहन करून पुच्छ विझविण्यासाठीं जेव्हां मारुती समुद्रावर आला, तेव्हां त्यानें आपला स्वेद पुसून समुद्रोदकांत टाकला, तो मगरीनें भक्षण केल्यामुळें तिच्या ठायीं माझी उत्पत्ति झाली; ह्मणून तो माझा बाप. असें ऐकतांच मारुतीनें त्याला सांगितलें कीं, ज्याला मारुती ह्मणतात तो तर मीच आहें. तूं माझा पुत्र ह्मणून सांगतोस, त्यामुळें हे माझे सोबती मला हंसताहेत पहा. असें ऐकतांच मकरध्वजानें त्याच्या चरणांवर मस्तक ठेविलें, इतक्यांत मगरीही आपल्या पतीला पाहण्यासाठीं धांवत आली आणि मारुतीला ह्मणाली–महाराज, लंकादहनप्रसंगीं जें रूप धरलें होतें तें दाखवून माझा संशय दूर करावा. असें ऐकतांच मारुतीनें भयंकर व प्रचंड रूप धरलें. तें पाहतांच मगरी त्याच्या चरणीं लागली आणि ह्मणाली–आतां चिंता करूं नका. रामलक्ष्मण महिकावतींत सुखरूप आहेत. कपटी अहिरावण व महिरावण उदयीक दोनप्रहरीं त्यांस देवीपुढें बलि देणार आहेत; यासाठीं आपण गुप्तरूपानें देवालयांत जाऊन बसावें, ह्मणजे तेथेंच त्यांची भेट होईल. असें ऐकतांच हनुमंतानें त्या वधूच्या मस्तकावर हात ठेवून सांगितलें कीं, अहिमहींचा वध करून तुझ्या पुत्राला महिकावतीचें राज्य देईन. मगरी ह्मणाली–महाराज, आपल्या प्रतापानें तें सर्व होईल अशी माझी खात्री आहे; तरी हा

दधिसमुद्र तेराहजार योजनें लांब आहे; यासाठीं आधीं आपण माझा विचार ऐकून घ्यावा. तुह्मी पांचजणांनींही माझ्या वदननौकेंत बसावें, मी आपणांस एका क्षणांत महिकावतीस नेऊन पोचवितें. असें ऐकतांच जांबुवंतादि सर्व भयभीत झाले आणि मगरमिठी अद्भुत असते, कदाचित् उदकांत नेऊन भक्षण करील. असें मनांत आणून ते ह्मणाले—हनुमंता, तुझ्याशिवाय समुद्रोल्लंघन इतरांच्यानें होणार नाहीं. आह्मीं या स्थानाचें रक्षण करतों, असें ऐकतांच त्यांस 'ठीक आहे' ह्मणून सांगून मारुतीनें मगरीला निरोप दिला आणि सिंधुतीरावर येऊन जययशस्वी रघुवीर ह्मणून जो आकाशांत उडाला, तो महिकावतीस येऊन उभा राहिला. अहिमहिरावणांचे पुष्कळ रक्षक होते, पण मारुतीनें अणुरेणूहूनही लहान रूप धरलें होतें, ह्मणून तो आला हें कोणालाही दिसलें नाहीं. तो खुशाल भद्रकालीच्या देवळांत जाऊन पाहूं लागला, तों राक्षसांचीं अनेक कापस्यानुष्ठानें चाललीं आहेत. मद्य, मांस आणि विप्रांचीं प्रेतें देवीच्या पूजनासाठीं आणून ठेविलीं आहेत आणि अनेक राक्षस नानाप्रकारचीं भ्रष्ट शास्त्रें काढून एकमेकांच्या वचनांस प्रतिवचनें देत आहेत. त्यांचीं भाषणें ऐकतांच मारुती मनांत ह्मणाला—यांचा आतां लौकरच कपाळमोक्ष केला पाहिजे. मारुतीनें देवालयांतील गाभाऱ्यांत प्रवेश करितांच देवीला उचलून न्हाणींत टाकलें आणि स्वतः तिच्या स्थानीं बसला. त्यानें आपल्या सर्वांगाला सिंदूर चर्चन करून द्वारकपाटें बंद करून घेतलीं. देवी हनुमंताकडे पाहूं लागली, तों तिला त्याचें रूप फारच भयंकर दिसूं लागलें.

इकडे असुर षड्रसान्नांचे पर्वत आणि मद्यमांसादि पूजासाहित्य घेऊन देवालयांत आले तों देवीचें दार लागलेलें! तें पाहतांच "देवीला

कोप आला असेल" असें मानून ते त्या देवीचें अपार स्तवन करूं लागले. एक मुहूर्तपर्यंत सर्व राक्षसांनीं स्तुति केल्यावर आंतून गर्जना करून ती महारुद्ररूपिणी देवी ह्मणाली—हे भक्तहो, आज तुह्मीं रामचंद्राला बळी देण्यासाठीं आणलें आहे; ह्मणून मला अत्यानंद झाला आहे. मीच लंकेपुढें अनेकांचे प्राण घेतले आणि आतां तुमचें भोजन करण्यासाठीं आलें आहें. या वेळेस मी फार तीव्र स्वरूप धरलें आहे, हें पाहतांच तुमचे नेत्र जातील, यासाठीं पहिल्यानें गवाक्षद्वारांतून सर्व पूजा समर्पण करा. असें ऐकतांच अहिमहि 'आह्मीं देवीचें महाभक्त आहों' असें मानून आनंदानें नाचूं लागले. नंतर त्यांनीं महा प्रयत्नानें देव्यालयावर एक गवाक्षद्वार पाडून पहिल्यानें स्नानासाठीं सहस्रावधि पंचामृताचे घट ओतले ते हनुमंतानें मुख पसरून प्राशन केले. नंतर शुद्धोदकाचे घट ओतूं लागतांच मारुतीनें मुखप्रक्षालन केलें. इतक्यांत धूप दीप येऊं लागले, तेव्हां मारुतीनें देवीला सांगितलें कीं, हे तूं घे. नंतर तो पुनः गर्जना करून ह्मणाला—आतां नैवेद्य लौकर येऊंद्या. असें ऐकतांच राक्षस अन्नांचे पर्वतच्या पर्वत आंत लोटूं लागले व ती रुद्ररूपिणीदेवी स्वाहा करूं लागली. वर्षाकाळीं सरिता जशा सागरास भेटण्यासाठीं धांवतात, त्याप्रमाणें राक्षस दह्यादुधांचे पाट त्या गवाक्षांतून सोडूं लागले, तेव्हां प्रसाद बाहेर यावा ह्मणून पुजारी लोहदंड घेऊन न्हाणी मोकळी करूं लागले, तेव्हां ते लोहदंडाचे प्रहार खऱ्यादेवीच्या मस्तकावर बसूं लागल्यामुळें तिला महासंकट उद्भवल्याप्रमाणें वाटलें. शेवटीं राक्षस पुजाऱ्यांनीं मोरी मोकळी केली; तरी कांहींच बाहेर येईना. तेव्हां सर्व ह्मणूं लागले कीं, आज देवी सर्व पूजाद्रव्य भक्षण करीत आहे.

त्या ठिकाणीं कित्येक वृद्ध वृद्ध राक्षस होते, ते हें दुश्चिन्ह पाह-

तांच ह्मणूं लागले—अरे देवी कशाची? कांहीतरी प्रलय होणार आहे. रावणानें सीतेला चोरून आणतांच एका वानरानें तेथें जाऊन सगळ्या लंकेंत प्रळय माजविला आणि शेवटीं ती सुशोभित नगरी जाळून चालता झाला. तीच व्यवस्था आज येथें दिसत आहे. असें बोलून त्यांणीं तेथून पाय काढला.

इकडे अन्नांचे पर्वत लोटतांना राक्षस श्रम पावले, तरी देवी तृप्त होईना, तेव्हां शेवटीं त्यांनीं शुद्धोदक व तांबूल समर्पण करितांच मारुती आंतून ह्मणाला—हे महाभक्तहो, मी आज फार तृप्त झालें आहें, तुह्मांला अक्षय पद देईन. आतां रामलक्ष्मणाला आणून न मारतां, सगळेच आंत सोडा, ह्मणजे माझी प्रसन्नता तुमच्या तत्काळ प्रत्ययाला येईल. लंकापति रावण आणि तुह्मीं माझे महाभक्त आहां. तुमची दोघांचीही पदवी सारखी करीन. त्या रामाला सगळेंच गिळावें असें माझ्या मनांत आहे. असें ऐकतांच शहाणे होते, त्यांनीं आपापल्या घरांचा मार्ग धरिला आणि अहिमहि हर्षातिशयानें वेडे होऊन रामलक्ष्मणांस आणण्यासाठीं तीसकोटि राक्षस घेऊन चालते झाले.

त्या दुष्टराक्षसांनीं ती रघुकुलांतील दोन्हीं निधानें नागपाशांत बांधून ठेविलेलीं होतीं. ते नागपाश काढून त्यांनीं त्या दोघांस रथाजवळ बांधले आणि मग त्यांच्यावरील मोहन काढून त्यांस सावध केलें. तेव्हां राम सौमित्राला ह्मणाला—लक्ष्मणा आपणांस शत्रूंनीं रात्रीं उचलून आणून रथाजवळ दृढबंधन केलें आहे, धनुष्यबाण हिरावून घेतले आहेत. आतां जानकी तर मला अंतरलीच; परंतु हें ऐकतांच भरत व आपल्या माता प्राणत्याग करतील. या संकटसमयीं साक्षात् रुद्रावतार मारुती जवळ असता तर आपली मुक्तता त्यानें केली

असती. याप्रमाणें बोलत आहेत, तों राक्षसांनीं रक्तपुष्पांच्या माळा आणून त्यांच्या गळ्यांत घातल्या आणि त्यांजवर गुलाल व शेंदूर उडवीत व पुढें भयकर वाद्यें वाजवीत ते त्यांस देवालयाकडे घेऊन चालले. त्यांच्यासभोंवती असुर नग्न शस्त्रें करून हांका फोडीत चालले होते व त्यांची मिरवणूक पाहण्यासाठीं नागरिकांची दांटी झाली होती. दोघांचींही कोमल स्वरूपें पाहून नागरिकांच्या नेत्रांतून अश्रुपात होऊं लागले. सर्व नर व नारी आकांत करूं लागल्या. तरी राक्षसांनीं देव्यालयाजवळ जातांच त्याला तीन प्रदक्षिणा करवून त्यांस आंत आणलें व देवालयाच्या गवाक्षद्वारांतून दोघांसही आंत लोटून दिलें. नंतर सर्व राक्षस मद्यप्राशन करून उन्मत्त झाले व हातांत दिवट्या घेऊन नाचून गोंधळ घालूं लागले.

इकडे देवालयांत पडलेले रामलक्ष्मण पाहतात. तों देवीनें विशाळ वदन पसरलें आहे व भयंकर हांक फोडून त्यांना सांगितलें कीं, हे राजपुत्रहो, आतां मी तुम्हांला भक्षण करणार. तुमचा कोणी त्राता असेल तर त्याचें स्मरण करा. असें ऐकतांच राम म्हणाला— जर माझे भक्त संकटांत पडले तर माझें स्मरण करितात; आतां या संकटसमयीं मी कोणाला आठवावें! तरी माझ्या प्राणाचा प्राण मारुती जर येथें असता तर मजवर हें विघ्न आलें नसतें. तरी हे माते, आतां तूंच आमचें रक्षण करणारी हो आणि जननी ज्याप्रमाणें बालकांचें पालन करिते, त्याप्रमाणें आमचें पालन कर. हे शब्द ऐकतांच मारुतीच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या आणि त्यानें आपलें रूप प्रगट करून रामचरणांला दृढ मिठी घातली. त्याला पाहतांच रामानें अतिप्रीतीनें हृदयाजवळ धरलें आणि सांगितलें—प्राणसख्या मारुती, मी अनंत अवतार घेतले तरी तुझ्यासारखा, पाठिराखा;

कैवारी आणि भक्त मला मिळणार नाहीं. तुझ्या उपकाराला अंत नाहीं व हे कल्पांतींही फिटणार नाहींत. याप्रमाणें राम बोलत आहे तों लक्ष्मणही मारुतीला भेटला. नंतर राम ह्मणाला—मारुती, आतां या शत्रूंचा वध कसा करावा ? मारुतीनें सांगितलें—आपण माझ्यामागें स्वस्थ बसावें. मी एकेक असुराला बोलावून यमलोकीं पाठवितों. राम ह्मणाला—जर धनुष्यबाण आणून देशील, तर एका क्षणांत हे सर्व राक्षस मारीन; असें ऐकतांच मारुतीनें गुप्तरूपानें जाऊन दोघांचींही धनुष्यें व बाणभाते आणून दिले. नंतर रामाला सांगितलें कीं, पहिल्यानें मी अहिरावणाला बोलावून पायांखालीं तुडवून मारतों; नंतर आपण दार उघडून महिरावणाचा वध करावा. असें बोलून त्यानें दोघांसही पाठीमागें लपविलें आणि स्वतः देवी होऊन बसला व भयंकर गर्जना करून ह्मणाला—हे भक्ता अहिरावणा, आतां तूं एकटाच माझ्या दर्शनासाठीं आंत ये. असें ऐकतांच त्यानें अत्यानंद मानून गवाक्षद्वारें देव्यालयांत उडी टाकली. परंतु देवीचें भयंकर रूप पाहतांच घाबरला आणि भीतभीत होऊन त्यानें मारुतीच्या चरणांवर मस्तक ठेवितांच त्याच्या शिराचें मारुतीनें एकाच लाथेनें चूर्ण उडविलें; त्यामुळें तो हातपाय झाडूं लागला, तेव्हां पृथ्वी दणाणून गेली. तो दणका ऐकतांच समंजस होते त्यांनीं पळ काढला. पण महिरावण चार घटका झाल्या तरी बंधु बाहेर कां येत नाहीं ? ह्मणून शोध करूं लागला. तेव्हां एक पुजारी आंत शिरला, त्याचा एक लोभी दायाद होता, तो आंत अन्नप्रसाद पुष्कळ आहे; ह्मणून लोभानें त्याच्यामागून तोही हळूच आंत शिरला. पुढील पुजारी देवीला नमस्कार करूं जातांच हनुमंतानें त्याला मत्कुणाप्रमाणें रगडून टाकलें. त्याची विपरीत गति पाहतांच दुसरा चळचळा कांपूं

लागला आणि अरे हा मारुती ! ज्यानें लंका जाळली तोच देवी होऊन बसला आहे, असें ओरडला. त्याची मुरकुंडी वळली व तो दोहों हातांनीं शंख करीत बाहेर आला आणि अहिरावणाचें वर्तमान महिरावणाला सांगूं लागला. मारुतीचें नांव ऐकतांच कित्येक राक्षस पळत सुटले आणि कित्येकांकडून कवचें व शस्त्रें बांधवून महिरावण युद्धास सिद्ध झाला.

इकडे देवळ्यालयांत मारुतीनें रामसौमित्रांला स्कंधावर घेऊन द्वार-कपाटें लाथेनें उडवून दिलीं आणि बाहेर येतांच पुच्छानें तें विशाळ देव्यालय आकाशांत भिर्कावून दिलें व देवीला समुद्रांत फेंकलें. इतक्यांत राक्षसांनीं मारुतीच्या सभोंवती वेढा घातला. असें पाहतांच रामसौमित्रांनीं खालीं उतरून धनुष्यें सज्ज केलीं व असंख्य राक्षसांचा संहार केला. शेवटीं त्या नरवीर पंचानन रामानें महिरावणाच्या मस्तकावर असंख्य बाण मारले; परंतु असा चमत्कार झाला कीं, त्याच्या रक्तबिंदूपासून लक्षावधि महिरावण उत्पन्न होऊन लढूं लागले. तेव्हां रामही चकित् होऊन त्यांचे घाय चुकवूं लागला व. घाबरला, परंतु मारुतीनें जेव्हां विपरीत वेळ पाहिली, तेव्हां तेथून मगरीजवळ धांव मारली आणि तिला महिरावणाचें मूळ वर्तमान विचारलें, तेव्हां ती त्याला सांगूं लागली.

एके दिवशीं देवांगना रंभा इंद्रभुवनीं जात असतां मार्गांत भृगुऋषीला पाहून त्याच्या वृद्धपणाला हंसली, तेव्हां त्यानें कोप करून तूं सर्पीण होशील व महार्णवांत संचार करशील, असा शाप दिला. तें शापवचन ऐकतांच रंभा मुनिचरणीं लीन झाली आणि उःशाप मागूं लागली. तेव्हां त्यानें उःशाप दिला कीं, तूं जरी सर्पीण झालीस, तरी क्षणोक्षणीं पद्मिणीप्रमाणें दिसशील व तशांत तुजवर जेव्हां

सूर्याचें वीर्य पडेल, तेव्हां तूं मुक्त होशील. त्याप्रमाणें ती सर्पिणी होऊन महावनांत फिरत असतां एके वेळीं सूर्याला पद्मिणीप्रमाणें दिसली व त्याचा वीर्यपात झाला, त्यापैकीं सर्पिणीच्या तोंडांत वीर्य पडलें, त्यापासून अहिरावण व भूमीवर पडलें तो महिरावण झाला. आतां त्या महिरावणाच्या रक्तबिंदूपासून अनेक राक्षस कां उत्पन्न होतात. हें मला ठाऊक नाहीं. हें वर्तमान त्या महिरावणाची पत्नी चंद्रसेना सत्यवचनी आहे, तिला ठाऊक आहे. असें ऐकतांच मारुती तेथून उडाला तो महिकावतींत येऊन अंतःपुरांत शिरला.

महिरावणाची पत्नी चंद्रसेना रामस्वरूप पाहून लुब्ध होत्साती त्याच्यांच ध्यानांत निमग्न झालेली होती. इतक्यांत मारुतीनें जवळ येऊन टाळी वाजविली आणि तिला सावध केलें. नंतर त्यानें नमन करून तिला सर्व वर्तमान सांगितलें व शेवटीं ह्मणाला–पुराणपुरुष राम महत्संकटांत पडला आहे. हें संकट जर तूं निवारण करशील, तर तुझे उपकार होतील. असें ऐकतांच ती ह्मणाली–रामाला एकवेळ तुझ्या शयनस्थानीं आणीन, असें वचन जर देशील, तर मी सर्व वर्तमान सांगेन. असें ऐकतांच हनुमंतानें पुढील कार्यार्थावर लक्ष पोंचवून तिला तसें वचन दिलें. तेव्हां ती सांगूं लागली–

पूर्वी महिरावणानें तपश्चर्या करून शिवाला प्रसन्न केलें आणि युद्धसमयीं माझ्या रक्तावर अमृतवर्षाव व्हावा असा वर मागितला. त्या दिवसापासून शिवकंठांतील माळांवर जे भ्रमर आहेत ते युद्ध सुरू झालें ह्मणजे पाताळांतून अमृत आणून त्याच्या रक्तावर टाकूं लागतात; त्यामुळें युद्धांत अनेक महिरावण उत्पन्न होतात, हें त्याचें खरें कारण आहे.

असें ऐकतांच मारुती तेथून जो उडाला, तो पाताळांत अमृतकुंडाचा शोध करीत गेला. त्या ठिकाणीं लोकपाळांचें रक्षण होते, ते स्वप्-

राक्रमानें दूर करून, जों पाहतो तों कोटयावधि पर्वताकार भ्रमर चोचींत अमृत भरून नेत आहेत. मारुती त्या सर्वांस चापटीनेंच जेव्हां मारूं लागला, तेव्हां त्या सर्वांत जो मोठा भ्रमर होता तो हनुमंतास शरण आला व जीवदान मागून 'मी तुझ्या उपयोगीं पडेन' असें ह्मणूं लागला. तेव्हां मारुतीनें त्यासह सर्व भ्रमरांचा बंदोबस्त करून त्याचें वचन घेतलें व त्यांना सोडून दिलें.

नंतर मारुती तेथून रामाजवळ आला आणि ह्मणाला कीं, आतां ब्रह्मास्त्र सोडून सर्व महिरावणांचा वध करावा. असें ऐकतांच रामानें बाणावर ब्रह्मास्त्र स्थापन करून तो बाण सोडतांच मुख्य रूपासह सर्व महिरावण भस्म झाले. त्या वेळेस देवांनीं जयजयकार व पुष्पवृष्टि केली. नंतर मारुतीनें आपल्या पुच्छानें सर्व असुर झोडून गतप्राण केले व समुद्रांत फेंकून दिले, नंतर त्याचें तें विलक्षण पुच्छ जेव्हां महिकावतींतील घरोघरीं शिरून राक्षसांचा शोध करून त्यांस मारूं लागलें, तेव्हां एकच आकांत झाला व सर्व स्त्रिया चंद्रसेनेला शरण गेल्या. तेव्हां तिनें सांगितलें कीं, त्या पुच्छाला रामाची शपथ घाला ह्मणजे तें कोणालाही पीडा देणार नाहीं. असो. याच युक्तीनें स्त्रियांनीं आपलें संकट दूर केल्यानंतर राम लक्ष्मण व मारुती एकत्र झाले.

नंतर शत्रुक्षयाचें खरें कारण विचारण्यासाठीं रामानें हनुमंताला गळ्यांत सप्रेम मिठी मारली; पण तो दुश्चित झाला आहे, असें वाटल्यावरून राम आधीं त्याला चिंतेचें कारण विचारूं लागला. तेव्हां मारुतीनें हात जोडून सर्व वर्तमान सांगत असतां मी चंद्रसेनेला वचन देऊन फसलों आहें असें कळविलें. तेव्हां राम हंसून ह्मणाला—मी एकपत्नी व्रती असतां तूं हें असें कसें वचन दिलेंस? आतां आपणा दोघांसही दूषण न लागतां वचन पूर्ण होईल, अशी कांहीं चातुर्याची युक्ति काढ.

असें ऐकतांच मारुती चंद्रसेनेच्या सदनांत आला आणि राम ये आहे, मंचक सिद्ध कर असें सांगूं लागला. तेव्हां तिनें अत्यानंदा मंचकाची तयारी चालविली. ती पाहतांच मारुती तिला ह्मणाला सांभाळ, जर मंचक मोडला किंवा कांहीं विघ्न झालें तर राम येथें बसणार नाहीं व तसें झाल्यावर तूं मला दोष देशील तर मी ऐकणा नाहीं असें सांगून त्यानें जो भ्रमर जिवंत ठेविला होता त्याला आज्ञा केली कीं, चंद्रसेनेचा मंचक केळीच्या पानाप्रमाणें पातळ कोरून ठेव माझ्या उपयोगीं पडण्याचें तुझें वचन आहे. असें ऐकतांच भ्रमर त्याप्रमाणें करून वचनमुक्त झाला. नंतर मारुती रामाला चंद्रसेनेच्या मंदिरांत घेऊन आला व तो राम तिच्या मंचकावर बसतांच त्या मंचकाच चुराडा उडालेला पाहून परत फिरला, तेव्हां ती चंद्रसेना दीनवदना रामाकडे पाहून मारुतीला शाप देण्यास तयार झाली, तेव्हां ति शांतवन करीत असतां रामानें तिला सांगितलें—तूं माझें ध्यान करी स्वस्थ रहा. पुढील अवतारीं मी तुझी इच्छा पूर्ण करीन. कृष्णावतारीं अतिचतुर सत्यभामा होशील.

इतका प्रकार झाल्यानंतर रामानें हनुमंताच्या सांगण्यावरून महिकावतीचें राज्य मकरध्वजाला दिलें. नंतर मारुतीनें रामलक्ष्मणांस खांद्यावर घेऊन उड्डाण केलें व दधिसमुद्राच्या अलीकडे येऊन नळ, नीळ, जांबुवंतादिकांची भेट घेतली. तेव्हां तेही जयजयकार करू रामचरणीं लीन झाले. नंतर तेथून सर्वांस खांद्यावर घेऊन जसा आदित्य उदयाचलावर येतो, तसा मारुती अकस्मात् सुवेळाचलावर आला. तेव्हां सर्व कपिगणांस अत्यानंद झाला. सर्व कपि रामदर्शनानें आन पावले आणि जयसूचक भुभुःकार करून मारुतीचा प्रताप वर्णन करूं लागले

---


राम
वि.
भरत
मारु.
नंदिग्राम

# अध्याय ३२ वा.

भक्तवल्लभ राम अहिमहींचा वध करून सुवेळाचळावर आल्यानंतर रावणाला तो समाचार कळतांच तो फार चिंताक्रांत झाला. त्यांतच इंद्रजिताचें स्मरग झाल्यामुळें तो आपल्या जीविताल्लाही त्रासला आणि उघड ह्मणूं लागला कीं, आतां मी जिवंत राहून काय उपयोग? पुत्राशिवाय सदन शून्य आणि बंधुहीन झाल्यामुळें तर मला दाही दिशा शून्य झाल्या. याप्रमाणें विचारांत निमग्न असतां त्याला एकाएकीं फारच आवेश आला आणि त्यानें त्याच वेळेस आज्ञा करून लंकेंतील सर्व सैन्य सिद्ध करविलें. चतुरंग सेना सिद्ध होतांच रणतुरें वाजूं लागलीं. सर्व अवशिष्ट प्रधान बरोबर निघाले, त्यांसह सहस्रसूर्याप्रमाणें तेजस्वी रथांत बसून तो रावण स्वतः रणांत आला.

उत्साह पावलेलें रामसैन्य, ससैन्य रावणाला रणांत पाहतांच आवेशास चढलें आणि वृक्षपाषाणादिकांचा वर्षाव करून राक्षसांस जर्जर करूं लागलें, परंतु रावणही चापावर बाण लावून जेव्हां कपिसेना जर्जर करूं लागला; तेव्हां रणरंगधीर रामानें चाप चढविलें आणि असंख्यात् बाणवृष्टि करून रावणाचें शरजाल व्यर्थ केलें. रामाचे असंभाव्य बाण चापापासून सुटतांच एकाचे अनेक होऊन राक्षसांचीं मस्तकें तटातट् तोडीत व शरीरें छिन्नविच्छिन्न करीत असत. जेव्हां रावणानें भयंकर प्रसंग पाहिला, तेव्हां एकदम शस्त्रास्त्रयुद्ध आरंभिलें. त्यांतही दाशरथीची निपुणताच होती. प्रवृत्तिशास्त्राचे विचार वेदांती जसे एकाक्षणांत उडवून देतात; तसा राम रावणाचे प्रत्येक शस्त्रास्त्र विकल करूं लागला. तेव्हां रावणानें अति क्रोधानें पूर्ण विचार करून

अतिप्रखर पांच बाण निवडून काढले आणि अकस्मात् रामावर सोडले. राम त्यांचें निवारण योजीत आहे, इतक्यांत ते बाण येऊन रामाच्या हृदयावर लागले व ती मनोहर कोमळ तनु भेदून गेले, परंतु रामाचें अचल ठाण ढळलें नाहीं. तरी रामाला बाण लागले, एवढ्याच गोष्टीचा रावणाला आनंद वाटला. इतक्यांत रामानें प्रखर व अतितीक्ष्ण सात बाण रावणाचें हृदय लक्षून सोडले, ते अकस्मात् त्याचें हृदय विदारण करून पडलंकेंत जाऊन पडले. त्या व्यथेनें रावणाला क्षणभर मूर्च्छाही आली.

नीलकमलाप्रमाणें अतिकोमल रामतनू रावणाच्या पांच बाणांनीं विद्ध झालेली पाहतांच लक्ष्मणाचें हृदय स्नेहानें कळवळलें आणि तो रामाच्यापुढें झाला व पहिल्यानें एक अर्धचंद्र बाण सोडून त्यानें रावणाचा सारथी मारला. नंतर चपलतेनें त्यानें आणखी शत बाण सोडून रावणाचीं दाही धनुष्यें छेदन करून पाडलीं, इतक्यांत बिभीषणानें पुढें होऊन आठ बाण सोडले आणि रावणाच्या रथाचे आठही घोडे मारले व एका बाणानें ध्वज पाडून टाकला. हा प्रकार पाहतांच रावणाला अतिशय क्रोध आला आणि त्यानें दुसरा स्यंदन आणवून त्यावर आरोहण केलें व बिभीषणाला लक्षून अनिवार ब्रह्मशक्ति सोडली. ती अतितीव्र शक्ति बिभीषणावर येते असें पाहतांच लक्ष्मण पुढें झाला व एकच बाण सोडून त्यानें त्या शक्तीचे तीन तुकडे केले आणि असुरवाहिनीवरच पाडले. सोडलेली शक्ति फुकट गेली असें पाहतांच चिडून रावण बिभीषणाला ह्मणाला—अरे षंढा, सौमित्राचे पाठीशीं दडून कां युद्ध करतोस? आमच्या राक्षसमृगनायकांच्या कुलांत तूं एक जंबूक उत्पन्न होऊन कुळाला डाग लावलास. मूर्खा, कुलाभिमान सोडून शत्रूला शरण

गेलास ! धिःकार असो तुझ्या जीविताला ! आम्हीं तुझा व्यर्थ प्रतिपाळ केला. असें ऐकतांच बिभीषण त्याला ह्मणाला—हे बुद्धिहीना दशग्रीवा, मी श्रीरामचरणीं लागल्यामुळें जन्ममरणातीत झालों. तुला हित कथन करीत असतां तूं ऐकलें नाहींस, कुलक्षय तर करून घेतलासच; आतां अंतीं तूंही मरण पावशील. रामचंद्र या रणयज्ञांत तुझी पूर्णाहुति देईल. असें बिभीषणाचें मर्मभेदक भाषण ऐकतांच रावण करकरां दांत चावूं लागला आणि ह्मणाला—हा अधमाधम सौमित्र तुझें रक्षण करीत आहे, ह्मणून पहिल्यानें याचाच चुराडा उडवितों. याच दुष्टानें माझा प्रियपुत्र महापराक्रमी इंद्रजीत मारला. यानेंच अतिकायाचाही वध केला. इत्यादि अनेक कारणांवरून हा माझ्या मनापासून वध्य ठरला आहे. असें बोलून त्यानें ज्या मयशक्तींत सातकोटि मंत्रांचें तेज असून जी प्रळयाग्नीची केवळ शिखाच, ती अनिवार शक्ति गवसणींतून काढून न्यासासह मंत्र जप करून लक्ष्मणावर सोडून दिली. त्या वेळेस नवखंड पृथ्वी आणि अंबर कडाडून गेलें. सहस्रविजा कडकडतात, त्याप्रमाणें ती अनिवार शक्ति धांवतांना पाहून सरितापति भयभीत झाला व जलचरें समुद्रोदरांत जाऊन लपूं लागलीं. दिग्गजांनीं अंगें टाकलीं. देव विमानें पळवूं लागले. कित्येक वानर मूर्च्छित पडले व कित्येक गिरिकंदरीं जाऊन दडाले. दोन्हीं दळें भयभीत झालीं. महावीर पळ काढूं लागले. पण ब्रह्मांडालाही धीर देणारा महारुद्रावतार मारुती निर्भय धांवला आणि त्यानें ती शक्ति हातांत धरली व मोडून टाकणार तों ती दिव्य स्त्रीरूप झाली आणि "मारुतीला ह्मणाली—तूं ब्रह्मचारी ह्मणवितोस आणि परस्त्रीला झोंबतोस हें काय ? मी रावणाची कन्या, लक्ष्मणाला वरण्यासाठीं जात

आहे. सोड मला जाऊंदे; नाहींतर मुहूर्तवेळ चुकेल. असें ऐकतां मारुतीनें तिला सोडलें, तों ती पुनः पहिलें रूप धरून प्रळय करी निघाली, तों सर्व भयभीत झाले. ही मयशक्ति कोणावर पडणार हें को णाच्याही ध्यानांत येईना. तरी ती लक्ष्मणाला शोधीत चालली होत ही शक्ति आपल्यावर येते असें पाहतांच लक्ष्मणानें तिचें निवार करण्यासाठीं चापावर बाण लाविला तों ती शक्ति येऊन त्याच्या हृ यावर आदळली आणि मृत्तिकाघटवत् वक्षस्थळ चूर्ण करून मोठें भयंक भोंक पाडून पाठीमागून निघाली ती पाताळीं गेली. त्यावेळेस एक हाहाःकार झाला. अंगद, नळ, नीळ, जांबुवंत, सुग्रीव, गवय, सुषेण हनुमंत इत्यादि सर्व मिळून धांवले आणि त्याच्याजवळ येऊन प लागले, तों हृदय विदारण झालें आहे व पाठींतून रक्ताचा प्रव चालला आहे. नाकाला हात लावून पाहतात तों श्वासोच्छ्वासही बंद इतक्यांत रामही जवळ येऊन पाहूं लागला, तों आकर्णपर्यंत बा ओढून सौमित्र पडला आहे. त्याचे हस्त व नेत्र आरक्त झालेले आहे तरी प्राण मुळींच नाहीं; असें पाहतांच रामानें वक्षस्थळ बडवून अं धरणीवर टाकलें आणि लक्ष्मणाच्या मुखावर मुख ठेवून अत्यंत शोका ह्मणूं लागला—सौमित्रा! एकवेळ तरी डोळे उघडून मजकडे पहा. सकुमारा! आपल्या पराक्रमानें त्रिभुवनांत कीर्ति करून कोरे चाललार लक्ष्मणा! चौदावर्षेंपर्यंत तूं आह्मांला फळें पुरविलींस, परंतु म्यां नि यानें तुझ्या क्षुधेची कधींही चौकशी केली नाहीं. हाय हाय! मी तु उपाशीं मारलें, तो राग मनांत धरून चाललास वाटतें. बाळ नकोरे जाऊं! मीही देहत्याग करून तुजबरोबर येतों. अरे, अयोध्ये गेल्यावर माता सुमित्रा मला विचारील तर मी काय सांगावें? नि

गेलकणाच्या इंद्रजिताचा वध तूं केलास, ह्मणून देवही तुझें कल्याण चिंतितात; असें असतां भूमीवर शयन कारे केलेंस? वत्सा! ऊठ ऊठ! तुझ्यासाठीं भरत शत्रुघ्नही प्राणत्याग करतील व रघुकुळाचा पूर्ण क्षय होईल. सौमित्रा! कारे मला प्रतिवचन देत नाहींस! याप्रमाणें राम शोकग्रस्त होतांच सर्व वानर हाहाःकार करूं लागले. तेव्हां तो रावणानुज महाभक्त बिभीषण रामाजवळ येऊन बोलूं लागला–

हे नरवरिश्रेष्ठा रामचंद्रा, शत्रु आपल्यासमोर उभा असतां शोक करणें हा क्षत्रियांचा धर्म नव्हे; विचार करून पहा. वैरी समोर उभा आहे, त्याचा आधीं पराभव करावा. नंतर लक्ष्मणाचा विचार कळेल तसा करितां येईल. प्रभो, सर्वथा लक्ष्मणाला भय नाहीं. आधीं या धनुष्यावर बाण योजून रावणाचा पराभव करावा. असें बोलून धनुष्य हातीं देतांच रामचंद्राला अनावर क्रोध उत्पन्न झाला आणि कृतांतही पाहूं न शके, असें वज्रठाण मांडून तो उभा राहिला व रावणाला ह्मणाला–चोरा रावणा, सौमित्रावर शक्ति टाकून तूं कोठें पळून जाशील? मी एकाच बाणघातानें तुझा चुराडा उडवितों पहा? असें बोलून राम एकेक शर सोडूं लागला, पण तो सुटतांच कोट्यानुधि रूपांनीं राक्षसांचीं शिरें तटातट् उडवी. मयूर जसा पुच्छ पसरतो, तसे रावणाच्या सर्वांगावर शर रुपले. रावण जे जे तिखट तिखट करून बाण सोडीत असे, ते सर्व फुकट जात असत. त्यावेळेस किती संहार झाला याबद्दल वाल्मिकानें गणती केली आहे. दहाहजार उन्मत्त वारण, एकलक्ष अश्व स्वारांसहित, पन्नासहजार महारथि आणि शंभर कोटि पायदळ, इतकें सैन्य पडलें ह्मणजे एक कबंध उठत असे. अशीं कोटि कबंधें रणांत नाचूं लागलीं, ह्मणजे रामधनुष्याला

चौदा घंटा असत त्यांपैकीं किंचित् वाजत असत. कवि ह्मणतात—या वेळेस रामधनुष्याच्या चौदाही घंटा अर्धयामपर्यंत घणघण घणघण वाजत राहिल्या होत्या. त्यावरून त्या वेळेस सैन्य किती पडलें, याचें गणित शेषालाही होणार नाहीं. असो. रामाच्या बाणजालानें तो राक्षसपाल तटस्थ झाला व त्याला दोन्हीं दळें रामरूप दिसूं लागलीं. कोट्यानकोटि राममूर्ति असंख्य बाणवर्षाव करीत आहेत, असें त्याला भासूं लागलें. पुढें, मागें, सव्य, वाम, जिकडे तिकडे रामच राम ! सर्व राक्षसही राम. रावण आपलें अंतःकरण पाहूं लागला, तों तेंही त्याला रामरूप दिसूं लागलें. त्याचें मन, बुद्धि, चित्त, सर्व रामरूप झालें. दशेंद्रियें, पंचप्राण, पंचभूतें, पंच विषय, चारी देहावस्था रामरूप भासूं लागल्या; तेव्हां रावणानें डोळे उघडले, तों रथ, सारथी, ध्वज, चाप, बाण, सर्वत्र रामरूप ! रथावरही अनेक रामरूपें चढून आपल्यास बिलगताहेत असें त्याला वाटूं लागलें. अणुरेणुपासून अंतर्बाह्य त्याला सर्व रामरूप दिसूं लागतांच "अरे हा राम आला" असें ह्मणत तो भयानें पळत सुटला असतां त्याला धरणीही रामरूप दिसूं लागली. भयानें हांका फोडीत तो लंकेजवळ गेला, तों तीही त्याला रामरूप दिसूं लागली. दुर्ग, हुडे, कळप इत्यादि सर्व ठिकाणांवर राम उभा हे असें त्याला वाटलें. हातांतील शस्त्रें, अंगावरील वस्त्रें आणि अलंकारही त्याला रामरूप दिसूं लागल्यामुळें त्यानें त्यांचा त्याग केला आणि केवळ नग्न वेड्यापिशाप्रमाणें होऊन तो आपल्या मंदिरांत धांवत आला आणि मंदोदरीजवळ बसून रणांतील वर्तमान सांगूं लागला—

तो ह्मणाला—प्रिये, मी आज पुरुषार्थानें रणांत जाऊन लक्ष्मणाचा प्राण घेतला; परंतु रामानें सर्व जन, वन व्याप्त केलें ह्मणून मी भय पाव-

लों व येथें पळून आलों. करंड्यांतील कस्तुरी सरल्यावरही मागें जसा तिचा सुगंध उरतो, तसें माझ्या हृदयांतील भयाचें वारें अजूनही जात नाहीं. यासाठीं शुक्राचार्यांनें मला मृत्युंजय मंत्र दिला आहे, त्या परम पवित्र मंत्राचें अनुष्ठान करतों. असें ऐकतांच मंदोदरी ह्मणाली—प्राणनाथ, व्यर्थ अनुष्ठानाच्या भरीस न पडतां त्या मदनांतक सख्याला आपला मित्र करून घ्या ह्मणजे झालें. अथवा समराविषयीं तरी दृढ कांस घालून युद्ध करावें हेंच चांगलें असें मला वाटतें. याप्रमाणें जरी मंदोदरीनें अनेक प्रकारें करून सांगितलें, तरी तें न ऐकतां तो घोर कर्मास प्रवृत्त झाला. त्यानें गुप्तपणानें हवन करण्यासाठीं भूमींत एक विशाळ गुहा तयार केली आणि काळनेमी नामक निशाचराला बोलावून सांगितलें कीं, मारुती कदाचित् रात्रींतल्यारात्रींत जाऊन द्रोणाचल घेऊन येईल, यासाठीं तूं जाऊन त्याला मार्गांत विघ्न कर आणि त्याजपासून तो पर्वत हिरावून घे. अथवा पुरुषार्थानें त्याला मारून टाक. असें ऐकतांच तो राक्षससमुदाय बरोबर घेऊन गेला आणि द्रोणाचलाच्या मार्गांत विप्राचा वेष धरून बसला.

इकडे रावणाला पळवून राम लक्ष्मणाजवळ आला आणि त्याचे गुण आठवून अपार शोक करूं लागला. तेव्हां सुषेणवैद्यानें लक्ष्मणाची नाडी पाहून रामाला सांगितलें—उद्यां सूर्योदयीं याचा प्राण जाईल, तोंपर्यंत जर द्रोणाचलावरील पीयूषवल्ली कोणी आणील, तर मी याला निश्चयानें उठवीन. असें ऐकतांच दीनवदनानें राम सर्व कपींकडे पाहूं लागला; पण आपल्या हातून कार्य होणें नाहीं, असें मनांत आणून प्रत्येक कपि अधोवदन होऊन बसला, इतक्यांत रामाचा निर्वाणीचा सखा जो भग्नभरतशोकहरण मारुती तो रामाला साष्टांग नमस्कार

घालून हात जोडून पुढें उभा राहिला आणि ह्मणाला-प्रभो, चिंता करूं नये; तीन प्रहर रात्र गेली नाहीं तों द्रोणाचलनामा पर्वत घेऊन येतों. राम ह्मणाला-सौमित्र तुझा याचक आहे. त्याला स्नेहानें प्राणदान देणें तुझ्या हातीं आहे. असें ऐकतांच तो मारुती आपलें मन रामचरणीं ठेवून " जयजययशस्वी श्रीरामचंद्र ! " असें बोलून जो उडाला तो वायूलाही मागें टाकून उत्तरपंथानें झेंपावत चालला. मस्तकावर लांगूल धारण करून वारंवार 'जययशस्वी रघुवीर !' अशी गर्जना करीत तो एका घटकेंत सप्तद्वीपें ओलांडून द्रोणाचलाच्या अलीकडे मंदराचलपर्वत महा प्रकाशवंत होता, त्याजपाशीं पोंचला. त्या पर्वताच्या अलीकडे एका योजनावर कालनेमी ब्राह्मणवेषानें राक्षसांना शिष्य करून आश्रम बांधून अन्नसत्र स्थापन करून मारुतीची वाट पहात बसला होता. इतक्यांत मारुती तृषाक्रांत होऊन त्याच ठिकाणीं आला. त्याला पाहतांच तो कपटी आदरातिथ्य करण्यासाठीं पुढें धांवत गेला आणि महाराज, घर आपलें आहे, खुशाल चार दिवस येथें रहावें; असें ह्मणूं लागला. तेव्हां मारुतीनें त्याला सांगितलें-मला कांहीं उतावळीच्या कामासाठीं पुढें जाणें आहे, तर कृपा करून थोडेसें उदक प्राशन करण्यासाठीं द्या. राक्षसानें अनेक प्रकारें आग्रह केला पण मारुती जेव्हां राहण्याचें कबूल करीना, तेव्हां तो आपल्या शिष्यांस ह्मणाला-अरे, या मर्कटाला पुनः हा न मागेल असें पाणी दाखवा. अरे तें विवशीचें सरोवर दाखवा, ह्मणजे ती एका क्षणांत याला आपल्या उदरांत ठेवील असें ऐकतां शिष्यांनीं मारुतीला त्या विवशी असलेल्या सरोवरावर नेलें. तेथें जातांच मारुती आंत उतरून रामस्मरणपूर्वक जों उदकपान करूं लागला, तों त्या जलदेवतेनें येऊन अकस्मात् त्याचा पाय धरला, त्या

बरोबर त्यानें तिला बाहेर ओढून काढलें आणि एक मुष्टिप्रहार करून तिचा प्राण घेतला. इतक्यांत तिच्या त्या विशाळ देहांतून एक दिव्यरूप पावलेली स्त्री बाहेर पडली आणि मारुतीचे चरण वंदून आपलें वर्तमान सांगूं लागली.

महाराज, मी एक स्वर्गांतील देवांगना आहें. मी आपल्या रूपाभिमानानें कोणासही मानीत नसें. एकेदिवशीं एका तपस्व्याला मी सहज हंसलें. तेव्हां त्यानें मला शाप दिला कीं, तूं महाक्रूर विवशी होऊन जलांत राहशील, असें त्या मुनीचें शापवचन ऐकतांच मी पाय धरून उःशाप मागितला; तेव्हां तो ऋषि ह्मणाला कीं, मारुती रात्रींत द्रोणाचल नेण्यासाठीं येईल; तो तुझा उद्धार करील. ती गोष्ट आज प्रत्ययाला आली. आतां आणखी एक गोष्ट आहे, ती मी तुला सांगतें. ज्यानें तुला हें सरोवर दाखविलें, तो खरोखर ब्राह्मण नसून एक कपटी काळनेमी नामक निशाचर होय. याला रावणानें तुला मुद्दाम मार्गांत विघ्न करण्यासाठीं पाठविलें आहे, त्याचा संहार कर. असें वर्तमान सांगून ती स्वर्गास जातांच मारुती परत काळनेमीचा निःपात करण्यासाठीं आश्रमांत गेला. तों ते विप्रवेषधारी ब्राह्मण त्याजपाशीं दक्षणा मागूं लागले, इतक्यांत मारुतीनें पुढें आलेल्यांवर एक मुष्टिप्रहार करून त्यांस निजविलें, तेव्हां सर्व राक्षस विशाळ शरीरें धरून त्यावर चालून आले; तेव्हां मारुतीनें विचार केला कीं, आतां अधिक वेळ खर्चून उपयोग नाहीं. असें मनांत आणून त्यानें काळनेमीसह कित्येक असुरांचा भारा बांधला आणि भूमीवर आपटून सर्वांस गतप्राण केलें. तेव्हां उरलेले राक्षस लंकेंत पळून गेले.

काळनेमी राक्षसाला मारुतीनें आपटून मारतांच जो ध्वनि झाला

तो गंधर्वांनी ऐकला आणि चौदा हजार गंधर्वे एकदम मारुती धांवून आले; पण त्यांस पाहतांच मारुतीनें त्या सर्वांचा एकच भा बांधला आणि सर्वांस एकदम आपटून यमपुरीस पाठविलें. नंतर सौमि त्रजीविताच्या काळजीनें तो तेथून जो उडाला तो द्रोणाद्रीसमीप येऊ उभा राहिला. त्याला पाहतांच द्रोणाचल भयभीत झाला. पण मारु तीनें त्याला हात जोडून त्याची प्रार्थना करीत असतां सांगितलें कि त्रिभुवननायकचापपाणि जो राम त्याजवर उपकार करण्यासाठीं चल. अथवा औषधि तरी दे. असें ऐकतांच द्रोणाचल ह्मणाला—मर्क टा, वारंवार कां खेपा घालतोस? कोण राम? मी ओळखतही नाहीं ह्मणून मी येत नाहीं व औषधिही देत नाहीं. असें ऐकतांच मारुतीस क्रोध आला. नंतर त्यानें त्या पर्वताला पुच्छाचे तीन वेढे घालून समूळ उपटलें आणि आकाशपंथानें सुवेळाचळाचा मार्ग धरिला.

नंदिग्रामीं भरत होता. त्याला असें दुष्टस्वप्न पडलें कीं, एक काळा पुरुष येऊन त्यानें दक्षिण बाहु गिळला. हें स्वप्न पाहतांच तो गजबजून जागा झाला आणि गुरूजवळ स्वप्न सांगून राम सौमित्रांचें कुशलवृत्त विचारूं लागला. गुरु ह्मणाला– ते सर्व सुखी आहेत. तरी हें दुष्ट स्वप्न आहे, ह्मणून याची शांति करावी. असें ऐकतांच तो भरत हवनद्रव्य जमवून होम करूं लागला. भरत आहुति टाकीत आहे, इतक्यांत हनु मंत आकाशांतून जात असलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्या हातां तील अग्निगोलाप्रमाणें तो द्रोणाचल पडतो कीं काय, असें भरतास वाटल्यावरून त्यानें पूर्णाहुति देऊन रामनामांकित बाण चापावर लावून सोडला व पर्वतासह मारुतीचा हात खिळून टाकला. तो रामनामचि न्हित बाण लागतांच हनुमंताला असह्य मूर्च्छना आली व तो पर्वतासह

रामस्मरण करीत खालीं पडला. रामस्मरण ऐकतांच भरत जवळ आला तों एक वानर महा पर्वत घेऊन रामस्मरण करीत पडला आहे. त्याला पाहतांच भरताच्या मनांत स्नेह उत्पन्न झाला व तो त्याची चौकशी करूं लागला. तेव्हां मारुती हाहाःकार करून ह्मणूं लागला–आतां लक्ष्मण कसा वांचेल? हाय हाय! दुर्दैवानें मजवर आज हा भयंकर प्रसंग आणला. असें बोलून त्यानें सर्व वर्तमान सांगतांच भरतही शोक करूं लागला. तरी शेवटीं हनुमंतास ह्मणाला–आतां तुला पर्वतासह बाणाग्रीं स्थापन करून सुवेळेस पाठवून देईन तरच मी रामाचा दास भरत! याप्रमाणें त्याचें भाषण ऐकतांच हनुमंताला फार आश्चर्य वाटलें आणि तो भरताला ह्मणाला–हे भक्तश्रेष्ठा, तूं व तुझा सर्व वंशही धन्य आहे. रामनामांकित बाण आला, ह्मणून त्याला मान देण्यासाठीं मी खालीं आलों. नाहींतर माझें बळ एक रामच जाणतो. आतां मला आज्ञा द्यावी. कारण राम माझी अगदीं मार्गप्रतीक्षा करीत असेल. असें ऐकतांच भरत ह्मणाला–रामाला माझा साष्टांग नमस्कार सांग आणि असें ह्मण कीं, चौदा वर्षे भरतांच तूं न येशील तर भरत खरोखर प्राणत्याग करील. असें ऐकतांच मारुती 'जययशस्वी रघुवीर' असें ह्मणून तेथून अति वेगानें उडाला.

इकडे रामचंद्र तीनप्रहर रात्र सरली, असें समजून मारुती अद्याप कां येत नाहीं, ह्मणून वानरांसह चिंता करूं लागला, इतक्यांत जसा सूर्योदय होतो, तसा पर्वतासह मारुती दिसूं लागला, तेव्हां त्याला न ओळखतां वानर रामाला सांगूं लागले कीं, स्वामी मित्रोदय झाला असें वाटतें. असें ऐकतांच रामाला कोप आला आणि तो वानरांस ह्मणाला–हा कुलघातकी आज उत्तरेस उदय पावला काय? रामानें

असें बोलतां बोलतां धनुष्य चढविलें आणि पुनः [illegible] राक्षसांचा पक्ष धरून माझ्या सौमित्राचें आयुष्य चोरणाऱ्या [illegible] आज मी नाहींसा करीन. असें बोलून राहुमुख शर धनुष्यावर [illegible] तोंच सुषेण ह्मणाला—महाराज, अविचार करूं नये; तो मारुती द्रोणाचल घेऊन येत आहे. असें ऐकतांच रामाला अत्यानंद झाला इतक्यांत तो पुरुषार्थी अंजनीतनय पर्वत झेलीत झेलीत रामदर्शना साठीं खालीं उतरला. त्यास पाहतांच सुग्रीवादि सर्व वानर पुढें धांवले आणि जयजयकार करून सर्वांनीं त्याच्या हातावरील पर्वत खालीं उतरला. नंतर मारुती लोटांगण घालीत रामाकडे जात असतां रामानें आसनावरून उठून त्याला हृदयाजवळ धरिलें व प्रेमाश्रूंनीं त्याला अभिषेक केला. त्याचें मुख स्वहस्तें कुवाळलें आणि त्याचा अतिशय गौरव केला. नंतर सुषेणानें पर्वताला नमस्कार करून त्यावरील तीन औषधी काढल्या आणि एकांतीं त्यांचा रस काढून तीन पात्रें भरलीं आणि लक्ष्मणाजवळ आणून पहिल्यानें संजीवनीचा रस त्याच्या तोंडांत ओतला व घायांत संधिनीरस घालतांच सर्व घाव भरून आले. नंतर विशल्येचा रस बाणशल्यांवर लावितांच त्याची सुवर्णाप्रमाणें दिव्य कांति झाली आणि जसा निजलेला मनुष्य जागा होतो, तसा तो लक्ष्मण अकस्मात् सावध झाला. त्याचा बाण आकर्ण-पर्यंत ओढलेला तसाच होता. तो सावध होतांच संभाळरे रावणा, उभा रहा, असें ह्मणत वेगानें धांवला आणि अरे रावण कोठें आहे? असें विचारूं लागला. तेव्हां रामानें त्याला हातीं धरून अतिप्रेमानें आलिं-गन दिलें. तेव्हां सर्व कपींनीं जयजयकार केला आणि देव आनंदानें सुमनवर्षाव करूं लागले. नंतर सुषेणानें पडलेले सर्व वानर उठविले,

तेव्हां सर्व कपि आणि इंद्रादि देव मारुतीचे यश वर्णन करूं लागले.

नंतर रामाज्ञेनें मारुती द्रोणाचल परत घेऊन निघाला, तेव्हां रावणाला वर्तमान कळलें कीं, हनुमंतानें द्रोणाचळ आणून सौमित्रासह सर्व कपि जिवंत केले आणि आतां हनुमंत पर्वत घेऊन परत चालला आहे, असें कळतांच त्यानें शंभर राक्षस निवडून काढून पर्वत हरण करण्यासाठीं मारुतीवर पाठविले. पण ते पाठीस लागून जेव्हां वानरा, पर्वत टांक ह्मणूं लागले; तेव्हां हनुमंतानें एका हातावर पर्वत घेऊन दुसऱ्या हातानें व पायांच्या लाथांनीं त्या सर्वांचा वध केला आणि तो पर्वत जागच्याजागीं नेऊन ठेविला व सुवेळेस परत आला; तों सूर्योदय झाला. नंतर रामापुढें हात जोडून भरताकडील वर्तमान सांगत असतां तो रामाला—नंदिग्रामीं भरतानें मला पर्वतासह पाडलें होतें. ह्मणजे—त्यानें आपल्या नाममुद्रेचा बाण सोडला. तेव्हां मी मुद्दाम खालीं आलों आणि क्षणभर त्याचा अंत पाहिला पण तो महा पराक्रमी ! माझी पर्वतासह बाणाग्रीं स्थापना करून मला येथें पाठवीत होता. याप्रमाणें मारुतीनें सांगतांच सर्व कपि आश्चर्य करूं लागले. रामही सद्गद होऊन ह्मणाला कीं, मी माझ्या भरताला केव्हां जाऊन भेटेन, असें झालें आहे. असें ऐकतांच मारुती ह्मणाला—प्रभो, त्याचें निःसीम पूर्णप्रेम, भजन, भक्ति आणि वैराग्यानें भरलेलें आहे. तो आपली चातकाप्रमाणें रात्रंदिवस वाट पहात आहे व चौदावर्षें भरतांच न याल तर मी देहत्याग करीन असें त्यानें सांगितलें आहे. हे शब्द ऐकतांच रामास परमानंद झाला.

---

अध्याय ३१वां





# अध्याय ३३ वा.

लक्ष्मण सावध झाल्यानंतर रामासह सुग्रीवादि सर्व कपिगण आनंदांत आहेत, तों बिभीषण येऊन सांगूं लागला—प्रभो, रामचंद्रा, आज रावण युद्धाला बाहेर न येतां इंद्रजिताप्रमाणें हवन करून दिव्यस्यंदन निर्माण करीत आहे. त्याच्या होमधूम्रेंकरून आकाश भरलें आहे व आहुतींचा परिमळ सुटला आहे आणि हवनांतून अर्धा स्यंदन बाहेर येत आहे; यासाठीं पहिल्यानें त्याला उठवून रणांत आणावें. असें ऐकतांच नल, नीळ, जांबुवंत, अंगद, मारुती, गवय, गवाक्ष, गंधमादन, शरभ आणि केसरी, हे मुख्य दहा कपि रामाला वंदन करून उठले आणि लंकेंत येऊन, घरोघरीं रावणाचा शोध करूं लागले. जे जे राक्षस भेटत त्यांस ते ताडण करून रावण कोठें आहे ? असें विचारीत. त्यांनीं सगळें लंकानगर शोधलें परंतु रावणाचा शोध लागेना. तेव्हा बिभीषणाची स्त्री सरमा गुप्तरूपानें येऊन सांगून गेली कीं, रावण नगरदुर्गाखालीं गुप्त विवरांत बसून हवन करीत आहे, असें ऐकतांच सर्व कपि त्या विवराजवळ गेले आणि त्याच्या मुखावरील शिळा फोडून टाकून त्यांनीं विवरांत जाण्यास मार्ग केला. त्या ठिकाणचें संरक्षण करणारे कित्येक राक्षस होते, त्यांचाही वध करून वानर आंत जाऊन पाहतात तों त्या भव्य विवरांत प्रचंड शिवालय आहे, त्याच्यापुढें विशाळ अग्निकुंड धडधडत असून दशतुंड अव्यग्र होत्साता नेत्र झांकून अवदानें देत आहे, रावणानें रक्तानेंच स्नान केलेलें असून त्याच्याजवळ कित्येक रक्तकुंभ भरलेले आहेत. मांसाचे व नरशिरांचे पर्वत पडले आहेत आणि रावण वज्रासनावर बसला आहे. त्याला पाहतांच सर्व

कपि आश्चर्य करूं लागले; त्यांच्या मनांत असें आलें कीं, याचा कुल-क्षय झाला तरी जयाशा धरून हा अभिमानी पुरुष त्या प्रयत्नांत आहे.

वानर त्याच्या सभोंवतीं जाऊन उभे राहिले, तरी तो त्यांजकडे पाहीना. तेव्हां वानरांनीं शिळा व पर्वत टाकून होमकुंडाचा विध्वंस केला; सामग्री सांडून टाकली व यज्ञपात्रेंही फोडिलीं; तरी तो सावध होईना, तेव्हां त्याचीं वस्त्रें फेडून त्यांनीं त्याला नग्न केलें. दाही मुखांत धूळ भरली आणि वक्षस्थळावर वृक्षपाषाणांनीं ताडण करूं लागले; तरी तो सावध होईना. तेव्हां अंगद तेथून निघाला तो राणिवशांत आला आणि मंदोदरीला उचलून त्यानें रावणापाशीं आणलें. परमसकुमार लावण्यखाणी मंदोदरी ती! तिला पाहतांच वस्त्रालंकार हरण करून वानर रावणाच्या अंगावर लोटूं लागले. जेव्हां तिची अति विडंबना होऊं लागली, तेव्हां ती आक्रोश करीत असतां ह्मणूं लागली—प्राण-नाथ! आग लागो या तुमच्या अनुष्ठानाला! वानरांनीं तुमच्या स्त्रीची तुमच्यासमोर विटंबना चालविली आहे, तरी तुह्मीं शुद्धीवर कां बरें येत नाहीं? याप्रमाणें त्या पतिव्रतेचा आकांत ऐकतांच रावण शुद्धीवर आला आणि पाहतो तों हवनाचा विध्वंस झाला आहे आणि वानर पत्नीची विटंबना करीत आहेत. ह्मणून त्याला अनावर क्रोध आला. मारुती व अंगद यांस सबळ मुष्टिप्रहार करून इतरांस पायीं धरून आपटूं लागला. तेव्हां सर्व वानर तेथून निसटले आणि सुवेळेवर येऊन रामाला सांगूं लागले कीं, महाराज, रावण उठला आहे, तो आतां युद्धाला येईल. असें ऐकतांच सभा मोडून रामानें कोदंड चढविलें आणि सर्वांस सांगितलें कीं, आज प्रयजेच्या सौभाग्यसागराचें नीर आटलें! आज मी रावणाचा वध करणार!

इकडे रावणानें मंदोदरीला वस्त्रालंकार देऊन तिचें समाधान केलें आणि तिला हृदयाजवळ धरून सांगितलें कीं, प्रिये, कर्मभोग जो आहे, तो भोगल्यावांचून सुटत नाहीं. यासाठीं तूं शोक न करितां मंदिरांत जा. आज मी रणांत जाऊन निर्वाण युद्ध करीन आणि शत्रूचा निःपात करीन, तरच लंकेंत परत येईन. नाहींतर तुझी व माझी हीच शेवटची भेट. असें बोलून त्यानें मंदोदरीला घरीं पाठविलें आणि बाहेर येऊन रणभेरी वाजविण्याची आज्ञा केली व लंकेंत शेष असलेले सर्व राक्षस बरोबर घेतले; त्या वेळेस अनेक भयंकर रणतुरें वाजूं लागलीं. भयंकर राक्षसांचें पदाती दळ पुढें चालूं लागलें, त्याच्यामागून स्वार चौताळत निघाले, त्यांमागून उन्मत्तगज हौद्यांसह धावूं लागले आणि त्यांच्यामागून कोट्यावधि रथ निघाले. रणनोवरा रावण असंख्य वऱ्हाडी पुढें पाठवून बाकी उरलेले बरोबर घेऊन मुक्ति नोवरी वरण्यासाठीं तेजस्वी आणि भव्य अशा एका रथांत बसला होता. लंकेचें सरंक्षण करण्यासाठीं त्यानें बिभीषणास बोलावून आणलें आणि वायुवेगानें तो सैन्यासह रणांत येऊन उभा राहिला.

आज राम रावणाला खास मारणार, असें निश्चयात्मक मनांत आणून आवेशास चढलेले कपि राक्षससेनेवर शिळा व पर्वतांचा वर्षाव करूं लागले. तेव्हां रावणानें दहा धनुष्यें चढवून असंख्य शर सोडले आणि शिळा पर्वत फोडून आपलें सैन्य बाहेर काढलें. तो पराक्रमी लंकानाथ रावण शरजाल टाकून आपल्या कपिसैन्यास त्रास देत आहे, असें पाहतांच रणपंडित राम धनुष्य चढवून पुढें झाला आणि म्हणाला— हे मलिना, पामरा, शतमूर्खा, दशकंधरा, सीतेला चोरून आणून व्यर्थ कुलक्षय करून घेतलास! संतति, संपत्ति, विद्या आणि धन अनुकूल असून

वेदांचीं खंडें केलीस, असें तुझें ज्ञान; पण तें सर्व व्यर्थ गेलें. ज्याप्रमाणें खरपृष्ठीवर चंदन त्याप्रमाणें तुला दिव्यज्ञानाची उणीव नसतांही तुला उपयोग झाला नाहीं. तुझें मात्रनच तसें; त्याला तूं काय करशील? असुरा, आज तुला समरंगणीं खंडविखंड करीन आणि पुढील अवतारीं मुक्ति देईन. असें ऐकतांच रावण ह्मणाला—मानवा, तूं रामचंद्र ह्मणवितोस, परंतु मी राहुरूपानें आजच्या समरांत तुझा पूर्ण ग्रास करीन. माझे बाण सुटतांच मेरुमांदार चूर्ण होतात. तूं सकुमार मानवपुत्र, माझे बाण कसे सहन करशील? सुंदर व कोमल सीता अरण्यांत कष्टत होतीं, तिला मी लंकेंत आणून सुखी केलें आहे. ती कल्पांतींही तुला प्राप्त होणार नाहीं. राम ह्मणाला—दशमुखा, मृत्युसमयीं तुझ्या जिव्हेला फांटा फुटला आहे, ह्मणून तूं अशी बडबड करतोस! असें बोलून रामानें चापाचा टणत्कार केला आणि भयंकर शरवर्षाव करून रावणाचे बाण निवारण केले. रावणानेंही दहांही धनुष्यें चढवून रामाचे बाणनिवारण केले, दोघेही समान योद्धे असल्यामुळें प्रचंड रण माजलें. भूगोल थरारूं लागला आणि बाणांचा मंडप झाल्यामुळें सूर्यमंडल दिसेनासें झालें. अलातचक्राप्रमाणें उभयतांचीं चापें झळकूं लागलीं. चपलेप्रमाणें दोघांच्याही हातांतील अनर्घ्य रत्नमुद्रिका झळकूं लागल्या. इतक्यांत रावणानें भुजंगास्त्राचा प्रयोग करितांच रामसैन्यावर दशदिशांकडून भुजंग धांवून येऊं लागले. असें पाहतांच रामानें सुपर्णबाण सोडला; तेव्हां असंख्य गरुड आकाश फोडून धांवत आले आणि त्यांनीं सर्व सर्प भक्षण केले. नंतर दोघांनींही एकमेकांवर अनेक शस्त्रास्त्रें सोडलीं, परंतु कोणीही कोणास हरविलें नाहीं. शेवटीं रावणानें एक प्रखर बाण सोडला. तो रामाचा वामपाद फोडून गेला. तेव्हां सर्व वानर एकदांच

उठले आणि रणांतील पडलेलीं शस्त्रें हातांत घेऊन राक्षसांना सारखे झोडीत सुटले. सबळ परमार्थ विचारानें ज्ञानी जसे संसारदळ विध्वंसून टाकतात, तसे सर्व रामोपासक जुत्पति असुरदळ रगडूं लागले. त्यांनीं अभिमानाचे मुगुट परमार्थ बाणानें चूर्ण केले. त्रयावस्थांचीं कवचें ज्ञान-खड्गानें तोडून टाकलीं. समवृत्तीचीं शस्त्रें घेऊन द्वेष धनुष्यें खंडित केलीं. निराशाचक्रानें लोभाचे भाते उडविले. स्वरूप साक्षात्कारबाणांनीं सिद्धपताका तोडून पाडल्या. बोधपरशेंकरून मोहध्वज छेदिले. अनुसंधान परिघ घेऊन अविद्यारथ चूर्ण केले. विरक्ति गदा घेऊन कामकुंजर विदारिले आणि क्रोध, मद, मत्सर, अहंकाराचें पायदळ शमदमास्त्रांनीं तुडवून टाकलें. संकल्प, विकल्प, द्वेष आणि कपट हे असुरांचे घोडे रामोपासकांनीं, समाधान शक्तीनें विदारण केले. राक्षसांकडून आशा, मनशा, कामना ह्या भिंडीमाला येऊं लागतांच रामदासांनीं मनोजयाची ढाल पुढें करून त्या अगदीं व्यर्थ दवडिल्या. याप्रमाणें जेव्हां पूर्ण पराभव होऊं लागला, तेव्हां रावणानें अमोघ बाणजाल घालून सर्व वानरांना आकर्षित केलें. दशकंठ रथारूढ होऊन युद्ध करीत होता व दाशरथी पायांनीं धांवून त्याच्या बाणांचें निवारण, स्वसैन्य रक्षण आणि परसैन्य छेदन करीत होता. हें सर्व सीतेच्या निमित्तानें पण देवांसाठीं !

विमानचारी देव तें भयंकर रण पहात असतां इंद्रानें वाचस्पतीच्या विचार घेऊन मातलीसह आपला विजयरथ रामासाठीं रणांत पाठवून दिला. तो रथ पाहून व मातलीच्या मुखानें देवांकडून उत्तेजन ऐकून रामाला अत्यानंद झाला व रथाला तीन प्रदक्षणा करून तो संतोषानें रथांत बसला. राम रथांत बसला आहे, असें पाहतांच सर्व

कपिगणांस फारच हर्ष झाला व ते जयघोषासह वारंवार भुभुःकार करूं लागले. पण इंद्राच्या रथांत राम बसलेला पाहतांच द्वेषानें रावण कराकर दांत खाऊं लागला. इंद्रजीत, कुंभकर्ण इत्यादि रणांत पडले आणि मंदोदरीची वानरांनीं विटंबना केली; त्याहूनही या वेळेस रावणाला अधिक दुःख वाटलें आणि अत्यंत क्रोधाविष्ट होऊन दहाही धनुष्यें सज्ज करून तो बाणामागें बाण सोडूं लागला; पण रामाचें अचुक संधान, त्यानें तितक्याही शरांचे तत्काळ तुकडे उडविले. दोघेहि समान योद्धे, सिंहनादासह 'घे घे' ह्मणून अमोघ बाण सोडूं लागतांच सर्व आकाश बाणांनीं व्याप्त झालें. बाणभयानें देव विमानें पळवूं लागले. सूर्यचंद्राचे रथ खुंटले, वायूसही फिरावयास मार्ग मिळेनासा झाला, नक्षत्रें रिचवूं लागलीं, मेघ रुधिरधारांचा वर्षाव करूं लागला आणि सप्तस्वर्गांसह सप्तपाताळें दणाणून गेल्यामुळें शेष व कूर्म आपापली मान सांवरूं लागले. दोघांचें तें भयंकर युद्ध पाहतांच अवशिष्ट राक्षस आणि वानर कांपूं लागले.

सात दिवसपर्यंत दोघांचें अहोरात्र युद्ध चाललें होतें; पण त्यांतून एकानें एक क्षणभर तरी विसावा घेतला असें झालें नाहीं. रामानें चार बाण सोडून रावणाच्या रथाचे घोडे मारतांच तो दिव्य रथांत बसला; इतक्यांत रामानें अतिप्रखर अर्धचंद्र बाण सोडला; त्याचें निवारण करावें ह्मणून रावणानें शक्ति काढली होती; पण तितक्यांत त्या बाणानें रावणाचीं दहाही शिरें छेदून पाडलीं; तरी असा चमत्कार झाला कीं, एका क्षणांत दहाही शिरें जशाचीं तशीं उत्पन्न झालीं. तेव्हां रामानें दुसरा सूर्यमुख शर सोडला आणि पुनः रावणाचीं शिरें छेदन करून टाकलीं; तरी तीं पुनः उत्पन्न झालीं.

याप्रमाणें वारंवार शिरें उत्पन्न होऊं लागल्यामुळें सर्व देव आणि वानर रावण कसा मरेल? ह्मणून चिंताग्रस्त झाले. राजाधिराज रामचंद्रही क्षणभर तटस्थ झाला, तेव्हां मातली सारथी ह्मणाला—हे सकलचित्तपरीक्षका आयुष्मंता रामचंद्रा, रावणाच्या हृदयांत अमृताची कुपी आहे, ती पहिल्यानें फोडून टाक ह्मणजे शिरें पुनःपुनः उत्पन्न होणार नाहींत. असें ऐकतांच रामानें त्या सारथ्याचा गौरव करून अगस्तीनें रावणाच्याच मारण्यासाठीं दिलेला जो मुख्य बाण, तो भात्याबाहेर काढला. त्या वेळेस सहस्रसूर्यांचा उदय झाल्याप्रमाणें प्रकाश पडला. रामानें त्या बाणाच्या मुखावर ब्रह्मास्त्राची स्थापना करून त्याला शरासनावर ठेविलें आणि आकर्ण धनुष्य ओढतांच ब्रह्मांड कडाडून गेलें. सर्वत्रांस कल्पांत होतो कीं काय? असा भास झाला. भूमंडळ डळमळूं लागलें आणि सर्व प्रचंड महावीर भयानें मूर्छित झाले. असंख्य चपला मेघमालेंतून एकदम निघाल्याप्रमाणें तो बाण धनुष्यापासून सुटतांच जगद्वंद्य रामाच्या कानांत सांगून गेला कीं, मी अमृताच्या कुपीसह रावणाचा प्राण घेतों. ब्रह्मांडगोल उजळल्याप्रमाणें तो बाण भयंकर नाद करीत जो निघाला, तो नेत्रपातें लवतें न लवतें इतक्यांत जाऊन रावणाच्या हृदयांत रिघाला. त्यानें कुपीसह वक्षस्थळ चूर्ण करून हृदयावर गवाक्षद्वाराप्रमाणें भयंकर छिद्र पाडलें. नंतर तो बाण रावणाचीं तीन शिरें छेदन करून पुनः रामाच्या बाणभात्यांत येऊन स्थिर झाला. उरलेलीं शिरें छेदन करण्यासाठीं जेव्हां रघुनाथानें दुसरा शर काढला, तेव्हां उर्मिलानाथानें त्याला सांगितलें कीं, प्रभो, आतां युद्ध पुरें करावें. रावणानें प्राण सोडला. आतां त्याच्या प्रेताला तुझे बाण शिवत नाहींत, तर आपण

जाऊन रावणाचें प्रेत पाहूं चला. असें ऐकतांच रामानें आमचें अवतार-कृत्य संपलें; असें ह्मणून धनुष्य व तूणीर लक्ष्मणाच्या हवालीं केलें. त्या वेळेस एकच जयजयकार झाला. सुरेश्वर जयदुंदुभि वाजवून कल्पवृक्षांच्या पुष्पांचा वर्षाव करूं लागला. सर्व देवांसह अमरनाथ गंधर्व व किन्नरांसह सुवेळाचळावर धांवत आला. रामाचा विजयोत्साह पाह-ण्यासाठीं योगमार्गानें असंख्यात् ऋषीश्वरही मोठ्या त्वरेनें त्य आत्मारामाचें दर्शन घेण्यासाठीं जमून आले. वानर आनंदानें नाचूं लागले आणि रामानें रावण मारल्याबद्दल त्रिभुवनासही आनंद समुद्राला भरती आल्याप्रमाणें वाटलें.

रामाचे सर्व वीर रावणासभोंवतीं जमून त्याचें प्रेत पाहूं लागले. महा वृक्ष उन्मळून पडल्याप्रमाणें विशाळदेहधारी तो दशकंठ लोळत पडला होता, त्याच्या मुखावर धूळ बसून त्याचे डोळे फोडीत होते; चोहोंकडून रक्ताचे प्रवाह चाललेच होते आणि दहाही मुखांत धूळ भरली होती. हें वर्तमान ऐकतांच बिभीषण धांवत आला आणि दुःखा-मुळें देह धरणीवर टाकून बंधुशिवाय दिशा शून्य झाल्या, असें ह्मणून रावणाचे गुण आठवीत शोक करूं लागला. ज्याचा वध व्हावा या हेतूनें आदिपुरुषानें अवतार घेतला. असा महाप्रतापी व कीर्तिवंत बंधु केवळ अविचारानें वागल्यामुळें नाहींसा झाला; या गोष्टीचें बि-भीषणास फार दुःख वाटलें. अरूप परब्रह्माला रूपास आणून रावणा-नें आपला पराक्रम वाढविला. इत्यादि अनेक प्रकार आठवून तो बिभीषण विलाप करीत असतां राम त्याच्याजवळ येऊन त्याचें सांतवन करण्यासाठीं मधुरोत्तरांनीं भाषण करूं लागला—

बिभीषणा, तूं मूर्तिमंत विवेक आहेस; असें असतां जें आरंभापा-

सूनच नाशवान्, त्याबद्दल शोक काय ह्मणून करतोस ? हा जगडंबर पसारा मायिक असल्यामुळें वंध्यावल्लीच्या फळाप्रमाणें मूळपासूनच मिथ्या आहे. पिंडापासून ब्रह्मांडापर्यंत सर्वांचा नाश होणार आहे. जेथें आकार तेथेंच विकार असतो. हें सर्व तुला ठाऊक असतांही विनाकारण अज्ञानाचा अंगिकार कां बरें केला आहेस ? विवेकानें शोकाचा त्याग कर. असें ऐकतांच बिभीषण उगा राहिला. तों ऐशींहजार स्त्रियांसह मंदोदरी वक्षस्थळ बडवीत व आक्रोश करीत त्या ठिकाणीं धांवत आली आणि रावणाचें प्रेत कवळून शोक करूं लागली. ऐशींहजार स्त्रिया धबाधब ऊर बडवूं लागल्या आणि प्राणनाथ, आह्मांला अनाथ करून परलोकास कां हो गेलेत ? असें ह्मणून विलाप करूं लागल्या. मंदोदरी ह्मणाली–प्राणनाथ! विरोधभक्ती करून आपण मुक्त झालां, पण माझ्या सौभाग्याचें तारूं एकाएकीं बुडालें. अरेरे ! देवा, जें वेदांचें सांठवण, तें एकाएकीं कसें भग्न झालें? याप्रमाणें ती मंदोदरी अनेक प्रकारें विलाप करीत असतां रामचंद्रानें बिभीषणाला सांगितलें–ही तुझ्या ज्येष्ठ बंधूची राणी ज्ञानभागी मंदोदरी पतिव्रतांत शिरोमणी आहे. हिचें स्मरण केलें ह्मणजे दोष उरणार नाहींत. ही तुला मातेपरी वंद्य आहे. यासाठीं हातीं धरून विनयानें हिला मंदिरांत घेऊन जा. असें ऐकतांच बिभीषण मयजे जवळ येऊन ह्मणाला–माते, आतां शोकाचा त्याग करून तूं परत मंदिरांत चल. इतक्यांत रामही तिच्याजवळ येऊन ह्मणाला–मयजे, तूं सज्ञान व सुविचारी आहेस; ह्मणून सांगतों कीं, मुळांत दृष्टि घालून अद्वयज्ञानानें पहा. अहंकार तितका नाशिवंत आणि आत्मस्वरूप पूर्ण व शाश्वत आहे. ज्या चैतन्यासाठीं तूं शोक करतेस,

त्याचा कांहीं नाश झाला नाहीं. तें शाश्वत, अक्षय, नित्य आणि आनंदरूप आहे; असें आहे तर शोक करणें अगदीं व्यर्थ आहे.

याप्रमाणें त्या सच्चिदानंदाचें भाषण ऐकतांच ती मयकन्या स्तब्ध झाली आणि रामचरणीं वंदन करून बिभीषणाच्या विनंतीप्रमाणें घरीं गेली. त्याचप्रमाणें बिभीषणानें सर्व बंधुपत्न्यांची समजूत करून त्यांसही परत पाठविलें आणि रामाची आज्ञा घेऊन रावणाचें शव उचललें आणि सिंधुसंगमावर नेऊन अग्निमुखीं अर्पण केलें. तेथेंच ब्रह्मदेवानें सर्व उत्तरक्रिया सांगितली व बिभीषणानें ती शास्त्ररीती प्रमाणें केली. नंतर बिभीषण सुवेळेवर आला, तों लंकेंतील सर्व प्रजा बिभीषणास भेटण्यासाठीं आली. विद्युज्जिव्हप्रधानानें अवशिष्ट राक्षस-सैन्य व मुत्सद्दी यांसह येऊन रामापुढें लोटांगण घातलें. काष्ठाचें भस्म होतांच जसा वैश्वानर शांत होतो, तसा रावण मरण पावतांच सर्व वैर नाहींसें झालें. सर्व राक्षस सुवेळेवर येऊन आह्मीं बिभीषणाचे किंकर आहों असें ह्मणूं लागले व वानर लंकेंत जाऊन नगर शोभा पाहूं लागले.

नंतर बिभीषण रामापुढें हात जोडून उभा राहिला आणि ह्मणाला– प्रभो, आतां लंकेंत चलावें आणि विरंचिहस्तनिर्मित नगरीची शोभा पाहून जनकतनयेसह परत अयोध्येस जावें. असें ऐकतांच राम हास्यवदन करून ह्मणाला– आह्मीं जी लंका तुला दान दिली आहे, तींत आमचें येणें होणार नाहीं. आणखी भरताच्या भेटी शिवाय मला सर्व मंगलभोग वर्ज आहेत; यासाठीं मी लंकेंत येत नाहीं. याप्रमाणें भाषण करून रामानें सुग्रीव, लक्ष्मण आणि मारुती यांस सांगितलें कीं, तुह्मीं सर्व कपि सैन्यासह लंकेंत जाऊन सुमुहूर्तीं बिभीषणावर

छत्र धरावें आणि बंदींतील देव आणि राजे सन्मानानें सोडून द्यावे. रावणानें अनेकांच्या वस्तु हरण केल्या आहेत, त्या ज्याच्या त्याला देऊन सुखी करावें. अशी आज्ञा होतांच सर्व कपींसह लक्ष्मण निघाला, तेव्हां बिभीषणानें रामचरणीं साष्टांग नमस्कार केला. त्या वेळेस रामानें आशिर्वाद दिला कीं, बळी, ध्रुव, उपमन्यु, हे जसे चिरंजीव आहेत, तसाच तूं बिभीषण चिरंजीव असून सुखी रहा. याप्रमाणें आशिर्वाद घेऊन तो सर्वांसह लंकेंत गेला.

नंतर सुमुहूर्त पाहून वेदमंत्रांचा घोष होत असतां सर्वांनीं मिळून बिभीषणावर छत्र धरिलें. त्या वेळेस पुष्कळ सोहळा केला. सुग्रीव आणि लक्ष्मण यांचा बिभीषणानें वस्त्रालंकार देऊन गौरव केला. सर्व कपिसैन्य व अवशिष्ट राक्षससैन्यही वस्त्रें व भूषणें देऊन गौरविल्यावर लंकेची अपूर्व रचना बिभीषणानें सर्व कपींस दाखविली. नंतर बिभीषणाला विचारून सर्व सुवेळेवर येऊन रामचरणीं लीन झाले.

इतकें झाल्यानंतर तेहतीसकोटि सुरांसह इंद्र, ब्रह्मदेव, शंकर, अष्ट-वसु, नवग्रह, एकादशरुद्र, द्वादशादित्य, मरुद्गण, गंधर्व, यक्ष, किन्नर, सिद्ध, चारण, अष्टनायिका, अष्टदिक्पाल, अठ्यांयशीं सहस्रऋषि, छप्पन देशांतील भूपाल, पातालवासी काद्रवेय आणि उपदेव रामदर्श-नासाठीं सुवेळाचलावर आले. त्या वेळेस आनंदवाद्यांचा गजर होऊं लागला. देवसमुदायांत ब्रह्मा, इंद्र आणि ईशान तिघे मुख्य होते. त्यांत शिवाला वाटलें कीं, जो माझ्या हृदयांत आहे व ज्याच्या नामस्मरणानें मी शांत झालों, तो हा राम परब्रह्म आहे. ब्रह्मदेवाला वाटलें कीं, हा क्षीराब्धिवासी जगदात्मा माझा पिता आहे. इंद्राला वाटलें कीं, हा आमचा पाठिराखा कैवारी आहे व ऋषि हा आमचा

आराध्य देव आहे असें मानूं लागले. सुरांगनांस राम कोटिकंदर्पांचा जनिता भासला व भक्तांस हा पूर्णब्रह्म सनातन आहे असें वाटलें. शिवाला पाहतांच राम आसन सोडून पुढें झाला आणि नमन करूं लागला, तों शिवानें वरच्यावरच धरून त्याला आलिंगन दिलें. त्या वेळेस त्या दोघांत मुळींच भेद नाहीं असें वाटूं लागलें. नंतर कमलासनानेंही रामाला आलिंगन दिलें. इंद्रानें रामचरणीं वंदन करितांच रामानें त्याला उठवून हृदयाजवळ धरिलें. नंतर सर्व देव आणि ऋषि यांस सीताजीवनानें समान भेट दिली. सर्वांच्या भेटी झाल्यावर राम सकलांसह सभेंत बसल्यानंतर मंगल वाद्यें वाजूं लागलीं, नारद तुंबर गायन करूं लागले आणि सुरांगना सप्रेम रामचरित्र गायन करीत आनंदानें नाचूं लागल्या. या ठिकाणीं श्रीरामचरित्राचें सहावें युद्धकांड पूर्ण झालें.

---

# अध्याय ३४ वा.

सुवेळाचलावर सर्व देव, ऋषि आणि भाविक राक्षस जमून सर्व रामास वेष्टून बसले आहेत; तों मारुतीच्या मनांत आलें कीं, राम सीतेला आणण्याची अजून आज्ञा कां देत नाहीं? मारुतीला सीता घेऊन येण्याबद्दलची फारच उत्कट इच्छा झाली, तों अयोध्या-विहारी राम मारुतीला ह्मणाला—प्राणसख्या हनुमंता, आतां लौकर सीतेला मजकडे घेऊन ये आणि तिची व माझी भेट करून दे. बिभीषणाला सांगून तिला मंगलस्नान घाल, वस्त्रालंकार लेवीव आणि सुखासनारूढ करून मजकडे घेऊन ये. असें ऐकतांच जसें तान्हें बालक मातेला शोधित जातें, तसा मारुती आकाशमार्गानें सीतेकडे निघाला. तो अशोकवनांत दाखल झाला व सीतेपुढें हात जोडून उभा राहिला आणि सांगूं लागला—माते, सेनेसह सुवेळेवर रामचंद्र सुखी आहे. त्यानें दशकंठनामक कंटकाचा अंत करून बंदीचे सर्व सुरगण सोडविले. ते सर्व रामाला भेटण्यासाठीं आले आहेत. बिभीषणाला लंकाधिपत्य दिलें आहे. असें ऐकतांच जगन्माता जानकी ह्मणाली—बाळा हनुमंता, तुझीं भाषणें मला अमृताहूनही अति मधुर लागतात, माझ्यासाठीं तूं फार श्रम केलेस, हें एक मी किंवा प्राणनाथच जाणतात. हे जे गेलेले षण्मास, ते मी मोठ्या संकटानें केवळ दुःखांतच काढले. आतां मला रामचरण दाखविण्यासाठीं माझा मार्गदर्शक हो आणि हें असह्य दुःख नाहींसें कर. असें ऐकतांच मारुती अत्यानंदानें "ठीक आहे माते" असें ह्मणून निघाला; तो बिभीषणाकडे आला व त्यानें त्याला रामाज्ञा कळविली. ती ऐकतांच बिभीषणाला परमानंद

झाला आणि दोघेही चिरंजीव एकमेकाचा हात धरून पुनः अशोक-वनांत सीतेच्या दर्शनासाठीं आले.

बिभीषणानें सीतेला पाहतांच मातृप्रेमानें साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां जानकीनें त्याला अशिर्वाद दिला कीं, जोंपर्यंत चंद्रार्क आहेत, तोंपर्यंत सुखानें राहून लंकेचें राज्य कर. असें ऐकतांच बिभीषण पुनः हात जोडून त्या आदिमायेपुढें उभा राहिला आणि ह्मणाला–हे प्रणवरूपिणी, अनादिसिद्धे, आदिमाये, इंदिरे, त्वां आदिपुरुषाला जागाकरून अनंत ब्रह्मांडें निर्माण केलींस. ब्रह्मा, विष्णु व शिव हीं तुझीं बालकें होत. तिघांच्या हातानें तूंच आपल्या इच्छेप्रमाणें उत्पत्ती, स्थिती व संहार करवितेस. हें सर्व तुझें तुला ठाऊक आहे; तरी कौतुकेंकरून नेणतेपणाचा स्वीकार केला आहेस. रावणानें तुला लंकेंत आणलें ही सुद्धां तुझीच इच्छा. बंदीचे देव सुटले आणि माझ्यासह सुग्रीव, मारुती इत्यादि कपिवरांस रामदास्य घडलें, हाही तुझाच उपकार. तर आतां मंगलस्नान करून वस्त्रें भूषणें लेवून रामाला पाहण्यासाठीं सुवेळाचळावर चल. असें ऐकतांच जानकी ह्मणाली–श्रीरामचंद्रानें मंगलस्नान केल्याशिवाय तसें करणें मला उचित दिसत नाहीं. असें ऐकतांच मारुती ह्मणाला–माते, प्रभूचीही तुला आज्ञा व इच्छा आहे कीं, त्वां मंगलस्नान करून वस्त्रालंकारानीं मंडित होऊन यावेंस. शिवाय लंकाधिपति बिभीषणही तुला प्रेमपूर्वक सांगत आहे; यासाठीं त्याच्याही वचनाला मान दिला पाहिजे. असें ऐकतांच सीता मंगलस्नान करण्यास तयार झाली, तेव्हां बिभीषणाची स्त्री सरमा नानाप्रकारचीं उटणीं व सुवासिक तेलें घेऊन सीतेला मंगलस्नान घालण्याच्या सर्व तयारीनें अशोकवनांत आली. त्रिजटा व

सरमा ह्या दोघी सीतेच्या प्राणसंगातिणी होत्या; त्यांनीं सीतेच्या वेणींत जटा झाल्या होत्या, त्या सुवासिक तेल लावून उकलल्या. मारुती व बिभीषण एकीकडे जाऊन बसतांच सरमेनें मनोभावेंकरून सीतेच्या पूजनाला आरंभ केला. उत्तम पाटाव आणून तिला पडदणी साठीं दिला आणि मणिमय चौरंग मांडून त्याजवर त्या जगन्मातेला बसवून आरंभीं सरमेनें तिचे पाय धुतले. त्रिजटेनें सुगंध तेल तिच्या मस्तकावर घालतेवेळीं स्नेहादरानें तिला अनंत आशिर्वाद देत असतां अनंत कल्पेंपर्यंत दोघें आनंदानें नांदा असें सांगितलें. सरमा स्वहस्तानें मृगमदाचें उटणें लावून सीतेच्या अंगाची मळी काढीत असतां, माते, रामविरहामुळें तूं फार कृश झालीस! असें ह्मणूं लागली नंतर उष्णोदक आणलें तें त्रिजटा तिच्या अंगावर मंगलगीतें गात गात ओतूं लागली आणि सरमा तिचें अंग घांसूं लागली. तों बिभीषणानें दिव्य वस्त्रें आणि अलंकार पाठविले. त्यांतील पहिल्यानें मळ्यविजेहून तेजस्वी जरतारी पैठणी सीतेनें परिधान केली आणि तिला शोभेल अशी चोळी अंगांत घातली. नंतर सरमा व त्रिजटा ह्या दोघीजणींनीं त्रिभुवनांतही दुर्लभ असे अलंकार सीतेच्या अंगावर घातले. सूर्यमंडळाप्रमाणें कर्णांतील तांटकें चमकूं लागलीं व सर्व अलंकारांच्या तेजानें दशदिशा प्रकाशित झाल्या. सरमेनें सीतेच्या भालपटलीं कुंकुमाचा मळवट व मध्यें कस्तुरीतिलक लाविला. त्रिजटेनें ज्याचा दिव्य सुगंध असा अंगराग सीतेच्या सर्वांगाला चर्चन केला. नंतर सरमेनें दिव्य फलांनीं जानकीची ओंटी भरली आणि माते, आतां एक फळ तोंडांत घाल असें सांगितलें, तेव्हां सीतेनें परमादरानें एक फळ तोंडांत घालून चाखलें आणि मारुती व बिभीषण यांस प्रसाद देऊन लागलेंच मुख प्रक्षालन केलें. तों बिभीषणानें

दिव्यरत्नांचा हार जानकीपुढें आणून ठेवला. त्यांतील एकेक रत्न त्रिभुवनाच्या मोलाचें ह्मणून रावणानें तो हार आपल्या कोशागारांत फार जपून ठेविला होता, तो बिभीषणानें अत्यादरेंकरून सीतेपुढें ठेवितांच तिनें तो आपल्या गळ्यांत घातला.

नंतर लंकेंतील सर्व सैन्य सिद्ध झालें. अठराअक्षौहिणी वाजंत्री मंगलवाद्यें वाजवूं लागले आणि बिभीषणानें रत्नजडित शिबिका आणवून सीतेला विनंती केली कीं, माते, आतां सुखासनावर बसून प्रभूचें दर्शन घेण्यासाठीं चलावेंस. असें ऐकतांच सीतेनें सरमा व त्रिजटा यांच्या कंठांत मिठी घातली आणि नेत्रांत प्रेमाश्रु आणून सख्यांनो, आतां पुनः तुह्मी मला केव्हां भेटाल? असें विचारलें. तेव्हां त्या दोघींच्याही नेत्रांतून प्रेमाश्रूंच्या धारा लागल्या आणि त्या सीतेच्या चरणाला मिठी घालून स्फुंदस्फुंदून रुदन करूं लागल्या. त्यांनीं आपल्या कुरळ केशांनीं सीतेचे चरण झाडले आणि जेव्हां सीता-शिबिकेंत बसूं लागली, तेव्हां त्या सद्गद कंठानें ह्मणाल्या— प्राण-सखे जनकतनये, तूं आह्मांला विसरूं नको बरें! सीता ह्मणाली— मायबहिणींनो, मी तुमचे उपकार कधींही विसरणार नाहीं.

नंतर परीक्षक ज्याप्रमाणें दिव्यरत्न पेटींत घालतो, त्याप्रमाणें बिभीषणानें शिबिकेवर आवरण घातलें आणि शिबिका उचलतांच अत्युल्हासानें मारुती सव्य बाजूनें व बिभीषण वाम बाजूनें शिबिका धरून चालूं लागले. त्या वेळीं अद्भुत सेना त्या शिबिकेच्या पुढें चालूं लागली. मंगलवाद्यांचा गजर होऊं लागला आणि दाटी हटविण्या साठीं वेत्रपाणी पुढें धावूं लागले. ती जगन्मातेची शिबिका आनंद-गजरासह रामसैन्यांत येतांच सर्व कपींनीं जयजयकार केला व सर्व वानर सीतेला पाहण्यासाठीं शिबिकेजवळ येऊं लागतांच वेत्रधार

त्यांस मारून बाजूला काढूं लागले; तेव्हां अयोध्याविहारी रामानें लंकापतीस सांगून पाठविलें कीं, तुझे वेत्रधार वानरांना मारीत आहेत, त्यांस आवर. सीतेसाठीं कपींनीं बहुत कष्ट केले आहेत, यासाठीं सीता कशी आहे हें त्यांना पाहूंद्या ! पति सन्निध असतां स्त्री जरी सर्वजनांत उघडी वागली, तरी तिला कोणी दोष देत नाहींत. याप्रमाणें आज्ञा येतांच बिभीषणानें वेत्रधाऱ्यांस आवरून शिबिका भूमीवर उतरविली आणि वरील आवरण काढतांच सर्व वानरांनीं ती जनकतनया एकदां पाहिली. नंतर ती लावण्य खाणी सीता पहातांच देवगण, गंधर्व आणि असुर यांच्या मनांत विकल्प उत्पन्न झाला आणि ते सर्व आपापल्या मनांत ह्मणूं लागले कीं, ही तर स्वरूपानें अति सुंदर, सहा महिने रावणाच्या बंदींत होती; असें असतां रावण उगाच कसा राहिला असेल? हा विचार त्यांच्या मनांत येतांच जगच्चित्तपरीक्षक रामचंद्राला कळला आणि जानकी जवळ येऊन उभी राहतांच तो भ्रुकुटी वक्र करून व चढवून तिला ह्मणाला—जानकी, तुला राक्षसानें चोरून नेलें, हा अपवाद जगांत फारच वाढल्यामुळें तुला सोडवून आणलें. आतां मात्र आमच्या मस्तकावरील एक भार हलका झाल्याप्रमाणें सुख वाटत आहे. तुला सोडवून आह्मीं आपलें वचन सत्य केलें. तर आतां तुझ्या मनास उक्त वाटेल तिकडे तूं गमन कर. आतां मी सर्वसंग सोडून औदासिन्यासह काननवास करणार आहें. मला कामवासना अगदीं उरली नाहीं. तुला आवडेल त्या नृपतीला वरून तूं आनंदांत रहा. मला कैकयीनें राज्याबाहेर घालविल्यामुळें राज्यछत्र, सिंहासन आणि कोणताही अधिकार नाहीं. आह्मांला भक्षण करण्यास अन्नही नाहीं; कंदमुळांवर निर्वाह करणारे केवळ कष्टमय वनवासी तापस जे ह्मणतात, ते

आम्ही. आमच्या संगतीनें तुला सुख होणार नाहीं. यासाठीं सीते, तूं वाटेल त्या पंथानें जा आणि कोठेंतरी सुखानुभव घे. तूं माझ्यापुढें उभी राहून काय करतेस ? आम्ही सर्व उपाधि सोडून निरंजनीं येऊन राहिल्यामुळें मनाला आतां दुजेपण आवडेनासें झालें आहे.

याप्रमाणें रामचंद्राचे शब्दबाण सुटूं लागतांच सीतेला कल्पांत होतो कीं काय असें वाटलें. सुंदर कर्दळीवर वीज पडल्याप्रमाणें ती विगलित होऊन शोक करीत भूमीवर पडली आणि विलाप करीत असतां म्हणूं लागली—हे जगद्वंद्या हे आनंदसमुद्रा रामचंद्रा, आतां तूंच आपल्या हातानें माझा वध करून टाक. सहा महिनेपर्यंत कष्टी होत असतां आज हे चरण दृष्टीस पडूनही माझें पूर्वकर्म आडवें आलें-कामधेनूची धार काढीत असतां रुईच्या चिकानें पात्र भरणें, परिसाच्या देवास लोहभक्त जाऊन भेटला तरी त्याचें लोहत्व न जाणें आणि मृगेंद्राच्या रक्षणांत असतां जंबुकानें येऊन प्राण घेणें म्हणजे जसें पूर्वकर्म तशी आज माझी अवस्था झाली. जळत्या घरांतून निघून पुनः वणव्यांत पडल्या सारखीच जर माझी या वेळेस स्थिती आहे, तर मी दिव्य घेईन ! सुवर्णाचें शुद्धपण जसें अग्नींत टाकल्यानें कळतें, तसें माझें पातिव्रत्य शुद्ध असेल तर अग्नीच आपल्या पोटांत घेऊन माझें रक्षण करील आणि त्यांत जर कांहीं अशुद्धपणा असला तर जाळून भस्म करील. असें बोलून तिनें वानरांची दीनवाणीनें प्रार्थना करून प्रचंड अग्निकुंड तयार करविलें आणि त्याच्या ज्वाळा गगनापर्यंत जाऊं लागतांच गळ्यांतील रत्नहार काढून त्यावर टाकला आणि सर्व पहात असतां त्या वेळेस जातवेदाला तीन प्रदक्षिणा करून तिनें ‘ सत्य जय सत्य ’ असें त्रिवार म्हणून अकस्मात् त्या अग्निकुंडांत उडी टाकली. त्यावेळेस कन्या गांजली, म्हणून पृथ्वी कंपायमान झाली-

लक्ष्मण आणि मारुती इत्यादि सर्व कपिमंडळी शोक करूं लागल्या- मुळें एकच आरोळी झाली. इंद्र प्रळयकाळ मानूं लागला. धूम्रेंकरून दशदिशा व्याप्त झाल्या. सप्त समुद्र कढूं लागले. आकाश थरथरूं लागल्यामुळें नक्षत्रांचा सडा पडूं लागला आणि वैकुंठ व कैलासादि पदें डोलूं लागलीं.

सीता त्या प्रळयाग्नींत एक घटिकापर्यंत गुप्त झालेली होती. तेव्हां आतां पुनः जनकतनया दृष्टीस पडत नाहीं,असें वाटल्यामुळें सर्व निराश झाले तों मस्तकावर धव धवीत दिव्यसुमनांची जाळी ठेवून पहिल्याहून अधिक शतगुण लावण्यासह सीता अग्निकुंडाबाहेर आली. तेव्हां तिच्या प्रभेनें सर्व भूमंडळावर शांत प्रकाश पडला आणि सर्वांस आश्चर्य वाटलें.

मागें अरण्यकांडांत सांगितलें आहे कीं, सीता अग्नींत गुप्त झाली, ती या वेळेस दिव्याच्या निमित्तानें प्रगट झाली. सीता रामाची शक्ति ती मुळींच लंकेंत गेली नाहीं; ही खूण वेदांती मात्र जाणतात. अग्नि सीतारूप झाला होता, तोही या दिव्यमिषानें आपल्या स्वरूपांत मि- ळाला. असो. जानकीला पाहतांच अठरापद्में वानर जयजयकारासह वारंवार तिच्यापुढें साष्टांग नमस्कार घालूं लागले. देव सुमनवर्षाव करून वारंवार 'सत्यसती सत्यसती' असें ह्मणत ह्मणत तिला न- मस्कार घालूं लागले. सौमित्र, सुग्रीव, बिभीषण यांनी तिच्यापुढें लोटांगण घातलें आणि मारुती चरण वंदन करून सप्रेम नाचूं ला- गला. नंतर सीता रामाकडे पाहून चालूं लागतांच रामही उभा राहि- ला; तों ती जवळ आली आणि स्मितवदनानें राममुखारविंद न्याहा- ळून तिनें त्याच्या चरणांस मिठी घातली. तेव्हां रामानें तिला उठ- वून क्षेमालिंगन दिलें आणि आपल्या वामांकावर धारण केलें. नव- घनरंग राम आणि त्याला चपलेप्रमाणें लग्न झालेली जानकी, पांस

एकासनावर पाहतांच सर्वांनीं पुनः जयजयकार केला. सुरासुरांचीं वाद्यें सुस्वर वाजूं लागलीं आणि सर्व देव रामाज्ञा घेऊन स्वस्थानीं जाण्यास उद्युक्त झाल्यामुळें प्रथमतः कैलासाधिपति शिव बोलूं लागला–

हे पुराणपुरुषा, पूर्णब्रह्मा, आनंदकंदा, रामचंद्रा, त्वां रविकुलांत उत्पन्न होऊन भक्तांस अगाध लीला दाखविलीस. ज्या तुझ्या नाममंत्रानें मी शांत झालों, त्या नामधारकाला तुला पाहण्याची माझी फार दिवसांची उत्कंठा आज पूर्ण झाली; आतां सीतेसह आनंदानें अयोध्येस जाऊन राज्य कर. राम ह्मणाला–हे कर्पूरगौरा, शंकरा, तूं माझें आराध्यदैवत आहेस! तुझी अद्भुत करणी मी काय वर्णन करावी? ब्रह्मांडाला जाळणारें हालाहल त्वां कंठीं धारण केलेंस. तूं परम दयाळू भोळा शंकर केवळ लोकसुखासाठीं त्या घोरकर्मास प्रवृत्त झालास. हे महादेवा, तूं माझी स्तुति करतोस, तर मी काय तुझ्याहून वेगळा आहें? याप्रमाणें त्यांचें भाषण होत आहे तों कमलोद्भव ब्रह्मदेव बोलूं लागला–हे क्षीराब्धिवासी नारायणा, हे विश्वजीवना, हे अनंतवेषा, अनंतनयना, अनंतशयना, तूं माझा तात; मी तुझ्या आज्ञेवरूनच या चराचरांची घडामोड करीत असतों. गोब्राह्मणांसह देवांस सुखी करण्यासाठीं जो तूं अवतार घेतलास. त्या तुझें अवतारकृत्य आज परिपूर्ण झालें. राम ह्मणाला–हे कमलासना ब्रह्मदेवा, हे विश्वजनका, वेदपालना, सकलललाटपटलेखका, तूं सर्व खुणा जाणतोस. तुझ्यांत व माझ्यांत मुळींच द्वैतभाव नाहीं. मग ही विनाकारण बाह्यस्तुति कशासाठीं?

इतकें झाल्यावर इंद्र हात जोडून ह्मणाला–हे दाशरथे, प्रभो रामचंद्रा, सीतेचें निमित्त करून तूं आह्मांसाठीं फार श्रम केलेस. तुझे उपकार आह्मीं अमरांनीं किती ह्मणून आठवावे? त्यांला गणती

नाहीं. तरी आतां मला तुझी यत्किंचित् सेवा करण्याची इच्छा झाली आहे; ती कांहीं तरी सेवा सांगून पूर्ण कर. राम ह्मणाला—देवेंद्रा, तूं महाचतुर आहेस. समयीं रथ पाठवून साह्य केलेंस व त्याच रथांत बसल्यामुळें मला जयप्राप्ति झाली. इंद्र ह्मणाला—हे सर्वेश्वरा, म्यां पामरानें तुला काय साह्य करावें ? तुझ्या कृपांकटाक्षानें आज आह्मांस स्वपदप्राप्ति झाली; यासाठीं कांहीं तरी सेवा सांगून माझी लालसा पूर्ण कर. असें ऐकतांच राम त्याला ह्मणाला—देवेंद्रा, सकल शास्त्रांचें सार पाहतां असें आहे कीं, परोपकार करणें हें पुण्य आणि पराला पीडा करणें हें पाप होय; ह्या सर्व वानरांनीं केवळ परोपकार करावा ह्या हेतूनें सीतेला सोडविण्यासाठीं राक्षसांबरोबर युद्ध केलें; त्यांत कित्येकांचे प्राण गेलेले आहेत; तर माझे प्रियसखे वानर तूं पुनः जिवंत कर. त्यांच्या अंगावर कोठेंही क्षत नसावें आणि त्यांचीं वसतिस्थानें सदा सुफल असावीं; अशी माझी उत्कट इच्छा आहे ती तूं पूर्ण कर. असें ऐकतांच आपल्या आज्ञेप्रमाणें करितों असें बोलून इंद्रानें रामचरणीं मस्तक ठेवितांच सर्व देव त्या सीतापतीला प्रेमभावानें नमस्कार करून विमानांत बसून आपापल्या स्थळीं निघून गेले. नंतर इंद्राज्ञेनें आकाशांत पीयूषमेघांचीं ढगें आलीं आणि एक घटकापर्यंत अमृतवर्षाव झाल्यामुळें सर्व वानर जिवंत होऊन रामापुढें लोटांगणें घालूं लागले. या ठिकाणीं असा आक्षेप आहे कीं, राक्षस व वानर एकाच ठिकाणावर मरून पडलेले असतां राक्षस कां जिवंत झाले नाहींत ? याचें उत्तर असें कीं, अमृतवर्षावाच्या आधीं शिवानें भूतगण पाठवून राक्षसांचीं प्रेतें भक्षण करविलीं होतीं. ही कथा नाटकरामायणांत स्वतः हनुमंतानें लिहिली आहे; तर खोटी कोण

ह्मणेल ? शंकरानें भूतांस कपींचीं शरीरें भक्षण करूं नका, असें निक्षून सांगितलें होतें, ह्मणून त्यांनीं राक्षस तेवढेच निवडून भक्षण केले होते.

असो. सर्व देव, ऋषि, गंधर्व आणि किन्नर रामाज्ञा घेऊन आपापल्या स्थळीं गेल्यानंतर रामानें बिभीषणाजवळ अयोध्येस जाण्यासाठीं निरोप मागितला. तेव्हां त्याला फार गहिंवर आला आणि तो स्फुंदस्फुंदून ह्मणाला—प्रभो, मला लंकाधिपत्य देऊन तूं माझा त्याग करून जातोस, परंतु तुझ्या चरणावरून मी असलीं सहस्रावधि राज्यें ओंवाळून टाकीन; मला हें राज्य नको. मी तुझ्याबरोबर अयोध्येस येऊन तेथें तुझी सेवा करून राहीन असें ऐकतांच रामानें त्याला हृदयाजवळ धरून सांगितलें—बिभीषणा, दुःखीत होऊं नको. मी तुझ्या हृदयांत अक्षयवास करीत आहें, आतां तुझी इच्छाच आहे, तर तूं आणि सुग्रीव मला पोंचवीत अयोध्येस या आणि तेथील सोहळा पाहून कांहीं दिवसांनीं आपापल्या राजधानीस परता. असें ऐकतांच बिभीषणाला अत्यानंद झाला आणि त्यानें स्वामीची आज्ञा पाळणारें पुष्पकविमान त्या ठिकाणीं आणलें, तें चंद्रप्रभेहून शांत प्रकाश देणारें दिव्यरत्नमंडित कामरूप विमान होतें. रामाची अयोध्येस निघण्याची तयारी झाली. सीतेच्या अंगुलीस धरून राम दिव्यरत्नांच्या जिन्यानें विमानावर चढून मुख्यस्थानीं बसतांच अठरापद्में वानर, बहात्तरकोटि रीस, छप्पन्नकोटि गोलांगुलें आणि असंख्यात राक्षससैन्य विमानांत बसलें. अठराअक्षौहिणी वाद्यें सुस्वर वाजूं लागलीं आणि अंगद व लक्ष्मण रामावर चामरें उडवीत उभे राहिले. नंतर त्या राजाधिराज रामचंद्रानें आज्ञा करितांच तें पुष्पकविमान आकाशमार्गानें अयोध्येचा पंथ लक्षून चालूं लागलें.

---



श्रीरामास नागरीकजन सामोरे जातात

# अध्याय ३५ वा.

रामानें अहंकाररूप रावणाचा वध करून देहबुद्धि लंका घेतली व भाव बिभीषणावर छत्र धरिलें. नंतर ज्ञानकला विदेहतनया येऊन त्याला भेटतांच स्वानंदविमानांत बसून आत्माराम निघतांच वाद्यांचा गजर होऊं लागला. रामाची निर्मळ कीर्ति वानर प्रेमळपणानें गाऊं लागले आणि दोनहजार योजनें उंच जाऊन जसा पौर्णिमेचा चंद्र पश्चिम समुद्राकडे जातो, तसे वेगानें चालूं लागले; त्या वेळेस त्यावरील घंटा घणघण वाजूं लागल्या व दिव्यमणिमय प्रभायुक्त विमान उत्तर-पंथानें निघालें. तेव्हां वामांकावर बसलेल्या सीतेस राम ह्मणाला—कांते, खालीं पहा, हेममयलंका फारच सुशोभित दिसत आहे, पलीकडे ती निकुंबळा पहा, त्या ठिकाणीं सौमित्रानें इंद्रजिताचा वध केला. आह्मीं राहिलों होतों, तो सुवेळाचल पर्वतही दिसत आहे. त्याच्या पलीकडेच तें रणमंडळ पहा. तेथें तुंबळ युद्ध होऊन रावणकुंभकर्णादि विशाळ देहधारी खळ आटून गेले आहेत. पहा पहा जानकी ! या ठिकाणीं सात दिवस अहोरात्र युद्ध करून रावणाचा वध केला. हा शतयोजनें सागर आणि त्यावरील नळहस्तनिर्मित उपलवज्रांचा भव्य सेतु पहा. या अलीकडच्या तीरावर जें दर्भासन आहे, तेथेंच समुद्र येऊन मला भेटला. पुढें तो मलयाचल, विंध्याद्रि आणि सुग्रीवाची राजधानी किष्किंधानगरी दिसत आहे. तें पलीकडे पंपासरोवर दिसत आहे, त्या ठिकाणीं हनुमंताची व माझी प्रथम भेट झाली. पुढें ऋष्यमूक व सुग्रीवाच्या कैवारास्तव वालीचा वध केला, तें स्थान दिसत आहे पहा. या ठिकाणीं शबरीचा उद्धार केला. हें कबंधाचा वध केला तें ठिकाण

समाधान करीत असे काय? असें ऐकतांच सीता स्मितवदनानें ह्मणाली-बाई, तो दयाळू रामचंद्र मजवर अत्यंत प्रीति करीत असे; पण यावरून तुह्मीं त्याला स्त्रीलंपट समजूं नये बरें? मजवर प्रीति करूनही ज्याला रूप व नाम नाहीं; तो माझा पति सदा विरक्त व निष्काम असे. मला रावणानें चोरून नेलें; पण त्या दयासागरानें महत्प्रयत्न करून मला सोडविलें. असें ऐकतांच लोपामुद्रा पुनः विचारूं लागली-तुला रावणानें कसें चोरून नेलें आणि रामानें तुला कसें सोडविलें? हें वर्तमान मला किंचित् विस्तारपूर्वक सांग. असें ऐकतांच पतिप्रताप सांगण्यासाठीं अत्युत्सुक झालेली सीता बोलूं लागली-

आह्मीं पंचवटींत असतां एके दिवशीं आमच्या आश्रमाजवळ एक सुवर्णकांतीचा मृग माझ्या दृष्टीस पडला. त्याच्या चर्माची कंचुकी असावी, अशी मी इच्छा करितांच प्राणनाथ हातांत धनुष्यबाण घेऊन त्याच्यामागें धांवले. नंतर यतीवेषधारी रावणानें येऊन मला उचललें आणि लंकेंत नेऊन अशोकवनांत ठेविलें. मागें माझ्या विरहभ्रमामुळें प्राणनाथ वृक्ष पाषाण आलिंगीत असतां मारुतीच्या योगानें सुग्रीवाचें व त्यांचें सख्य झालें. त्यांनीं इंद्रपुत्र वाली सुग्रीवाच्या कैवारास्तव मारिला आणि सर्व कपिवरांशीं सख्य जोडलें. नंतर त्यांनीं वायुपुत्राला माझ्या शोधास्तव लंकेंत पाठविलें. त्यानें मला भेटून अशोकवनाचा विध्वंस केला; एकट्यानेंच अपार राक्षस मारिले आणि लंका जाळून गेला व माझा शोध सांगून त्यांनां कपिसैन्यासह लंकेस घेऊन आला. नंतर अद्भुत रण माजलें. असंख्य राक्षसांचा प्राणनाथांनीं संहार करून शेवटीं रावणालाही एकाच बाणानें मारिलें आणि [illegible] [illegible] [illegible] रावणाच्या

बंदींत सगळे देव होते ते सोडवून आह्मीं पुष्पकविमानांत बसून परत निघालों, त्यावेळेस मी जों विमानांतून खालीं पाहिलें,तों शत योजनें रुंद सागरावर पाषाणांचा प्रचंड सेतु बांधला आहे. बाई! तुह्माला काय सांगावें? सगळ्यापेक्षां त्या सेतूचें मला मोठें आश्चर्य वाटलें.

याप्रमाणें सीतेनें विसरतांना सेतूची गोष्ट सांगतांच लोपामुद्रा तिला ह्मणाली-कसलं बाई नवल वाटलं तुला? इतका तुझा पति पुरुषार्थी होता, तर त्यानें बाण सोडून त्याचें जल शोषण करून कां टाकलें नाहीं? माझ्या पतीनें तर एका आचमनानेंच सगळा समुद्र प्राशन करून टाकला होता. तुला खरोखर सांगतें, रामानें प्रचंड सेतु बांधून कपींना व्यर्थ परिश्रम मात्र दिले. असें ऐकतांच सीता क्षणभर तटस्थ झाली आणि ह्मणाली-अगबाई, माझ्या पतीनें जर बाण सोडला असता तर सप्त समुद्र आटून गेले असते. बिंदुमात्रही उदक राहिलें नसतें आणि त्यामुळें सगळे जीव जंतु मरण पावले असते. त्याशिवाय माझ्या प्राणनाथाजवळ सप्तसमुद्रांचें एकच आचमन करणारे असे कित्येक बलवान् कपि आहेत. असें असतां आचमन कां केलें नाहीं ह्मणाल तर तुझ्या पतीच्या अपवित्र मूत्राला ते पवित्र रामोपासक स्पर्शही करीतना; मग प्राशनाचें नांव कशाला घ्यावें? याप्रमाणें जनकतनयेनें स्पष्ट उत्तर देतांच लोपामुद्रा स्तब्ध झाली. नंतर तिनें जानकीची ओंटी भरून तिचा पुष्कळ गौरव केला. इकडे अगस्तीनेंही रामाची पूजा करून बहुत गौरव केला आणि अत्यानंदानें लक्ष्मणासह राम सीतेला घेऊन पुनः पुष्पकविमानांत बसला आणि तें विमान पुनः आकाशमार्गानें निघालें.

नंतर भारद्वाजाश्रम दृष्टीस पडतांच रामानें पुष्पकविमान तेथें स्थिर

करून भूमीवर आणलें. राम आला असें ऐकतांच चोहोंकडून अनेक मुनि धांवत येऊं लागले. रामानेंही विमानाखालीं उतरून सर्वांस साष्टांग नमस्कार केला; तेव्हां भारद्वाजानें त्याला प्रेमानें हृदयाजवळ धरिलें आणि आजचा दिवस धन्य आहे! चौदा वर्षांवर चौदा दिवस पूर्ण होतांच हा परात्परसखा राम माझ्या दृष्टीस पडला. असें मोठ्या प्रेमानें ह्मटलें. भारद्वाजानें लक्ष्मणादिकांस आलिंगन देऊन त्या दिवशीं रामाला आपल्या आश्रमांत राहण्याबद्दल फारच आग्रह केला. तेव्हां ऋषीच्या प्रेमास्तव रामानेंही एक दिवस तेथें राहण्याचा निश्चय करून अति स्नेहानें हनुमंताला जवळ बोलाविलें आणि सांगितलें कीं, तूं पुढें जाऊन शृंगवेरास गुहकभक्ताला व नंदिग्रामीं भरताला सांग कीं, आह्मीं मुनिप्रीतीस्तव आजचा दिवस येथें राहिलों आहों.

असें ऐकतांच रामचरण वंदून तेथून उडाला, तो आकाशावरून सूर्य खालीं आल्याप्रमाणें गुहकाश्रमाजवळ उतरला आणि अकस्मात् गर्जना करून ह्मणाला-भरतहृदयारविंदमिलिंद जानकीजीवन राम जवळ आला आहे, असें ऐकतांच आनंदानें उचंबळलेला भक्तगुहक आश्रमाबाहेर आला आणि त्यानें सद्गद होऊन मारुतीचे चरण धरिले व हे कपिवर्या, राम कोठें आहे? मला लौकर दाखिव असें ह्मटलें. मारुतीनें त्याला पूर्णभक्त जाणून हृदयाजवळ धरिलें. नंतर गुहकानें हनुमंताला आश्रमांत नेऊन त्याची उत्तम फळें व पुष्पें देऊन पूजा केली-तेव्हां मारुती ह्मणाला-गड्या, प्रभु रामचंद्र येत आहे, असें भरताला सांगण्यासाठीं आपण नंदिग्रामीं जाऊं चल. असें बोलून दोघेही भक्तशिरोमणि एकमेकांचा हात धरून उठले व चालूं लागले.

इकडे सर्वगुणसंपन्न व अति विरक्त भरत बोटानें दिवस मोजित

होता, तो अत्यंत अधीर होऊन ह्मणाला—चौदा वर्षे व चौदा दिवस पूर्ण झाले. आतां कांहीं राम येऊन मला भेटत नाहीं. तो विवेकरत्नाकर भरत आतां राम येण्याला सीमा नाहीं, असें ह्मणत असतां अग्निकुंड सिद्ध करून प्राण देण्यास उद्युक्त झाला आणि आतां हा देह सोडून राम अरण्यांत जेथें असेल, तेथें त्याला शोधीत जाईन; इतकें ह्मणून अग्निकुंडासन्निध उभा राहिला आणि अंतरीं श्रीरामध्यान आठवून आतां उडी टाकणार, तों मारुती जवळ आला आणि दशमुखांतक जगदात्मा सुरांचा कैवारी राम येत आहे, असें गर्जना करून ह्मणाला. तें ऐकतांच भरतानें नेत्र उघडले, तों मारुतीनें त्याच्यापुढें साष्टांग नमस्कार घातला. त्याला पाहतांच भरताला अत्यानंद झाला व त्यानें त्याला उचलून हृदयाजवळ धरिलें आणि मारुती राम कोठें आहे? दाखीव, असें ह्मटलें. नंतर हनुमंताला आपल्या जवळ बसवून सर्व वर्तमान विचारलें, तेव्हां तो ह्मणाला—कृपासिंधु राम वारंवार तुमची आठवण करून मी माझ्या भरताला केव्हां पाहीन, असें अतिशय उत्कंठेनें ह्मणत असतो. खरोखर या जगांत तुमचें बंधुत्व धन्य आहे. शक्रपदातुल्य राज्य टाकून तुह्मी विरक्त आहां. भरत ह्मणाला—मारुती, राज्याशा धरून मी कुलमर्यादा सोडावी आणि त्या पूर्णब्रह्मसनातनाला विन्मुख व्हावें, असें कधींही न होवो. इतकें बोलून भरतानें शत्रुघ्नास बोलावून सांगितलें कीं, त्वां अयोध्येस जाऊन हें वर्तमान कौसल्यादि मातांस व गुरुजींस कथन करावें आणि उदयीक अरुणोदय होतांच सर्व सेना आणि प्रजा घेऊन प्रभुला समारंभानें आणावयासाठीं सामोरें यावें.

याप्रमाणें भरताची आज्ञा होतांच शत्रुघ्न अत्यानंदानें धांवत

अयोध्येस गेला आणि माता, गुरु व सुमंतादि प्रधानांस उदयीक राम येणार, असें सांगूं लागला. त्या वेळेस सर्व अयोध्यावासी जनांचा प्रमोद आकाशांतही राहीना. सुमंतप्रधानानें लगबगीनें सर्व तयारी केली. राम आला म्हणून सर्वत्र दुंदुभि वाजूं लागल्या. सर्व राजभेरी दणाणूं लागल्या. शत्रुघ्नानें सर्व राजसदनांवर कळस चढविले. सर्व नगरवासी जन रामाला आणावयास जाण्यासाठीं शृंगार करून आळीआळीनें धांवूं लागले. सोळापद्में दळभार सिद्ध झाला. चौदाहजार हत्तींवरील नौबती दणाणूं लागल्या. शत्रुघ्न आणि सुमंत यांनीं कौसल्येच्या मंदिरांत जाऊन "माते सीतासौमित्रांसह महाविजय संपादन करून राम आला" असें सांगितलें. तेव्हां कौसल्या व सुमित्रा आनंदेंकरून उचंबळल्या आणि नेत्रांत प्रेमाश्रु आणून सुखासनारूढ होतसात्या रामाला भेटावयास जाण्यासाठीं सिद्ध झाल्या. शत्रुघ्नानें वसिष्ठाश्रमांत जाऊनही तसेंच कळविलें, तेव्हां आनंदानें तो ब्रह्मपुत्रही निघाला. विद्युत्प्राय ध्वज फडकूं लागले. मकरबिरुदें पुढें चालूं लागतांच सुस्वर वाद्यें वाजूं लागलीं आणि सेनासमुदायामागून अठरा वर्णांची प्रजा रामदर्शनासाठीं निघाली. कैकयी, सुमित्रा आणि कौसल्याही सुखासनारूढ निघाल्या. वसिष्ठ, शत्रुघ्न आणि सुमंतादि प्रधान दिव्यरथांत बसून रामाला पाहण्यासाठीं अत्युत्सुकतेसह निघाले.

इकडे सूर्योदय होतांच भरत व मारुती यांनीं जागृत होऊन नित्यकर्मे सारिलीं आणि एकमेकांचा हात धरून ते दोघे नंदिग्रामाबाहेर आले व चालतां चालतां भरत बोलूं लागला—हनुमंता, आजचा हा दिवस धन्य आहे. वाट पाहून पाहून शिणलेले हे माझे नेत्रही आज

रामाला पाहून धन्य होणार आहेत. याप्रमाणें भरत भाषण करीत आहे तों मारुती ह्मणाला–भरतस्वामी, आकाशाकडे पहा बरें! असें ऐकतांच भरत वर पाहूं आगला, तों त्याला तें अद्भुतच दिसलें. तो मारुतीला ह्मणाला–मित्रा, हें काय बरें येत आहे? सुस्वर वाद्यध्वनि ऐकूं येत आहेत, असें विचारूं लागला. तेव्हां त्यानें सांगितलें–हें पुष्पक विमान होय. यांतच बसून सीतारमण राम सेनेसह येत आहे, असें ऐकतांच भरतानें लोटांगण घातलें आणि पुनः उर्ध्ववदन करून पाहूं लागला; इतक्यांत राघवेच्छेनें तें पुष्पकविमान भूमीवर येऊन स्थिर झालें. सीतेसह रामानें विमानाखालीं उतरून अयोध्येला साष्टांग नमस्कार घातला. कारण जन्मभूमी, जान्हवी, जननी, सद्गुरुस्थळ, पवित्रक्षेत्र, हरिहर प्रतिमा आणि संत यांस पाहतांच नमस्कार करावा असें आहे.

सत्यव्रती श्रीरामचंद्र अयोध्येला नमस्कार करीत आहे, तों हनुमंतासह भरत जवळ आला. त्याचें शरीर कृश झालेलें होतें. सर्वांगाला विभूति चर्चन केलेली होती व तो लोटांगण घालीतच येत होता. त्याला पाहतांच राम अगदीं कळवळला आणि तान्ह्या वत्साला भेटण्यासाठीं धेनु जशी त्वरेनें जाते, तशा त्वरेनें जाऊन भरताला आलिंगन दिलें. त्या वेळेस फार दिवस अंतरलेला प्रियपिता भेटल्याप्रमाणें भरताला सुख वाटलें. दोघांचाही समसंतोष आणि सारखी प्रीति असल्यामुळें त्यांना एकमेकांस सोडावें असें वाटेना. बंधु, साधु, विरक्त आणि भक्त अशा भरताला पाहतांच आपापल्या बंधूचा प्राण घेववून राज्य मिळविणाऱ्या बिभीषणास व सुग्रीवास फारच आश्चर्य वाटलें. असो. भरतानें सीतेला वंदन केलें. लक्ष्मण व भरत यांनीं परस्परांस प्रेमालिंगनें दिलीं. सुग्रीव आणि बिभीषण यांनींही

भरताला नमून आलिंगनें दिलीं. रामासह सुग्रीव बिभीषणादिकांची गुहकभक्ताचीही भरताप्रमाणेंच भेट झाल्यावर नळ, नीळ, जांबुवंतादिकांच्या व भरत गुहकांच्या भेटी झाल्या. नंतर मारुती, भरत आणि गुहक यांसह राम पुनः पुष्पकांत बसला, तों वानरांसह नंदिग्रामासमीप त्यांतून खालीं उतरला आणि त्या पुष्पकाला त्या धनपति कुबेराकडे जाण्याची आज्ञा देतांच तें निघून गेलें. नंतर वानर, रीस आणि असुरदळासह राम नंदिग्रामासमीप अरण्यांत अत्यानंदानें राहिला.

इकडे अयोध्येंतून आनंदगजरानें रामदर्शनासाठीं निघालेला ळभार जवळ येतांच भरतानें रामाला सांगितलें कीं, प्रभो, गुरु माता यांसह शत्रुघ्न व सुमंत अठरा वर्णांच्या प्रजेला घेऊन आपल्या दर्शनासाठीं येत आहेत. इतक्यांत रामसैन्य जवळ पाहतांच शत्रुघ्न सुमंत रथाखालीं उतरले आणि रामास पाहतांच लोटांगणें घालीत पुढे आले. रामानें दोघांसही उठवून हृदयाजवळ धरिलें. नंतर लक्ष्मणानेंही परमप्रीतीनें सुमंत व शत्रुघ्न यांची भेट घेतली, सर्व जुत्पति बिभीषणासह त्या उभयतांस भेटले. अक्षय सौभाग्यसरिता सीता पाहतांच सुमंतानें व शत्रुघ्नानें वंदिली. दोघांच्याही नेत्रांतून प्रेमाश्रु वाहूं लागले. इतक्यांत सुमंतानें रामाला गुरु जवळ आले, असें सांगतांच जनकजामातानें धांवून जाऊन सप्रेम गुरुचरण वंदिले आणि वसिष्ठानें त्याला उचलून पुत्राचेपरी प्रेमालिंगन दिलें व सांगितलें—हे जगद्वंद्या रामचंद्रा, हे संसारमायाभ्रममोचना, त्वां केवळ भूभार हरण-करण्यासाठीं अवतार घेतलास आणि रावणादि निशाचरांचा वध करून विजयश्रीसह परत आलास. तुझी लीला मी किती वर्णन करा-

वी ? राम ह्मणाला--महाराज गुरुवर्य,हा सर्व आपल्या चरणकृपेचा महिमा आहे. इतक्यांत लक्ष्मण येऊन वसिष्ठचरणीं लीन झाला, त्याला गुरूनें हृदयाजवळ धरिलें, तों सीतेनेंही वसिष्ठास नमस्कार केला. तिला आशिर्वाद देत असतां वसिष्ठ ह्मणाले--हे सति, त्वांच . या रामचंद्राची कीर्ति वाढविलीस . असो. सुग्रीव, बिभीषणादि वसिष्ठांस वंदन करीत आहेत, तों सुखासनारूढ माता जवळ आल्या, असें ऐकतांच रामलक्ष्मणांनीं धांवत जाऊन त्यांचे चरण धरिले. सुमित्रा व कौसल्या यांनीं नेत्रोदकानें रामलक्ष्मणांस न्हाणिलें व त्यांनींही त्याचप्रमाणें त्या मातांचे चरण प्रक्षाळिले. दोन्ही मातांनीं दोघांस उचलून हृदयाजवळ धरिलें आणि चौदावर्षेंपर्यंत अप्राप्त सुखाचा लाभ करून घेतला. नंतर दोघी ह्मणाल्या--आमचे दोन्ही चिंतामणि कैकयीवचनगोफणीनें दूर उडवून दिले होते, ते पूर्वभाग्येंकरून आज आह्मांस मिळाले. चौदा वर्षें अयोध्या प्रेतवत् होऊन राहिली होती. तिच्यांत आज प्राणरूपी राम येणार ह्मणून प्रफुल्लित झाली आहे.

नंतर रामलक्ष्मणांनीं कैकयीला नमस्कार केला, तेव्हां ती ह्मणाली--बाळा रामचंद्रा, आतां तूं आनंदानें अयोध्येचें राज्य कर. माझ्या मस्तकीं अपेश आलें होतें तें आज दूर झालें. इतकें झाल्यावर सीतेनें येऊन कौसल्या व सुमित्रा यांस प्रेमादरानें नमस्कार केला. तेव्हां माते, चौदा वर्षें फार श्रमलीस; असें ह्मणून सुमित्रेनें तिला प्रेमानें पोटाशीं धरिलें व आपल्या गळ्यांतील रत्नमाला तिच्या गळ्यांत घातली. कौसल्येनेंही जानकीला हृदयाजवळ धरून तिचें मुख कुर्वाळिलें. नंतर सीतेनें कैकयीला नमस्कार करितांच ती ह्मणाली--बाई, तुझें वय लहान आहे, पण कीर्ति मोठी केलीस बरें ? रावणाची संप-

त्ति भोगून आलीसना ? पण बाई श्रोत्रियाचें पात्र जर श्वाना नेलें, तर तें विटाळतें. त्या श्वानाला जरी मारलें तरी विटाळलेलें पात्र कांहीं शुद्ध होत नाहीं. राम वनांत कष्टत असतां लंकेंतील सोहळा भोगीत होतीस, तो तुला आठवत असेल नाहीं बरें ? याप्रमाणें ती कैकयी कुत्सित भाषणें करीत असतां " अपवित्राला उत्तर दिलें तर श्रेष्ठाला हीनत्व येतें " असें मनांत आणून सीता तिला उत्तर न देतां शांतीजवळ जशी क्षमा येऊन बसते, तशी कौसल्येजवळ येऊन बसली.

---

## अध्याय ३६ वा



# अध्याय ३६ वा.

राम नंदिग्रामासन्निध राहिल्यामुळें अयोध्येचे सर्व लोक, सोळापद्में दळभार, अठरापद्में वानर, छप्पन्नकोटी गोलांगुळें, बाहात्तरकोटि रीस आणि अपार राक्षससेना नंदिग्राम वेष्टून उतरली. बिभीषणाचे अठरा अक्षौहिणी वाजंत्री सुस्वर वाद्यें वाजवूं लागले, त्याहून अयोध्येंतील वाद्यें अहोरात्र वाजूं लागली. शत्रुघ्न आणि सुमंत यांनीं जरीचे अनेक तंबू ठोकले. कित्येक ध्वज व पताका उभविल्या. सुग्रीव, बिभीषण आणि थोरथोर राजे आले होते, त्यांस उतरण्यासाठीं सुंदर शिबिरगृहें दिलीं. कुलाचलांत जसा मेरुपर्वत थोर, तसें मुख्य श्रीरामाचें शिबिर, त्यांत माता, बंधु आणि गुरूसह श्रीराम राहिला. शिबिराच्या अंतर्भागांत सीता, उर्मिला, मांडवी आणि श्रुतकीर्ति ह्या चौघी जावा आणि बहिणी आनंदानें राहिल्या. राम आला असें ऐकतांच दळासह विदेही जनकराजा धांवून आला. छप्पन्नदेशींचे राजे आणि अठ्यांयशीसहस्र ऋषीश्वर यांच्या झुंडीच्या झुंडी रामदर्शनासाठीं धांवत येऊं लागल्या. नानाप्रकारचीं साधनें करणारे योगी, यागी, जपी, तपी, सर्व आपापलीं आसनें सोडून धांवत येऊं लागले. तितक्यांसहीं रामानें क्षेमालिंगनें देऊन राहण्यासाठीं योग्य स्थलें दाखविलीं.

देही असून विदेही नृपवर सीतेचा जनक येतांच रामानें जाऊन पितृभावानें त्यांच्या चरणांवर मस्तक ठेविलें; तों त्यानें त्या परात्पर-प्रभूला उचलून हृदयाजवळ धरिलें. नंतर लक्षानुलक्ष हांडे चुलीवर ठेवून उष्णोदक तयार करविलें आणि रामानें वसिष्ठादि सर्व मुनिवर, नृपवर, असुर आणि वानर यांच्या अंगाला सुगंध तेलें मर्दन करवून

सर्वांकडून मंगलस्नानें करविलीं आणि त्या जनकजावरानें सर्वां वस्त्रालंकार पाठविले. बिभीषण सुग्रीवादिकांनीं मंगलस्नानें करितां रामानें स्वतः त्यांस वस्त्रें व भूषणें देऊन गौरविलें. वसिष्ठाचें न्हा आटपतांच स्वतः राम आपल्या हातांत पादुका घेऊन आला व त्य हस्तानें गुरूपुढें ठेविल्या. त्या पायांत घालून आसनावर येऊन बसतां रामानें स्वतः वसिष्ठांस वस्त्रें दिलीं व अलंकार त्यांच्या अंगावर घातले तिन्ही भगिनींसहवर्तमान अंतःशिबिरांत सीतेनें मंगलस्नान के आणि चौघीही वस्त्रालंकारांनीं मंडित झाल्या. सकल अयोध्यावास नारी व नर यांस मंगलस्नानपूर्वक वस्त्रालंकारांनीं गौरविल्याव बंधूंसह राम मंगलस्नानास बसला. सेवकांनीं सुगंध तेलें लावून राम लक्ष्मण व भरत यांच्या मस्तकावरील जटा उकलल्या. चौदा वर्षे पर्यंत भरतानें रामासाठीं व रामानें भरतासाठीं वैराग्य धारण के होतें, त्याचें आज दोघांनींही विसर्जन केलें. चौघांचींही मंगलस्ना होतांच सुमंत त्यांच्यासाठीं अमूल्य वस्त्रालंकार घेऊन आला. ज लावण्यामृतसागर राम तो वस्त्रालंकारांनीं मंडित होतांच भरता स्वतः ज्या त्यानें चौदावर्षें मस्तकीं धारण केल्या होत्या त्या मणि मय पादुका आणून रामापुढें ठेविल्या. नंतर रामाज्ञेनें सुमंतानेंही मंगलस्नान केलें. नंतर सर्वांचीं संध्यावंदनें होत आहेत; तों भोजनाची सिद्धता असल्याची वर्दी आली. सर्व ऋषि आणि राजे यांच्यापुढें क नकपात्रें मांडून त्यांच्या निरनिराळ्या पंक्ति बसविल्या. बिभीषण, सुग्रीव, हनुमंत, नळ, नीळ, जांबुवंत, अंगद इत्यादि मुख्य मुख्य आप ल्या पंक्तीला घेऊन बंधूंसह भोजनास बसला. रजताचलाच्या भागांप्र माणें मणिमय कनकताटांतून भाताच्या मुदा ठोकल्या; पंचभक्ष, सा

शाखा, दधि, मधु, पय, घृत, शर्करा इत्यादि कोणत्याही पदार्थांची कोणालाही न्यूनता नव्हती. सर्वांचीं भोजनें झाल्यावर हस्तप्रक्षालनानंतर सर्वांस त्रयोदशगुणी तांबूल स्वतः शत्रुघ्नानें दिले आणि सर्वांसहित कोटिमन्मथतात रामचंद्र सभा करून आनंदानें बसला.

नंतर वसिष्ठांनीं अयोध्याप्रवेश करण्यासाठीं सुमुहूर्त काढिला आणि पुष्यार्कयोगावर राम अयोध्याप्रवेश करण्यासाठीं उठला. त्या वेळेस जो मंगलवाद्यांचा गजर होऊं लागला; त्यामुळें सर्व आकाश नादित होऊन गेलें. वाद्यगजरानें पृथ्वी हालूं लागली. सीतेसह राम दिव्यरथांत बसतांच लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न त्यांवर चामरें उडवूं लागले. सहस्त्रावधि भाट, बंदीजन, रघुकुलासह रामाचें यश वर्णन करीत निघाले. सहस्त्रावधि वेत्रधार पुढें धांवूं लागले. कोट्यावधि स्वर्णदंडाचे प्रतिहार ललकारत निघाले, त्यांच्यामागून बिभीषण, सुग्रीव आदिकरून सर्व रथांत बसून चालूं लागले. जनकाचा व सर्व रामभक्तांचे रथ अगदीं रामाच्या रथासन्निध राहून चालले असतां छप्पन्न देशच्या राजांचे रथ त्यांना वेष्टून चालूं लागले. सप्तपुऱ्यांत श्रेष्ठ जी अयोध्यापुरी, ती शत्रुघ्नानें आधींच शृंगारून ठेविली होती, अयोध्येच्या आसमंताद्भागीं जीं उपवनें होतीं, तींही, अति रमणीय दिसूं लागलीं. रावे, साळुंख्या, मयूर, चातक, लावे इत्यादि सर्व पक्षि रामनामेंकरून गर्जना करूं लागले. अयोध्येच्यासभोंवतीं जे दुर्ग होते, ते सूर्याप्रमाणें झळकूं लागले. ऐरावतावर बसून अमरनाथ सहज जाईल अशीं अयोध्यानगराचीं भव्य महाद्वारें सर्व उघडलीं. जिकडे तिकडे चंदनाचे सडे व मौक्तिकांच्या रांगोळ्या घातल्या होत्या. अयोध्येंतील घरोघरीं अष्टमहासिद्धि राबूं लागल्या. राम अयोध्येच्या

महाद्वाराजवळ येतांच सर्वांनीं एकच जयजयकार केला. अयोध्येची दिव्यरचना पाहून बिभीषण, सुग्रीव आणि सर्व वानर चकित झाले.

रामानें अयोध्येच्या पूर्वद्वारांतून नगरांत प्रवेश करतेवेळीं महाद्वारावर गणपती होता, त्याचें पूजन केलें आणि मग सर्व नृपांसह नगरींत प्रवेश केला. त्या वेळेस नृपांचे किरीट एकमेकांस घांसूं लागले. लक्षावधि ललना रत्नदीप घेऊन रामास आपापल्या माडीवरून ओंवाळूं लागल्या. तो आनंद पाहणारे विमानचारी देव सुमनवर्षाव करूं लागले. राम सुमंतास भ्रूसंकेत करून ओंवाळणाऱ्या स्त्रियांचा वस्त्रालंकारांनीं गौरव करवूं लागला. रामानें मंडपांत प्रवेश करितांच नगरलोक धांवून आंत भरूं लागले आणि गर्दी मोडण्यासाठीं वेत्रधारी त्यांस मारूं लागले. तो प्रकार पाहतांच रामानें वेत्रधारांचें निवारण करून शांतपणानें सर्वांस मंडपांत येऊं दिलें. सर्व नागरिकांनीं जवळ येऊन रामवदन न्याहळून पाहतांच त्यांस अत्यानंद झाला. नंतर रामानें अंतर्गृहांत प्रवेश करून देवांवर पुष्पांजली वाहिली.

सर्व राजांच्या सेना अयोध्यानगराला वेष्टून उतरल्या. अठरापद्में वानर, रीस आणि लंकेंतील असुर यांचा, शत्रुघ्न व सुमंत आदरसत्कार करूं लागले. बिभीषण, सुग्रीवादि सर्व मुख्यमुख्य राजे रामासंनिध राहूं लागले. नंतर वसिष्ठांनीं रामाला राज्याभिषेक करण्याची सर्व तयारी केली. श्वेत चामरें, श्वेत छत्र, श्वेत गज आणि निवळ पांढऱ्या रंगाचे अश्व आणविले. चतुः समुद्रांचें उदक, पंच पल्लव आणि सप्तद्वीपांतील सप्त मृत्तिका आणविल्या. दैदीप्यमान भव्य सभामंडपांत प्रचंड सिंहासन मांडून सर्व विद्वज्जन आणि सर्व नृपवर जमल्यानंतर वसिष्ठ रामचंद्रास ह्मणाले—हे जलजवर्णा चारुगात्रा जनन्मनमोहना राम-

चंद्रा, आतां त्वां राज्यपदारूढ होऊन या पृथ्वीचें यथान्याय पालन करण्याचा अधिकार अंगिकारावा, अशी सर्वत्रांची इच्छा जाणून मी तुला सांगत आहें. भरत ह्मणाला—चौदा वर्षे जें तप केलेंस त्याची फलप्राप्ति हीच आहे. आपणांस सिंहासनावर पाहिल्या शिवाय आमचे नेत्र तृप्त होत नाहींत, यासाठीं हे दयासिंधो राघवा, सिंहासनावर बैस आणि भांडारगृह फोडून याचकांस दानोदकानें तृप्त कर. याप्रमाणें भरताचें भाषण होत आहे, तों वसिष्ठानीं रामाचा हात धरून त्याला सीतेसह सिंहासनीं बसविलें आणि सर्व ऋषींसह वेदमंत्रांनीं अभिषेक करण्यास आरंभ केला. नंतर घनःश्याम रामास तप्तकांचनवर्ण पीतांबर परिधान करण्यास देऊन त्याच्या अंगावर कुंडलकौस्तुभादि अलंकार, दिव्यमुकुट, वसिष्ठ व लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न यांनीं चढविले. तिकडे जानकीसही उर्मिळा, मांडवी, श्रुतकीर्ती इत्यादि स्त्रियांनीं अंतःपुरांत नेऊन दिव्यवस्त्रालंकारांनीं मंडित केलें आणि बाहेर आणलें.

नंतर पुनः सीतेसह राम नियमित सुमुहूर्त साधून सिंहासनावर बसतांच एकदम सर्व मंगलवाद्यांचा गजर होऊं लागला. जिकडे तिकडे जयजयकार होऊं लागला. देव सुमनसंभार वर्षूं लागले. सर्व राजांनीं रामसीतेस कुंकुमतिलक व अक्षता लावून करभार पुढें ठेविला. तिकडे भरत भांडारगृह उघडून याचकांस आतृप्त धनें वाटूं लागला. आकाशांत गंधर्व, किन्नर आणि देवांगना नृत्य गायन करूं लागल्या आणि अयोध्येंतील प्रत्येक स्थलीं नृत्यगायनांचा रंग उडूं लागला. रामानें अपार गोदानें व भूदानें दिलीं. लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न आणि सुमंत यांस रामानें युवराज्य देऊन आपले मंत्री केले. हा सोहळा सोळा दिवसपर्यंत चालला होता; तोंपर्यंत सर्व

राजे, वानर, रीस आणि राक्षस यांस मेजवान्या चालल्या होत्या. अयोध्येंतील सर्व जनांस आनंद व मानसिक उत्साहच उत्पन्न झाला होता; मग बाह्यानंदाला व उत्साहाला काय अवधि आहे? सुग्रीव आणि बिभीषण नित्य रामाचे पंक्तीस भोजन करून आनंद विलास भोगीत असत. राम सिंहासनावर बसला ह्मणजे लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न प्रीतीनें त्यावर चामरें उडवीत असत.

राम आनंदानें सिंहासनावर बसला ह्मणजे त्याच्या सर्व माता, नागरिक स्त्रिया गवाक्षद्वारानें अवलोकन करीत असत. एके दिवशीं तो सीतेसह सिंहासनावर बसला आहे व तिन्ही बंधू भक्तिरसानें त्यावर चामरें ढाळीत आहेत; असें पाहून कैकयी आपल्या मनाजवळ बोलूं लागली—या भरतासारखा अभागी या जगांत शोधूं गेल्यास कोणीही सांपडणार नाहीं. भिकार्डा चौदा वर्षेंपर्यंत अंगाला राख लावून रानांत जाऊन बसला होता आणि आतां बंधूचें दास्य करीत आहे. माझें पूर्वपाप फळास आलें ह्मणून असला कार्टा माझ्यापोटीं उत्पन्न झाला. हाय हाय! या दरिद्रीपोराचें वर्तन पाहून मला जें दुःख होतें आहे, हें मी आतां कोणाजवळ सांगावें!

या प्रमाणें कैकयी जरी एकटीच बसून आपल्या मनाजवळ बोलत होती, तरी तिचें मत्सरमंडित भाषण वसिष्ठाच्या कानावर गेलें आणि ते तिच्याजवळ येऊन निर्भर्त्सना करीत असतां ह्मणाले—हे शतमूर्खे, अजून तरी निवांत रहा. राक्षसी, त्वां रामाला अकस्मात् वनांत घालवून दशरथराजाचा ग्रास घेतलास; चौदावर्षेंपर्यंत सर्व राजकुलाचा आणि प्रजेचा रक्तशोष केलास तरी तुझी तृप्ति झाली नाहीं? तुला ज्ञान कसें नाहीं, तो राम पुराणपुरुष सच्चिदानंद परमात्मा आहे.

त्याच्या भजनीं मन लाव ह्मणजे जन्ममरणापासून मुक्त होशील. याप्रमाणें तिला बोध करून वसिष्ठ बाहेर आल्यावर सर्व पृथ्वींतील राजांच्या पाठीमागून रामानें बिभीषण व सुग्रीव यांस एक महिना सहपरिवार ठेवून घेऊन निरोप दिला आणि सर्व वानरांस भोजन करून जाण्यास सांगितलें.

रामानें वानरांस शेवटची मेजवानी दिली. त्या दिवशीं त्यांच्या बरोबर पुष्कळ द्विजसमुदायही बोलाविला होता. भोजनविधीच्या आरंभीं त्या परात्परपित्यानें सर्व वानरांस प्रेमाच्या गंधाक्षता लाविल्या आणि त्यांच्या गळ्यांत सुवासिक पुष्पांच्या माळा घातल्या. नंतर चैतन्य परिमळ द्रव्यें सर्वांगाला चर्चन करून सर्वांस धूप, दीप, लावून पंक्तीनें भोजनास बसविलें. रामसदनांतील दिव्यान्नांच्या परिमळाला वेधल्यामुळें वसंत त्या दिवशीं अयोध्येला प्रदक्षणा करूं लागला. त्या अन्नाचा सुवास स्वर्गापर्यंत देवांस आमंत्रण देण्यासाठीं गेला आणि त्यासाटीं सर्व विबुध रामपंक्तीस भोजन मिळावें ह्मणून लाळ घोटूं लागले. प्रत्येक कपीला बसण्यासाठीं सोन्याच्या फुल्यांचे पाट मांडले, त्यांपुढें सुशोभित मणिमय आडण्या ठेवून त्यांवर कनकपात्रें ओळीनें मांडली. प्रत्येक पात्राजवळ सुगंधी उदकानें भरलेल्या रत्नजडित झाऱ्या आणि रत्नदीप ठेविले. नंतर पहिल्यानें विश्वास हेंच लवण वाढिलें; इतक्यांत तोंडीं लावण्यासाठीं विरक्तीच्या चटकदार चटण्या आल्या. त्या वाढून जात आहेत तों नाना साधनांच्या शाखा आल्या; सत्कर्मांच्या कोशिंबिरी ओळीनें ठेविल्या, निश्चय शर्करा घालून नवविधा भक्तीचीं शुभ्र क्षीरपात्रें भरून ठेविलीं. नंतर निजबोधाचा सुवासिक व सुंदर भात वाढून त्यावर

अक्षय शांतीचें वरान्न ( वरण ) वाढलें. तेथेंच एके बाजूला अभेद पूर्णप्राप्तीचे मांडे, भूतकृपेचे घारगे आणि स्नेह तेलवड्या अशीं मिष्टान्नें वाढलीं. सत्वघृतांत तळून गुळवड्या केल्या होत्या व क्षमेच्या सुशोभित फेण्या होत्या, त्या सर्वांस समसमान वाढल्या. विवेकपापड वैराग्याग्नीवर भाजून वाढले. नंतर विज्ञानामृतफळें आणि सत्वाचीं केळीं वाढलीं. सर्वांभूतीं समतेची घमघमित कढी द्रोणांतून वाढली आणि मुख्य गुरुकृपेचें घृत वाढून होतांच त्या सद्भक्तांचीं पात्रें स्वानंदजलानें प्रोक्षण केलीं आणि सोहं गायत्री जपून देहबुद्धीच्या नांवावर पाणी सोडतांच निवृत्ति आपोशन घेतेवेळीं सर्व भक्तांनीं रामनामाची गर्जना केली आणि पंचप्राणाहुति घेऊन शिखेची कामग्रंथि त्यांनीं आपापल्या हातांनीं सोडून टाकली. नंतर निरभिमान जीवनानें नेत्रस्पर्श करितांच त्यांना सर्वजग राममय दिसूं लागलें आणि पद्मासनें घालून ते सर्व स्वरूपसाक्षात्कार पावलेले भक्त ग्रासामागें ग्रास घेत असतां तृप्त झाले. जे भवरोगानें पीडित झालेले होते, त्यांच्या पोटांत परमार्थाची क्षुधा नसल्यामुळें ते एकमेकांचीं तोंडें पहात खिन्न होऊन बसले होते. चंद्रोदयीं सोमकांत मात्र द्रवतो आणि इतर पाषाण कोरडेच असतात, त्याप्रमाणें रामाच्या पंक्तीचा लाभ अभक्तांस झाला नाहीं. जे दैवीसंपत्ति बाळगून सभाग्य होते, तेच रामाचे पंक्तीस बसून भोजन करीत असतां तृप्तीचे ढेंकर देऊं लागले. जेथें त्रिभुवनपतीची राणी जानकी आपल्या प्रियभक्तांस पूर्णप्रीतीनें वाढीत होती, तेथें न्यूनता कसली पडणार आहे ? सर्वांनीं स्वानुभव जलसेवन करून धर्मकर्मांचें उत्तरापोशन घेतल्यानंतर ते मिथ्या संसारसुखाला आनंदानें आंचवले आणि अमानित्व आणि अदांभिकत्व हेच विडे खाऊन पूर्ण तृप्ति पावले. रामानें सर्व सद्भक्तांस

भक्तीचीं भूषणें आणि वस्त्रें दिलीं, तो सोहळा वर्णन करण्याची शक्ति दशशतवदनाला ( शेषाला ) ही नाहीं.

रामानें बिभीषण आणि सुग्रीव यांच्या सेनेचा वस्त्रालंकारांनीं गौरव करून त्या दोघांस दोन उत्तमोत्तम सिंहासनें आणि छत्रें दिलीं व नानाप्रकारच्या वस्त्रभूषणांसह अनेक अमोलिक अमूल्यवस्तु देऊन त्यांस गौरविलें; परंतु ज्याचे अनंत उपकार झालेले व जो अहोरात्र हात जोडून पुढें उभा राहिलेला महाभक्त मारुती, त्याच्याकडे रामानें मुळीं पाहिलेंही नाहीं, तेव्हां सर्वत्रांस अत्याश्चर्य वाटलें. तरी ज्याच्या गुणांवरून हें ब्रह्मांड ओंवाळून टाकावें, त्या मारुतीला देण्यायोग्य वस्तूच रामाला दिसेना; ह्मणून शेवटपर्यंत त्यानें त्याजकडे पाहिलें नाहीं. पण शेवटीं उठून त्याला हृदयाजवळ धरिलें आणि त्याला परमप्रीतीनें सांगितलें–प्राणसख्या मारुती, मी स्वतःच तुझ्या हृदयांत आहें. तुला सोडून मी कधींहि एक क्षणभरसुद्धां राहणार नाहीं. असें ऐकतांच मारुतीनें त्याचे चरण दृढ धरिले आणि ‘ मला हेंच दे ’ असें अत्यानंदानें सांगितलें.

नंतर सीतेनें सर्वांस वस्त्रें व भूषणें दिलीं आणि आपल्या कंठांतील रत्नहार–ज्यांतील एकेकमणि पृथ्वीच्या मोलाचा होता, तो काढून परमप्रीतीनें मारुतीच्या गळ्यांत घातला; पण तो गळ्यांत पडतांच हनुमंत जो उडाला तो समोरच एका वृक्षावर जाऊन बसला आणि एकेक मणि तोडून दाढेखालीं घालून फोडून व पाहून यांत राम नाहीं, ह्मणून दूर भिर्कावून दिला. असें पाहतांच सुग्रीवादि वानर त्याला विचारूं लागले कीं, दिव्य मण्यांचा हार व्यर्थ कां फोडलास ? मारुती ह्मणाला–त्या मण्यांच्या अंतरीं राम दिसत नव्हता, ह्मणून मी ते फोडून पाहिले व टाकले. असें ऐकतांच वानर ह्मणूं लागले–तुझ्या तरी

हृदयांत राम आहे ? मारुतीनें इतके शब्द ऐकले मात्र, त्यानें आपलें हृदय नखांनीं सर्वांसमक्ष विदारण करून दाखविलें; तों त्यांतही वानरांस पट्टाभिषिक्तराम सीतासौमित्रांसह दिसला. तेव्हां आश्चर्यचकित व निरभिमान होत्साते सर्व कपि हनुमंतास पूर्ण भक्त ह्मणून वारंवार वंदूं लागले. नंतर मारुती अक्षय अयोध्येंतच रामचरणाजवळ राहिला आणि सर्व कपि रीस व निशाचर निजस्थानीं जाऊं लागतांच लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांनीं सुग्रीव आणि बिभीषण यांस आपल्या मंदिरांत नेऊन वस्त्रालंकारांनीं गौरविलें. सुमित्रा व कौसल्या यांची आज्ञा घेऊन ते जेव्हां कैकयीच्या मंदिराकडे जाऊं लागले; तेव्हां त्यांस भरत आडवा आला आणि तिकडे जाल तर खेद पावाल, असें ह्मणाला.

रामाची शेवटची आज्ञा घेतांना सुग्रीव आणि बिभीषण यांचे कंठ शोकानें भरून आले; तरी रामानें त्यांस सद्बोधासह प्रेमालिंगनें देऊन अयोध्येच्या बाहेर जात तोंपर्यंत बोळविलें. तेव्हां ते सर्व रीस, वानर आणि असुर रामाला पुनः नमस्कार करून दक्षिणपंथानें निघून गेले. सुग्रीव कपींसह किष्किंधेस राहिला. त्यानें परिवारासह बिभीषणास एक दिवस आपल्याकडे राहवून मग पुढें पाठविलें, तो लंकेंत जाऊन राज्य करूं लागला.

राम अयोध्येंत बंधूंसह राज्य करूं लागतांच प्रजेंतील जरा, रोग, भय आणि दुःख नाहींसें झालें. अकराहजार वर्षें राम निर्वेध राज्य करीत असतां वसिष्ठ तर होतेच; पण विश्वामित्र, अगस्त्यादि ऋषीश्वर वारंवार तेथें येऊन त्याच्या समागमसुखाचा लाभ करून घेत असत. राम नित्य वसिष्ठ व अगस्तीच्या मुखानें वेदान्तविचार श्रवण करून यथान्याय पृथ्वीचें पालन करीत असे.

# अध्याय ३७ वा



# अध्याय ३७ वा.

रामराज्याचीं अकरा हजार वर्षे पूर्ण भरल्यावर सीता गर्भवती झाली, तिला सहा महिने भरतांच रामानें तिचें ओटभरण केलें; तो सोहळा वर्णन करण्यास शेषाच्या सहस्र जिव्हाही भागतील. मग इतरांची कथा काय ? असो. नंतर वसंतकाळांत एके दिवशीं राम सीतेसहवर्तमान क्रीडावनांत आनंदानें तिची अंगुली धरून फिरत असतां एकांत पाहून तिला विचारूं लागला—हे सुकुमारे जनकतनये, तुला डोहाळे काय होतात ते मला सांग बरें ? तुला मनापासून कोणती वस्तु आवडते ? किंवा अन्य कांहीं इच्छा उत्पन्न होते ? सांग, तुझे सर्व हेतु मी पूर्ण करीन. असें ऐकतांच किंचित् हास्य करून सीता ह्मणाली—मला एक रघुनंदन आवडतो. त्या शिवाय दुसरें कांहीं एक नको. राम ह्मणाला—प्रिये, तूं लाजूं नको. तुला जें वाटत असेल तें सांग; मी तुझी इच्छा पूर्ण करीन. याप्रमाणें आग्रह पाहून सीता प्रेमानें ह्मणाली—प्राणनाथ, खरेंच जर विचाराल, तर पांच रात्रीं गंगातीरीं पवित्र ऋषिपत्न्यांत जाऊन रहावें असें मला वाटतें. तृणासन घालून भूमीवर शयन करावें आणि कंदमुळें भक्षण करून शुचिर्भूत असावें. याप्रमाणें सीतेचीं भाषणें ऐकतांच राम मनांत आश्चर्य पावला आणि ह्मणाला—हिनें पूर्वी दारुण वनवास भोगला आहे, तरी इच्छा पूर्ण झाली नाहीं कीं ? असो. पुढील भविष्यार्थ जाणून रामानें तिला सांगितलें—प्रिये, मी तुझी इच्छा पूर्ण करीन बरें ! या गोष्टीला कांहीं दिवस लोटल्यावर राम आपल्या नगरांतील सर्व गुप्त बातमी आणणारे हेर जमवून त्यांस विचारूं लागला—हेरहो, तुह्मांला अभय आहे.

मी विचारतों तें सत्य सांगा. तुह्मीं रात्रंदिवस नगरांत फिरत असतां तर लोक आह्मांविषयीं काय ह्मणतात? आमची निंदा करितात किंवा स्तुति करितात? आमच्या यशाची स्थापना करितात किंवा अपेशाची? जें काय असेल तें सत्य सांगा.

याप्रमाणें राघवाची अत्युत्कंठा पाहून कित्येक हेर नम्रपणानें सांगूं लागले—प्रभो, सर्व नगरवासी तुझे भक्त असून अहोरात्र तुझ्या यशवर्णनीं निमग्न झालेले आहेत; परंतु एक अपवित्र व दुर्जन रजक मद्यप्राशन करून नित्य स्त्रीला ताडण करीत असतो. एकेसमयीं ती स्त्री त्या भ्रतारावर रुसून पितृसदनीं गेली आणि कांहीं दिवस तेथें राहिली. नंतर त्या रजकाच्या सासऱ्यानें ती कन्या हातीं धरून जेव्हां आपल्या जांवयाकडे आणली, तेव्हां तो पापात्मा क्रोधायमान होऊन त्याला ह्मणाला—आतां या स्त्रीला मी आपल्या घराची पायरी चढूं देणार नाहीं. मी राम नव्हे. रावणानें त्याची स्त्री चोरून नेऊन सहा महिनेपर्यंत आपल्या घरीं ठेविली होती, ती त्यानें सोडवून आणून घरांत घेतली. मामा, आह्मीं जगाचे डाग काढणार परीट, आमच्या यातींत असें सहन व्हावयाचें नाहीं. मी त्या रामासारखा स्त्रीलंपट नव्हे. त्यानें अनुचित केलें; पण तो थोर, ह्मणून त्याला कोणी बोलत नाहींत; आह्मांला सगळे लोक छी—थू, करतील. याप्रमाणें त्या हेरांच्या मुखानें वर्तमान ऐकतांच राम मनांतल्यामनांत अत्यंत कोपला आणि हेरांस निरोप देऊन त्यानें लक्ष्मणास बोलावून आणलें व सांगितलें—

सौमित्रा, रजकानें माझी निंदा केली; ह्मणून जानकीचा त्याग करणें भाग आहे. सहपरिवार रावणाचा वध करून इंद्र, ब्रह्मदेव आदि

करून सर्व देवतांसमक्ष सुवेळेवर सीतेला आणलें, त्या वेळेस सर्वांची शंका दूर होण्यास्तव जानकीनें अग्निप्रवेश करून दिव्य घेतलें, तरीही रजक दोष देत आहे; तो मला सोसत नाहीं. ज्याप्रमाणें तनु प्राणाचा त्याग करते, त्याप्रमाणें मी सीतेचा त्याग करीन. असें ऐकतांच लक्ष्मण ह्मणाला—प्रभो, क्षमा असावी. किती हा दुर्विचार ! महाराज, पाखंडी, दुष्ट आणि दुर्मति वेदश्रुतींची निंदा करितात; पण पंडितांनीं त्यांचा काय त्याग केला ? आपल्याला ही बुद्धि कशी उत्पन्न झाली ? मी त्या दुष्ट रजकाची जिव्हा छेदन करितों. असें ऐकतांच राम ह्मणाला—छे छे, असें करूं नको. रजकाचा विनाकारण वध करशील तर लोक अधिक निंदा करूं लागतील. यांच्या अंगीं दोष होता, ह्मणून त्यांनीं रजकाला दंड केला, याप्रमाणें प्रसिद्ध जनापवाद येईल. तर बंधो सौमित्रा, मजपाशीं एक शब्दही न बोलतां तूं सीतेला अरण्यांत नेऊन तिचा त्याग करून परत ये; नाहीं तर मी आपल्या प्राणाचा त्याग करीन.

याप्रमाणें रामाचें निश्चयात्मक भाषण ऐकतांच लक्ष्मण निरुत्तर झाला आणि ब्राम्हमुहूर्तीं ( पहांटेस ) जानकीच्या मंदिरांत आला आणि मनांत अत्यंत विव्हळ होऊन त्यानें तिचे चरण वंदन केले आणि तिला विनयानें सांगितलें—तुला तापसारण्य दाखविण्यास नेण्याची मला प्रभूनें आज्ञा केली आहे. असें ऐकतांच त्या त्रिभुवनपतीच्या राणीस अत्यंत आनंद झाला व ती ह्मणाली—'तुझे डोहळे पुरवीन' असें त्यांनीं वचन दिलें होतें; तें पूर्ण केलं. बरें. भावोजी, आपण ऋषिपत्न्यांत पंचरात्रि क्रमण करून परत येऊं. हें ऐकून लक्ष्मण तिला उत्तर न देतां मनांत ह्मणाला—माते, आतां कशाचें तुझें परत येणें ! असो

सीतेनें हर्षयुक्त होऊन ऋषिपत्न्यांची पूजा करण्याकरितां व सौभाग्यवायनें देण्यासाठीं अपरिमित सौभाग्यद्रव्यें घेतलीं व अनेक अमूल्य वस्त्रालंकार घेऊन ते बांधून रथांत टाकले व स्वतः येऊन रथांत बसली. तेव्हां लक्ष्मण तो रथ आच्छादन करून स्वतः त्याच्या धुरेस बसला आणि कोणाएकासही न कळवितां रथ जान्हवीतीरापर्यंत घेऊन गेला; तों सूर्योदय झाला आणि सीतेला अपशकून जाणवूं लागले. महा सर्प आडवे धांवताहेत, पिंगळे किलबिल किलबिल करून पतिवियोग सांगत आहेत आणि कावळे डाव्याबाजूनें जाऊन शोक दर्शवीत-आहेत. याप्रमाणें अनेक अपशकुन पाहून सीता आपल्या मनांत दचकली आणि हे अपशकून कां म्हणून विचारूं लागली; परंतु तो कांहीं एक न बोलतां नेत्रांतून अश्रुपात करीत वेगानें रथ हांकीतच चालला. तेव्हां त्यानें बोलावें, म्हणून तिनें अनेक प्रश्न केले; तरी कांहीं न बोलतां त्यानें त्या जनकदुहितेला रथासह नौकेंत घातलें व भागीरथीच्या पलीकडे जाऊन पुनः रथ हांकीत चालला. तेव्हां पुढें भयंकर व घोर अरण्य लागलें: तेव्हां जानकी भिऊन अति दीनवाणीनें लक्ष्मणाला विचारूं लागली—भावोजी, आपण अगदीं भाषण करीत नाहीं व वारंवार अश्रुपात होत असल्यामुळें डोळे पुशीत आहां, याचें कारण तरी काय? आपण मला घोर वनांत कोणीकडे आणलें हें? येथें ऋषींचे आश्रम दिसत नाहींत आणि वेदघोषही कोठें ऐकूं येत नाहीं, याचें कारण काय? याप्रमाणें ती विचारीत आहे, तों लक्ष्मणानें तो रथ गहनवनांत आणला आणि तृणशय्या तयार करून जानकीला रथाखालीं उतरून तो विनंति करूं लागला. बिचारी सीता आधींच विपरीत लक्षणें पाहून घाबरली होती, ती खालीं उतरून त्या लक्ष्मण-

करनिर्मित तृणासनावर बसतांच तो सुमित्रापुत्र तिच्यापुढें हात जोडून अधोवदन होत्साता अश्रुपात करीत उभा राहिला आणि अति विव्हळ होऊन सद्गद कंठानें जानकीस ह्मणाला–हे जगन्माते, रामानें तुला वनांत सोडून दिलें आहे. त्याचा आज्ञाधारक मी; निरुपायास्तव येथपर्यंत आणून पोंचविलें आहे. तुला रजकानें निंदिलें ह्मणून रामानें माझ्या हातून तुझा त्याग करविला. आतां रामचरण स्मरण करून या ठिकाणीं आनंदानें वास्तव्य कर.

याप्रमाणें लक्ष्मणाच्या मुखांतील वाक्यें बाहेर पडतांच सुकुमार कमळणीवर वज्रपात व्हावा, तशी सीतेची अवस्था झाली आणि तिला एकाएकीं मूर्च्छना आल्यामुळें ती भूमीवर निचेष्टित पडली. तिची ती दीनवाणी स्थिति पाहून लक्ष्मण रुदन करूं लागला; तरी कठोर मन करून त्यानें मोठ्या कष्टानें तिला वारंवार नमस्कार करून रथाच्या पायरीवर पाय ठेवला आणि वनदेवता, वृक्ष, पाषाण, पशु, पक्षी आणि पंचतत्वें यांनीं सीतेचें संरक्षण करावें; ह्मणून त्यानें त्यांची प्रार्थना केली. जरी त्याचें मन मायेनें अति कळवळलें होतें; तरी रामाज्ञा आठवून तो रथांत बसला आणि वेगानें रथ हांकीत अयोध्येस आला.

इकडे सीता मूर्च्छना सांवरून सावध झाली आणि पाहूं लागली तों लक्ष्मण आपला त्याग करून गेला. ती भ्रमिष्टाप्रमाणें उठली आणि हस्त उभारून " लक्ष्मणा , उभा रहा ! माझा त्याग करून जाऊं नको ! धांव धांव ! तुला जर जाणेंच असेल तर माझा वध करून जा. " असें उच्च व दीर्घ स्वरानें ह्मणूं लागली. तिनें वारंवार " प्राणनाथ ! अहो अयोध्याधीशप्रभुरामचंद्र ! धांवाहो धांवा ! या आपण त्याग करविलेल्या अबलेचें रक्षण करा ! आपणच माझा त्याग

केल्यावर मी कोणाच्या आश्रयानें रहावें ?" असें ह्मणावें आणि इकडे तिकडे धांवावें. तिचा तो हृदयद्रावक विलाप ऐकून वनांतील श्वापदें रुदन करूं लागलीं; वृक्षलतांस गहिंवर आला; पक्षी अश्रुपात करूं लागले; गज, व्याघ्रादिकांस मूर्च्छना आल्या; हंस मुक्ताहार सोडून सीतेच्या दुःखालापानें दुःश्चित्त होत्साते आंसवें गाळूं लागले आणि कन्येला विनाकारण गांजलें ह्मणून पृथ्वी थरथर कांपूं लागली. अपार शोक करीत असतां ती कोमल जनकतनया वारंवार देहभान सोडूं लागली, तेव्हां पक्षी आपल्या पक्षांनीं तिच्यावर छाया करूं लागले. कोणी आपल्या चंचुपुटानें उदक आणून सीतेवर शिंपडूं लागले. हेराम ! हेराम ! ह्मणून वारंवार ती सावध होऊन विलाप करीत असल्यामुळें पशुपक्षी आपला वैरभाव विसरून दुःख करीत त्या वनांत संचार करूं लागले आणि वापी, गुल्म, लताही दुःखानें कंपित झाल्या. जानकी शोक करीत असतां वारंवार विचार करून ह्मणूं लागली— अहो दीनदयाळ राजीवनयन रामचंद्र ! मला एकटीलाच अरण्यांत कांहो पाठविलेंत ? आपण कृपासागर असतां मजकडून काय अन्याय झाला हें मुळींच मला न कळवितां घोर वनांत आणून कां सोडलेंत ? जन्मापासून मी कोणतेंही दोषाचरण केलें नाहीं; फार काय पण मला स्वप्नांतही दुर्बुद्धी उत्पन्न झाली नाहीं. तर काय हा पूर्व जन्मार्जित भोग पुढें आला ! प्राणनाथ या दीन दासीचा अव्हेर करिते समयीं हिला कोणाचाही आश्रय नाहीं; असें आपल्या मायाळू मनांत कां बरें आलें नाहीं ? हे रामा ! माझे अनंत अपराध असले तरी क्षमा करणारा माझा मायबाप, बंधु, कैवारी, प्रियपति तूं आहेस. हे करुणासिंधो, आतां या दुःखांतून माझा उद्धार कर. तुझें ध्यान माझ्या चित्तीं अखंड वसो.

याप्रमाणें ती जनकतनया विलाप करीत अरण्यांतून फिरूं लागल्यानंतर लक्ष्मण म्लानवदनानें अयोध्येंत आला आणि राम एकांतस्थानीं होता; तेथें जाऊन नेत्रांतून दुःखाश्रु टाकीत रामचरणांवर मस्तक ठेवून हात जोडून पुढें उभा राहिला आणि म्हणाला—प्रभो, चित्रांतील वृक्षाच्या छायेप्रमाणें ही संसारमाया सर्व मिथ्या आहे. दृश्य तितकें नाशवंत, हें जर सत्य आहे; तर मुळींच शोक करण्याचें कारण नाहीं. याप्रमाणें लक्ष्मणाचें भाषण ऐकत असतां रामाच्या शोकमहोदधीला भरतें आलें, परंतु त्यानें अगस्तिरूप धरून त्या शोकाब्धीचें एकच आचमन करून मौन धरिलें.

इकडे वनांत जानकी शोक करीत असतां क्षणोक्षणीं मूर्च्छना येऊन पडत असे व पुनः हात टेंकून उठून चार पावलें चाले. शेवटीं आपण अत्यंत अन्यायी व दीन म्हणून प्राणत्याग करावा असें तिच्या मनांत आलें; तरी पोटांतील गर्भाचा विनाकारण नाश होईल व आपल्यावर बालहत्या पडेल; हे विचार तिच्यापुढें मूर्तिमंत उभे राहिले आणि तिनें देहत्यागाचा निषेध केला. तेव्हां कळपांतून चुकलेल्या धेनूप्रमाणें पूर्वीं जशी निषधपतीची दमयंती किंवा भिल्लिणीच्या वेषानें भवानी अरण्यांतून एकटीच हिंडत असे; तशी ती विलाप करीत सव्य अपसव्य भडकूं लागली. इतक्यांत ज्यानें जन्माच्या आधीं शतकोटि श्लोकांनीं अवतारचरित्र कथन केलें, तो महर्षि वाल्मीकिमुनि कंद, मुळें, फळें, दर्भ व समिधा, गोळा करण्यासाठीं त्याच अरण्यांत आला आणि हिंडत असतां त्यानें त्या जगन्मातेचा शोकस्वर ऐकला व दुरून तिला पाहतांच तिच्या जवळ येऊन तो दयाळू मुनि तिला विचारूं लागला—हे शुभकल्याणी, तूं कोण

आहेस ? या वनांत अशा रूपानें कां प्रगट झालीस ? मला असें वाटतें कीं, तूं अनादिपीठनिवासिनी मूळपुरुषाची स्वामिणी आहेस. माते, या वनांत मला दर्शन देण्यासाठीं आलीस ? असें ऐकतांच जनकतनया ह्मणाली–महाराज मुनिवर्य, मी विदेही मिथिलेश्वराची दुहिता आणि दशमुखांतकाची कांता आहें, कांहीं अपराध नसतां मला सौमित्रानें या वनांत आणून सोडलें. मुनिवर्य, आपण त्रिकालज्ञ आहां. मी परदेशी व अनाथ आहें, तर आपण जनकस्थानापन्न होऊन माझें पालन करावें. असें ऐकतांच वाल्मीकिमुनी ह्मणाला–हे जननी, माझें नांव वाल्मीकिमुनि, अयोध्यापति राम मला पूर्णपणें जाणतो; मी रात्रंदिवस त्या रामाच्यान अवतारचरित्राचें कीर्तन करणारा आहें. मिथिलापति विदेही जनक माझा मित्र होय, ह्मणून तूं त्याची पुत्री माझ्या कन्येप्रमाणें आहेस. तुला दोन पुत्र होतील, ते पित्याहून पराक्रमी निघतील आणि तुझ्यासाठीं पित्याचा सूड घेतील.असें बोलून त्यानें जानकीला हातीं धरलें आणि आपल्या आश्रमांत नेलें. तिला पाहतांच सर्व ऋषि त्याच्या व सीतेच्या सभोंवतीं जमले आणि वाल्मीकाला ‘ ही कोण ? ’ ह्मणून विचारूं लागले. तेव्हां तो त्या सर्वांस ह्मणाला–ही जगन्माता रघुवीराची कांता आहे. तुमच्या पूर्वसुकृतामुळें ही महापतिव्रता येथें आली, असें जाणून हिचा सत्कार करा. असें ऐकतांच सर्व ऋषिजन ह्मणूं लागले–आह्मीं अत्यंत भोळे ब्राह्मण ग्रामवासी कुटिलजनांची संगत सोडून या निर्जन अरण्यांत येऊन राहिलों आहों , पण येथेंही तुह्मी हें विघ्न आणलें, याला काय ह्मणावें इच्या सुंदरपणास्तव इजवर अनंत अपवाद आलेले आहेत आणि इच्यापायीं आपला सर्वांचा घात होईल. याप्रमाणें अनेक अप्रबुद्ध ऋषि

अनेक प्रकारें बोलत असतां कोणी कोणी ह्मणूं लागले कीं, जर ही सीता सत्य पतिव्रता आहे असें तुह्मीं ह्मणतां, तर भागीरथी येथून दूर आहे ती हिनें प्रार्थून इकडे आणावी. हें जर हिच्याकडून न होईल तर हिला सदोष मानावें आणि तपोवनांतून घालवून द्यावें. असें ऐकतांच ती जानकी भागीरथीचें स्तवन करूं लागली–

हे सगरकुलतारिणी, हरिचरणोद्भवे, गंगे, हे जन्हुतनये, तूं ब्रह्मकटाह फोडून अद्भुत रूपानें या भूमीवरील जीवांचा उद्धार करण्यासाठीं प्रगट झालीस. ब्रह्मा, विष्णु, महेश, इंद्रादि निर्जर आणि सनत्कुमारादि ऋषीश्वर निरंतर तुझें स्तवन करीत असतात. तुझ्या अंणुमात्र नीरस्पर्शानें अनंत पातकांच्या राशि भस्म होतात. तर माते, माझें संकट जाणून या ऋषीश्वरांच्या इच्छेस्तव तूं येथपर्यंत धांवत येऊन माझें रक्षण कर.

याप्रमाणें ती पतिव्रता जनकतनया एकाग्रचित्तानें भागीरथीचें स्तवन करीत असतां एकाएकीं जो गंगेचा असंभाव्य लोट आला, तो महान् पर्वतांसही बुडवीत तपोवनासन्निध येऊन ठेपला. तेव्हां सर्व कुत्सित ऋषि भयानें आश्रम सोडून पळत सुटले व कित्येक शांतप्रकृतीचे आणि भाविक होते ते सीतेला शरण येऊन हात जोडून ह्मणूं लागले–माते, तूं सत्य पतिव्रता आहेस. आमचे आश्रम गंगौघानें वाहून जात आहेत व त्यांत कित्येक अज्ञान अर्भकेंही आहेत; तर हे जगज्जननी, आतां तूंच कृपा करशील तर आमचें रक्षण होईल. याप्रमाणें सर्व ऋषींचीं दीनवचनें ऐकतांच जानकीनें पुनः गंगेची प्रार्थना करून तो आलेला ओघ स्थिर केला. तेव्हां 'धन्य पतिव्रता!' अशी गर्जना करून तेथील सर्व तापसी तिच्या चरणीं लीन

झाले. नंतर ही गर्भवती असल्याची बातमी बाहेर फुटूं नये असें करून वाल्मीकानें सीतेला आपल्या आश्रमांत ठेवल्यावर नवमासभरतांच शुभ नक्षत्रीं व शुभ दिवशीं मध्यान्हसमयीं ती भूगर्भरत्न जानकी दोन पुत्ररत्नें प्रसवली. त्या वेळेस त्या सूतिकासदनांत वृद्धवृद्ध ऋषिपत्न्यांची गर्दी झाली. सर्व तापसस्त्रिया त्या चंद्रसूर्यप्रमाणें तेजस्वी बालकांस पाहून मंगलाशीर्वचनें देऊं लागल्या. प्रथम जो उपजला तो धाकटा आणि मागून उपजला तो वडील. वाल्मीकानें तें वर्तमान ऐकतांच शास्त्रविधीप्रमाणें अत्यानंदेंकरून पहिल्यानें धाकट्या बालकाला ल्हाहाळ्यावर ठेवून अभिषेक केला आणि त्याचें नांव लव ठेविलें. नंतर वडिलास कुशांवर अभिषेकिलें व त्याचें कुश नांव ठेवून वाल्मीकमुनि त्या दोन्ही पुत्रांचें अतिप्रेमानें लालन पालन करूं लागला. ते दोघेही शुक्लचंद्रकलेप्रमाणें वृद्धि पावत असतां ऋषिबालकांत आनंदानें क्रीडा करीत असत.

लव आणि कुश हे दोन्ही सीतानंदन सात वर्षांचे होतांच वाल्मिकानें कामधेनु आणून अनेक ऋषि बोलाविले आणि चार दिवस पर्यंत मंगल समारंभ करून त्या दोघांचें मौंजीबंधन केलें. तो सोहळा फारच वर्णनीय! सर्व इच्छित वस्तु कामधेनूनें पुरविल्या आणि तीं अति सुंदर बालकें पाहून ऋषींनीं त्यांस अनेक आशीर्वाद दिले. नंतर वाल्मीकमुनीनें दोघांकडून सांग वेदाध्ययन करविलें. पुढें दोघेही षट्शास्त्रीं प्रवीण झाले. अष्टादशपुराणेंही त्यांस मुखोद्गत झालीं. वाल्मिकानें स्वतः रचलेलें शतकोटि रामचरित्र त्यांस पढविलें, त्याचें ते दोघे सुस्वर व मनोवेधक गायन करीत असत. त्या बालकांचे अत्यद्भुत ज्ञान असल्यामुळें त्यांस अनेक तर्क सहज उत्पन्न होत असत.

त्यांची तीव्र बुद्धि पाहून वाल्मिकानें त्यांस समंत्रक धनुर्वेद पढविला आणि त्यांच्या हातांत गोजिरवाणी कार्मुकें देऊन सर्व युद्धकला शिकविल्या; त्या त्यांनीं मोठ्या हौसेनें लक्ष्यांत ठेविल्या. ते दोघे दहा वर्षांच्या वयांत येत तों पावेतों वाल्मिकऋषींच्या शिक्षणामुळें सर्व विद्यांत व कलाकुशलतांत प्रवीण झाले.

नंतर ते निर्भयपणानें वनांत संचार करून नानाप्रकारचीं भयंकर श्वापदें मारून ऋषींस व मातेस दाखविण्यासाठीं आणीत असत. उत्तम उत्तम कंद, मुळें, फळें आणून ते आपल्या प्रियजननी पुढें ठेवित आणि बालस्वभावानें अनेक प्रकारचीं विनोदार्थक लडिवाळ भाषणें करून जानकीचें मन रंजवीत असत. सत्समागमानें असलेला प्राणी संसारदुःखें विसरतो, तशी सीता त्या उभय बालकांची क्रीडा पाहून मागील खेद अगदीं विसरून गेली. एके दिवशीं ते दोघेही हातांत चिमुकलीं धनुष्यें घेऊन अरण्यांत फिरत असतां वाल्मिकाचा बंधू एक शृंगीनामक मृगवेषधारी ऋषि पर्वतमस्तकावर ध्यान करीत बसला होता. त्याला पाहतांच कुशानें बाण आकर्ण ओढून सोडला व तो त्या मुनीच्या मस्तकाचा भेद करून जातांच त्याचा प्राण गेला आणि दोघांनींही तें प्रेत ओढून आश्रमाकडे आणलें; तों वाल्मिकऋषि दुरूनच त्यांना विचारूं लागले—वत्सानों, तें काय ओढीत आहां ? याप्रमाणें त्या मुनीचा प्रश्न ऐकतांच दोघेही लडिवाळपणानें ह्मणाले—आजोबा, आह्मीं हा आज मोठासा मृग मारून आणला आहे. याचें आतां चर्म काढून तुह्मांला अनुष्ठानसमयीं बसण्यासाठीं देऊं याप्रमाणें ते बोलत आहेत; तों वाल्मीक जवळ आला आणि बंधूला ओळखून खिन्न झाला व हे दोघे फार अनिवार होऊन ब्रह्महत्या

करून येऊं लागले! असें ह्मणून त्यानें बंधूचें उत्तरकार्य केलें आणि जानकीला सर्व वर्तमान सांगितलें. तेव्हां ती स्मितवदनानें ह्मणाली—बाबा, आधीं हा सूर्यवंश मूळचाच अतितीक्ष्ण, त्यांत आपण जीव लावून सकल कला प्रवीण केलेलीं बालकें, त्यांच्या हातांत धनुष्यें दिलींत त्या दिवसापासून फारच धीट झालीं आहेत. आतां हें गुरूचा मंत्र गुरूला फळल्याप्रमाणें नाहींका झालें? तरी आपण दयासमुद्र आहां, ह्मणून माझीं दोन्ही अज्ञान बालकें दोषमुक्त होतील; अशी तजवीज योजण्याबद्दल मी हात जोडून आपली विज्ञापना करितें. असें ऐकून वाल्मिकमुनि ह्मणाला—सहस्र ब्रह्मकमलें आणून जर हे शिवार्चन करतील, तर ब्रह्महत्या दूर होईल. परंतु तीं ब्रह्मकमलें नेऊन राम नित्य शिवार्चन करीत असतो. ब्रह्मसरोवर अयोध्येसन्निधच असून त्यावर रामाचे असंख्यात वीर अहोरात्र रक्षण करीत असतात. असें ऐकतांच दोघेही बालभावानें गदगदां हंसून ह्मणाले—महाराज, प्रत्यक्ष कृतांतालाही शिक्षा करून आह्मीं आपली इच्छित वस्तु घेऊन येऊं तरच आपले शिष्य. प्रत्यक्ष राघव जरी आला, तरी त्यालाही शिक्षा करून कमलें आणूं; असें बोलून ते दोघेही किशोर वीर चिमणीं धनुष्यें चढवून मातेला व गुरूला वंदन करून जे त्वरेनें निघाले, ते ब्रह्मसरोवरावर येऊन धीटपणानें उभे राहिले. क्षणभर विश्रांति घेऊन कुश सरोवरांत शिरला आणि त्यानें सर्व कमलें खुडून घेतलीं, इतक्यांत त्या सरोवरावरील रक्षक वीर खवळले आणि गडबड करूं लागतांच लहूनें अनेक बाण टाकून कित्येकांचा संहार केला आणि कित्येक अयोध्येस पळविले. त्यांनीं रामाला सांगितलें कीं, दोन ऋषिबालकें आलीं व निर्वाण युद्ध करून कमलें घेऊन गेलीं. त्यांचा पराक्रम ऐकून रामास आश्चर्य वाटलें.

इकडे लव आणि कुश हे दोघे कमळें घेऊन आनंदानें जे निघाले, ते आश्रमांत आले व वाल्मीकाला आश्चर्यांत मग्न करून दोघांनींही नूतन शिवलिंगें करून सहस्र ब्रह्मकमलांनीं त्यांची पूजा केली आणि शिवप्रसादानें ब्रह्महत्याजनित दोषापासून दूर झाले. नंतर एके दिवशीं दोघेही सुकुमार सीतेचे चरण चुरीत असतां, तिला विचारूं लागले—माते, आह्मीं कोणत्या देशीं व कोणाच्या वंशीं उत्पन्न झालों आहों? आमचा तात कोण? आणि तो कोणत्या ठिकाणीं वास्तव्य करितो? हें सांग. याप्रमाणें पुत्रांचे प्रश्न ऐकतांच सीता सांगूं लागली—बाळांनों, अयोध्या नगरीचा प्रचंड प्रतापी सूर्यवंशी राजा दशरथ होऊन गेला; तो तुमचा आजा. त्याचे राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न हे चोघे पुत्र. त्या चौघांतील जो दशवदनांतक राजा रामचंद्र, तो तुमचा जनिता होय. मला रजकानें निंदिलें, ह्मणून त्यांनीं मला अरण्यांत सोडून दिलें. याप्रमाणें जगन्माता भाषण करीत असतां रुदन करूं लागली, तेव्हां दोघांनींही अनेकप्रकारेंकरून सीतेचें शांतवन केलें.

इकडे अयोध्येंतून सीता गेल्यापासून बारा वर्षेपर्यंत अवर्षण पडलें. नगराची सर्व शोभा गेल्यामुळें ती रमणीय अयोध्या दग्ध कांताराप्रमाणें भयाण व ओसाड दिसूं लागली. गोब्राह्मणांला अनावृष्टीमुळें त्रास होऊं लागला. असें पाहून अवर्षण पडण्याचें कारण काय? ह्मणून रामानें वसिष्ठांला प्रश्न केला; तेव्हां त्यांनीं सांगितलें—जानकी सारखें चिद्रत्न वनांत घालवून दिलेंस, ह्मणून हें अवर्षण पडलें आहे; तरी पृथ्वीवर शामकर्ण सोडून अश्वमेध करावा, ह्मणजे अवर्षण दूर होईल. असें ऐकतांच रामानें शरयूतीरावर विशाळ यज्ञमंडप सिद्ध करवून प्रत्येकाकडे दूत पाठवून असंख्य मुनीश्वर जमविले. बिभीषण सुग्रीवादिकांसही पत्रें पाठ

वितांच ते सेनेसह आले. यज्ञाची सर्व सामग्री पूर्ण होतांच राम व वसिष्ठ यांनीं अश्वशाळेंत जाऊन एक सुलक्षण शामकर्ण निवडून काढला आणि तो पृथ्वीवर सोडते वेळीं वसिष्ठांनीं त्याच्या मस्तकावर सुवर्णपत्रिका लिहून बांधली. त्यांत असें लिहिलें होतें कीं, " अयोध्याप्रभु दशरथनंदन दशमुखकंदन सकळ नृपश्रेष्ठ सूर्यवंशी राजारामानें हा अश्व पृथ्वीवर सोडला आहे. जो कोणी बलवान् असेल, त्यानें हा अश्व धरावा. सोळा पद्में दळभारासह शत्रुघ्न अश्वाचें रक्षण करीत आहे, तो त्याला सोडवील."

याप्रमाणें पत्र लिहून अश्वाच्या मस्तकावर बांधितांच रामानें त्याची पूजा केली आणि सोळा पद्में सैन्य बरोबर घेऊन शत्रुघ्न रामचरण वंदन करून आज्ञा घेण्यासाठीं हात जोडून उभा राहिला. तेव्हां रामानें त्याला सांगितलें—शत्रुघ्ना, सोळा दिवसांत पृथ्वी जिंकून सर्व राजे बरोबर घेऊन ये. असें सांगून शामकर्ण सोडून देतांच सैन्यासह शत्रुघ्न त्याचें रक्षण करीत त्याचे मागून निघून गेला. नंतर जानकीची सुवर्णप्रतिमा करून रामानें यज्ञाला आरंभ केला. जसा किरणचक्रांत दिवाकर, तसा यज्ञदीक्षा घेतलेला राम ऋषिमंडळींत शोभूं लागला. सुग्रीव, बिभीषण आणि मारुती हे अहोरात्र यज्ञमंडपाचें रक्षण करूं लागले आणि लक्ष्मण, भरत व सुमंत हे जी वस्तु लागेल, ती लौकर आणून देण्यासाठीं रामासन्निध तिष्ठत राहिले. यज्ञांत कोणत्याही पदार्थाची न्यूनता नव्हती. तो यज्ञसोहळा पाहण्यासाठीं देवगण विमानांत बसून आले व अंतरिक्ष राहून पाहूं लागले.

इकडे शामकर्णाच्या पाठीमागून निघालेला शत्रुघ्न छप्पन देश जिंकित चालला. तेव्हां सर्व राजे नम्रपणानें शरण येऊन करभार समर्पण करूं लागले आणि यज्ञावलोकन निमित्तानें त्याजबरोबर निघाले.

याचवेळेस पाताळीं वरुणानें महायज्ञाला आरंभ करून वाल्मिकऋषीला बोलावून नेलें होतें. त्यांनीं जातांना कुशाला कंदमूळें आणावयाची व लवाला उपवन संरक्षणाची आज्ञा केली होती. त्याप्रमाणें एके दिवशीं कुश फळें आणावयाकरितां वनांत गेला आहे व लव आपले संवगडी बरोबर घेऊन उपवन संरक्षण करीत आहे; तों त्याचमार्गानें तो याज्ञिकी शामकर्ण धांवत आला. त्याला पाहतांच लवानें मुलांस कौतुकानें सांगितलें कीं—पहा रे गडेहो, हा अश्व कसा येत आहे? याला आपण धरणार! तो असें बोलत आहे तों अश्व जवळ आला व त्याला त्या लवानें धरून त्याच्या मस्तकावरची सुवर्णपत्रिका पाहतांच तोडून घेतली आणि वाचली. नंतर गदगदां हंसून तो आपल्या सोबत्यांस ह्मणाला--या जगांत एक रामच बलवान् आहे कायरे? काय त्यालाच त्याच्या मातेनें जन्म दिला, ह्मणून तो थोर झाला? पाहूं बरें आतां या अश्वाला तो कसा सोडवील तें? माझी हीच प्रतिज्ञा. धरलेला अश्व सोडणार नाहीं, तरच खरा सीतानंदन! असें बोलून त्यानें त्या अश्वाला कौतुकानें थोपटून त्याचे डोळे पुसले आणि त्याच्या गळ्यांत उत्तरीय वस्त्र घालून त्याला कर्दळी जवळ बांधून ठेविलें; इतक्यांत अश्वसंरक्षक वीर धांवत आले आणि पोरांस दटावून घोडा कोणी बांधला? असें विचारूं लागले. तेव्हां त्या सर्वांनीं भिऊन लवाकडे बोटें दाखविलीं.

# अध्याय ३८ वा.

लव अत्यल्प किशोर असल्यामुळें सैनिकांनीं केवळ कौतुकानेंच ...रु बांधला आहे असें मानिलें, तरी ती बातमी शत्रुघ्नापर्यंत जातांच यानें भ्रूसंकेतानें घोडा सोडा आणि पुढें चला; असें सुचविलें. तेव्हां कित्येक वीर आतां अयोध्या जवळ आहे, चला. असें म्हणून घोड्याला सोडण्यासाठीं पुढें येतांच लवानें त्यांना दटावून सांगितलें- ...स्करहो, खबरदार! अश्वाला हात लावाल तर मी छेदन करीन. ...ा मी घोडा सोडीत नाहीं; म्हणून तुमचा राम कोण असेल, त्याला ...ांगा. अथवा शक्ति असेल तर युद्धाला या. तुमचीं सर्वांचीं गर्वक...र्वें आज तोडून टाकितों. असें बोलून त्या लवानें धनुष्य चढवितांच कित्येक वीर तटस्थ झाले आणि कित्येक चावट पोर उगीच धीट...पणा दाखवून बोलतें; असें मानून घोडा सोडण्यासाठीं पुढें सरसावले; पण लवानें अकस्मात् बाणवृष्टि करून तितक्यांचेही हस्त तोडून टाकले. वटपत्रांप्रमाणें कित्येक वीरांचे मनगटापासून पंजे तुटून पडतांच सेनेंत हाहाःकार उडाला व दुसरे वीर घोडा सोडण्यासाठीं पुढें आले, पण लवानें त्यांचे खड्गासह हस्त बाहूपासून तोडले. तेव्हां मात्र लक्षावधि वीर पुढें लोटले आणि त्यांस हटविण्याकरितां लव वर्षाकालींच्या जलधारांप्रमाणें बाणवृष्टि करूं लागला; त्यामुळें योद्धे पटापट मरूं लागले आणि भूमीवर शिरांच्या राशि पडल्या. जो तो वीर त्या लवाला दुरूनच पाहून हा बारा वर्षांचा बाळ दिसतो तरी याचा गुरु सबळ आहे, असें म्हणूं लागला. कोणीही त्याच्यापुढें उभा राहून टिकाव धरीना. तेव्हां सोळापद्में दळभार एकदम त्याजवर

लोटला; परंतु त्या प्रौढ प्रतापी सीतानंदनानें अमोघ शरवर्षाव करून एका क्षणांत सर्वांना खिळून टाकलें. तेव्हां सिंहनाद करून शत्रुघ्न पुढें आला आणि त्या बालकाकडे पाहूं लागला; तों हुबेहुब दुसरा रामच! तो क्षणभर आश्चर्य पावला.तरी रागानेंच त्याला ह्मणाला—कोणाचारे बालक तूं? हें फार अनुचित कर्म केलेंस! आतां तुला शिक्षा करतों पहा. असें ऐकतांच लव त्याला ह्मणाला—अरे सिंहाच्या दरींत जरी मदोन्मत्त गज शिरला, तरी तो वांचून परत जाणार नाहीं; हें तुला ठाऊक नाहीं वाटतें? असें ऐकतांच शत्रुघ्नानें लवावर पांच बाण सोडले व लवानें ते सर्व एकाच बाणानें तोडले. याप्रमाणें बाणयुद्ध चाललें असतां शत्रुघ्नाला वाटलें कीं, हा किशोर आपल्याला ऐकत नाहीं. तेव्हां त्यानें लवावर अनेक शस्त्रास्त्रें सोडलीं पण तींही त्यानें तोडलीं. शेवटीं जेव्हां अगदीं निरुपायाची वेळ आली, तेव्हां रामानें निर्वाण प्रसंगीं सोडण्यासाठीं जो शत्रुघ्नाला एक बाण दिला होता, तो त्यानें भात्यांतून बाहेर काढला आणि अभिमंत्रण करून लवावर सोडला. तो प्रखर बाण पाहतांच, याचें निवारण कुश जाणतो तो माझा पाठिराखा वनांत गेला आहे; आतां कसें करावें? असें बोलून त्यानें एक दिव्यबाण सोडून शत्रुघ्नाच्या बाणाचे आकाशांत दोन तुकडे केले; पण अर्धाच बाण येऊन लवाच्या कोमल हृदयांत भरला; त्यामुळें त्याला मूर्छना आली. त्याचे नेत्र आरक्त झाले, हृदयांतून भडभडां रुधिर वाहूं लागलें आणि शिखा [illegible] गेली. तेव्हां त्या लवाच्या बाणांपासून जे कांहीं वीर जिवंत राहिले होते; त्यांनीं किशोर पडला असून गर्जना केली व त्याच्या [illegible] साठीं त्याच्यासभोंवती जमले. [illegible] आणि त्याला

ाहळून याची धन्य जननी, यालाच प्रसवली; असें ह्मणून त्या ाला उचलून त्यानें मांडीवर घेतलें. त्याच्या मुखावरील रक्त सून टाकलें आणि ती आकर्णनयन मनोहर दुसरी राममूर्तीच पाहि- पामुळें व त्याच्या हृदयांत स्नेहाचें भरतें आल्यामुळें नेत्रांतून अश्रुपात ऊं लागला. नंतर हा कुमार रामचंद्राला नेऊन दांखवूं, असें ह्मणून ा शत्रुघ्नानें त्याला आपल्या रथांत नेलें आणि शामकर्ण सोडून तो ानंदानें जयवाद्यें वाजवीत सेनेसह अयोध्येच्या मार्गास लागला.

इकडे लवाचीं सहचर लेंकरें सीतेकडे धांवत गेलीं आणि माते, ्या लवाला धरून रथावर घालून नेलें, असें सांगूं लागलीं. मुलां- ्या तोंडानें सर्व वर्तमान ऐकतांच सीता मूर्छित होऊन भूमीवर डली. लोभ्याचें धन गेलें ह्मणजे त्याची जशी स्थिति होते, तशी ीतेची झाली व कांहीं वेळानें सावध होऊन ती जनकतनया विलाप रीत असतां ह्मणाली—हर हर हर! मी अनाथ, दुर्बळ, परदेशी आणि ंग असतां, माझ्या बाळाला कोणी निर्दयानें धरून नेलें? अरेरे! ाझीं बापुडवाणी दोन बालकें, त्यांतील एक माझ्या पूर्वकर्मास्तवच ोणी दुष्टानें धरून नेलें काय? देवा, तें कोमल बालक घाय लागतांच ुःखी होऊन आई आई ह्मणालें असेल! त्याचा निर्मल मुखचंद्र आणि वेशाल नयन आतां मी कोणत्या उपायानें पहावे? माझीं दीन बालकें वळुवें खाऊन निर्वाह करणारीं, त्यांना युद्ध करण्याचें बळ कोठून ाणार? हाय हाय! माझ्या बाळावर ज्यांनीं शस्त्र उचललें ते पाप- ी क्षत्रिय नव्हेत. अरेरे! माझा एक नेत्र फुटल्याप्रमाणें मला ालें आहे, हें मी कोणाला सांगावें? वाल्मिकऋषि तर पातळीं ला आहेत आणि कुशही फळें आणण्यासाठीं वनांत गेला आहे. आतां

म्यां अबलेनें ह्या प्रसंगीं कोणाला शरण जावें ? याप्रमाणें जानकी वक्षःस्थल बडवून आक्रोश करीत असतां कुश वनांतून फळें घेऊन परत आला व लवाला न पाहिल्यामुळें विमनस्क होत्साता मातेजवळ आला, तों तीही आक्रोशच करीत आहे. कुशाला पाहतांच जानकी अधिक गहिंवरली आणि हंबरडा फोडून ह्मणाली—बाळा, कोण्या परचक्रानें येऊन तुझा बंधू धरून नेला. तूं त्याचा पाठिराखा जवळ नव्हतास; ह्मणून तो तुझें स्मरणच करीत गेला असेल. तूं तरी त्याच्या धांवण्याला धांव आणि त्यानें जों प्राण सोडला नाहीं, तों त्याला सोडवून आण. असें ऐकतांच कुशानें धनुष्य चढवून जानकीला वंदन केलें आणि वाल्मिकगुरूचें स्मरण करून सर्वांगाला विभूति चर्चन केली आणि उभा राहून मोठ्या आवेशानें तो जानकीला ह्मणाला—हे अंबे, मी जर तुझा कुमार सत्य आहें, तर ब्रह्मा, विष्णु, शिव आणि इंद्रचंद्रादिकांसही बाणानें खंडविखंड करीन व समरंगणात कोणीही योद्धा आला तरी त्याला शासन करून मी आपल्या बंधूला सोडवून आणीन. आज बळाची प्रौढी दाखवीन आणि महावीरांस मर्दन करून लवाला सोडवीन तरच तुझा पुत्र. असें ह्मणून कुंजरांचा माग काढीत पंचानन जसा आवेशानें निघतो तसा तो कुशवीर सिंहनाद करीत निघाला.

वाल्मिकाचा प्रियशिष्य रामपुत्र बाळवीर कुश शत्रुघ्नाचा दळभार पुढें जात आहे, असें पाहतांच प्रचंड हांक देऊन त्यांस ह्मणाला—रे तस्करहो, उभे रहा ! उभे रहा ! ! माझी वस्तु बलात्कारानें हरण करून तुह्मी कोठवर जाणार आहां ? उभे रहा ! तस्करांचे हस्तचरण खंडण करावे हेंच शासन त्यांस योग्य आहे. याप्रमाणें निर्भय व गंभीर

भाषण ऐकतांच शत्रुघ्नाचे सैनिक खवळले आणि मागें पाहूं लागले, तों शामसुंदर आकर्णनयन कोपाविष्ट झालेला बारा वर्षांचा किशोररूपी दुसरा रामच आपणास थांबवीत आहे. त्याला पाहतांच सर्वांच्या अंगाला कंप सुटला. आतां हा सर्वांचा संहार करील, असें एकदम सगळ्यांच्या मनांत आलें, इतक्यांत कुशानें धनुष्यावर चपलेप्रमाणें तीक्ष्ण बाण लावून अतिचपलतेनें असंख्य सोडले, तेव्हां सेनापति त्याच्या बाणांचें निवारण करून त्याजवर बाणवृष्टि करूं लागला; पण कुशानें त्याचा तत्क्षणीं वध केला. तेव्हां शत्रुघ्नाच्या सेनेंत हाहाःकार उडाला. तों त्या सेनापतीचा बंधु नागेंद्र नामा होता, तो खवळून कुशावर आला व त्यानें प्रखर वीस बाण त्याजवर सोडले; पण अनंत पातकें जशीं एकाच नामानें भस्म होतात तसे त्याचे वीसही बाण कुशानें एकाच बाणानें खंडित केले आणि एक अर्धचंद्रबाण सोडून त्या नागेंद्राचें शिर उडविलें. नंतर जेव्हां त्या बालवीरानें शत्रुघ्नाची सर्व सेना खिळून टाकली, तेव्हां तो कैकयीनंदन हांक देत पुढें आला व चपलेहून सतेज बाणवर्षाव करूं लागला; पण कुशानें त्या बाणांचें निवारण करून एक सतेज वाल्मिकदत्त शर भात्यांतून काढला आणि शत्रुघ्नाचें हृदय लक्षून सोडतांच महावज्र जसें पर्वतावर आदळावें तसा तो शत्रुघ्नाच्या हृदयावर लागला; त्यामुळें शत्रुघ्नाला घोर मूर्छना येऊन महावृक्ष उन्मळून पडल्याप्रमाणें तो रथांत पडला व अवशिष्ट वीर घायाळ होऊन कुशाच्या बाणभीतीनें पळाले. सोळापद्में दळभार आणि देशोदेशींचे नृपवर सर्व रणांत पडल्यावर कुशानें चापाचा गुण उतरला आणि तो लवासाठीं सर्व सेना शोधूं लागला; पण तो शत्रुघ्नाच्या मुख्य रथांतच मूर्छना येऊन पडलेला होता; त्यामुळें

त्याला फार शोधावें लागलें नाहीं. कुशानें त्याला पाहतांच उचलून अति प्रेमानें हृदयाजवळ धरिलें. इतक्यांत लव सावध झाला आणि डोळे उघडून बंधूचें वदन पाहतांच दुप्पट अवसान आल्याप्रमाणें करून उठला व शत्रुघ्न कोठें आहे ? असें विचारूं लागला. तेव्हां कुश सद्गदांतःकरणानें ह्मणाला—बाळा, तुला फार श्रम झालेना ? लव ह्मणाला—तुला पाहतांच सर्व श्रम दूर झाले. तूं त्या शत्रूचा संहार केलासना ? शाबास ! चला आतां शामकर्ण घेऊन आश्रमांत जाऊं, असें ऐकतांच कुश ह्मणाला—बाळा, येथून जाऊन उपयोग नाहीं. आतां पुष्कळ वीर युद्धाला येतील. त्या सर्वांचा पराभव करून पूर्ण जयश्रीसह वारु घेऊन जननीच्या दर्शनास जाऊं. याप्रमाणें कुशाचें भाषण ऐकतांच लव ह्मणाला—दादा, पैज घालून अयोध्येचें राज्य घ्यावें आणि रामाला धरून गुरूंच्या चरणाजवळ आणावें. याप्रमाणें बोलत असतां त्यांनी तो शामकर्ण पुनः धरून एका वृक्षाला बांधला आणि धनुष्य सज्ज करून मोठ्या उत्सुकतेनें ते अयोध्यापंथ लक्षीत उभे राहिले.

राम यज्ञमंडपांत बसून आतां शत्रुघ्न लौकरच येईल, या विचारांत आहे तों रणांतील घायाळ येऊन सांगूं लागले. प्रभो, द्वादश वर्षांच्या वयाचे दोन विप्रकुमार आहेत, त्यांनीं शामकर्ण बांधून सेनेसह शत्रुघ्नास रणांत पाडलें. हें वर्तमान ऐकतांच राम हातांतील अवदान टाकून शोक करूं लागला. तेव्हां लक्ष्मण भरतादि सर्व यज्ञाला विघ्न आलें ह्मणून गजबजले. तों रामानें लक्ष्मणाला आज्ञा केली कीं, सौमित्रा, शत्रुघ्नासारखा पराक्रमी वीर अत्यल्प ऋषिकुमारांनीं रणांत पाडला; तर आतां तूं स्वतः अपार सेना घेऊन जा. असें ऐकतांच रामचरणांबुज वंदून अपार सैन्यासह लक्ष्मण कर्दळीवन याचा निघा

या वेळेस त्याच्या सेनेचा ओघ चौदागांवें रुंदी धरून चालला होता. या सैन्यासह लक्ष्मणानें रणांत येऊन चंद्रसूर्यांप्रमाणें त्या दोन्ही :र्ति अवलोकन केल्या, तों सेनापती काळजित लक्ष्मणाजवळ येऊन :भा राहिला.

इकडे बंधूचें मन पाहण्यासाठीं कुश लवास ह्मणाला—आतां मात्र ,ी सेना महा प्रतापी आली बरें ! त्या सेनापतीचा स्पंदन पहा कसा :गानें येत आहे. मला वाटतें कीं, आपणांस हे ऐकणार नाहींत; असें ऐकतांच लव ह्मणाला—दादा, तूं आला आहेस तर आतां मी प्रत्यक्ष काळालाही दंड करीन. तुला अधिक काय सांगूं ? प्रत्यक्ष राम आला तरी त्यालाही तूं जिंकशील असें मला वाटतें. यांचें मला मुळींच :य नाहीं; पण एक अशी चिंता आहे कीं, उपवनाजवळ युद्ध करीत असतां माझें धनुष्य भंग पावलें आहे. त्याला काय करावें ? कुश ह्म-णाला—अरे हे सर्व तर आपणास धरण्याच्या बेतानें चालून येत आहेत; :र अशा बिकट प्रसंगीं आपणांस धनुष्य कोण देणार ? तरी चापप्रा-प्तीस्तव आपण सूर्याची आराधना करूं. असें बोलून दोघेही ऊर्ध्ववदन करून सूर्यमंडळाकडे पहात असतां हात जोडून चापप्राप्तीस्तव त्या सह-स्रकिरणाची प्रार्थना करूं लागले, तों सूर्यानें कृपायुक्त होऊन अक्षय-चाप भूमीवर टाकलें. तें घेऊन दोघांनींही पुनः सूर्याला साष्टांग नम-स्कार केला आणि ज्यानें त्यांना ती सूर्यस्तुति शिकविली होती; :याचे दोघांनींही आभार मानले.

इतक्यांत सौमित्राचे वीर त्यांच्या अगदीं जवळ येतात, असें वाट-:तांच लवानें तें सूर्यदत्त दिव्य अक्षयचाप चढविलें आणि असंख्य शरांचा अचुक वर्षाव करून लक्ष्मणाच्या अपार वीरांचीं शिरकमलें

भूदेवीच्या चरणीं वाहिलीं. कुशानेंही बाणवृष्टि करून असंख्य सेना खिळून टाकली. तेव्हां लक्ष्मण काळजिताला ह्मणाला—हीं दोन्हीं मुलें एकत्र जर आहेत, तर कोणालाही आटपणार नाहींत; असें मला वाटतें. तर सैन्याचे दोन भाग करून दोघांस दोहोंकडे घेरावें. तूं ज्येष्ठाला घेर, मी कनिष्ठाला घेरतों. असा बेत करून काळजित व लक्ष्मण यांनीं दोघांस दोहोंकडे घेरून त्यांच्या सभोंवती सैन्याचे चौविस चौविस वेढे घातले. लक्ष्मणानें लवास वेढिलें होतें, पण त्यानें एक शर सोडतांच लक्षावधि शर निर्माण होऊन लक्षावधि वीरांस अचुक लागावे, असा त्या वाल्मिकाच्या मंत्राचा प्रभाव पाहून लक्ष्मण चकित झाला. इतक्यांत रुधिनामक राक्षसानें आकाशांतून अकस्मात् येऊन लवाच्या हातांतील धनुष्य हरण करून पुनः आकाशांत उड्डाण केलें. तेव्हां मात्र तो सीतानंदन क्षणभर विचारांत पडला, तरी वेगानें त्या राक्षसाच्या पाठोपाठ उड्डाण करून त्यानें त्याला अंतरिक्षांतच धरिलें आणि आपलें चाप हिसकावून घेऊन त्याचें एकाच मुष्टिप्रहारानें मृत्तिकाघटवत् चूर्ण केलें. नंतर कटकांत येऊन त्यानें एका निमिषार्धांत विलक्षण बाणवर्षावानें आपल्या भोंवतालचे सैन्याचे चौवीसही वेढे उघडून टाकले. मोठमोठाले योद्धे हातांतील शस्त्रें टाकून " आमचें रक्षण कर " ह्मणून लवाला शरण येऊं लागले. कोणी युद्ध टाकून पळत सुटले आणि कोणी कोणी तर छिन्न विच्छिन्न झालेले असल्यामुळें धडाधड पडूं लागले.

याप्रमाणें आपल्या सेनेची दुर्दशा पाहतांच लक्ष्मण सिंहनाद करीत पुढें आला व त्यानें प्रखर पांच शर लवावर सोडले. त्याचें निवारण करून लव त्याला ह्मणाला—अरे, त्वां पूर्वीं इंद्रजिताला मारलेंस

ती सर्व विद्या आज मला दाखीव पाहूं ! तूं चौदा वर्षें निराहार राहून अरण्यांत फार श्रमलास, यासाठीं तुला या रणांत निजवून विश्रांति देतों, पहा ! याप्रमाणें तो लव भाषण करीत असतां त्याचें रूप पाहून चकित झालेला सौमित्र त्याला विचारूं लागला; बालका, तूं कोणाचा कोण हें मला सांगशील ? लव हंसून ह्मणाला—तूं मला विचारावेंस, असें कांहीं मोठेंसें कारण नाहीं. हा बाण आला संभाळ ! असें बोलून त्या रामपुत्रानें जो एक सबळ शर सोडला, त्याबरोबर लक्ष्मणाला रथासह आकाशांत उडविलें. तो रथ वायुचक्रांत गरगरां फिरून जेव्हां भूमीवर पडला, तेव्हां लक्ष्मण दुसऱ्या रथांत बसला आणि असंख्य प्रखर बाण सोडूं लागला; पण लवानें त्याच्या तिप्पट बाण सोडून लक्ष्मणाचे बाण तटातट् तोडून टाकले. तेव्हां लक्ष्मणानें मंत्र जप करून एक बाण सोडला, त्यापासून कोट्यावधि गदा निर्माण झाल्या, तों लवानें त्यांच्या निवारणासाठीं जो बाण सोडला, त्यापासून कोट्यावधि चक्रें निर्माण झालीं आणि त्यांनीं त्या सर्व गदा छेदून पाडल्या. नंतर दोघांचें बहुत वेळपर्यंत शस्त्रास्त्र युद्ध चाललें होतें, त्यांत तर लवानें लक्ष्मणाला अगदीं चकित करून सोडलें. तेव्हां लक्ष्मण विचार करूं लागला कीं, हे पराक्रमी पुत्र कोणाचे आहेत, हें कांहीं कळत नाहीं. मला वाटतें बालवेष धरून मुद्दाम शिव आणि विष्णु हे दोघे आलेले आहेत. याप्रमाणें लक्ष्मण विचारांत आहे तों लव त्याला ह्मणाला—अरे सौमित्रा, तुझ्या जवळचे बाण संपले असले तर तूं अयोध्येस जा आणि रामाला पाठवून दे. असें ऐकतांच लक्ष्मणाला राग आला व न बोलतां तो प्रखर बाण सोडूं लागला. तेव्हां सीतापुत्रानें विचार केला कीं, हा शेषावतारी लक्ष्मण नादानें मोहित होईल. असें मनांत येतांच त्यानें

बाणावर नागास्त्र स्थापून सोडलें, त्यापासून एकाएकीं कोट्यावधि नाग निर्माण झाले आणि तो भोगेंद्रावतार लक्ष्मण त्या नागमयांत बसून डोलूं लागला. इतक्यांत तो बाण येऊन सौमित्राच्या हृदयांत शिरला व लक्ष्मण मूर्च्छित होऊन पडला.

इकडे काळजितराक्षसानें कुशासभोंवती सैन्याचे चोवीस वेढे घात-ले होते, ते सर्व फोडून त्यानें काळजितासह सर्व सैन्याचा विध्वंस केला आणि लव, कुश हे दोघेही सीतापुत्र एकत्र होऊन आनंदानें शाम-कर्णाचें रक्षण करीत राहिले.

इकडे अयोध्येंत कोदंडपाणि राम भरताला सांगूं लागला—बंधो, तूं आणखी सेना घेऊन लक्ष्मणाला साह्य होण्यासाठीं जा आणि त्या महा योद्ध्याला माझा निरोप सांग कीं, तीं बालकें न मारितां मला पाहण्यासाठीं जिवंत घेऊन ये. जा जा, त्याचा क्रोध अनिवार आहे. कदाचित् तो त्यांचा वध करील. बालकांनीं जरी अन्याय केला तरी त्यांजवर कृपाच केली पाहिजे. आम्हीं सीतेचा त्याग करून पुत्रसु-खाला अंतरलों आहों. याप्रमाणें भाषण करीत असतां सीतेचें स्मरण झाल्यामुळें त्याच्या डोळ्यांतून पाणी आलें. इतक्यांत रणांतील घायाळ धांवत आले आणि काळजितासह सौमित्राच्या पराजयाचें वर्तमान सांगूं लागले. तें ऐकतांच राम चिंतातुर होऊन “आज आम्हांवर खरोखर सर्वेश्वरानें कोप केला” असें म्हणूं लागला.

---

# अध्याय ३९वा






# अध्याय ३९ वा.

सौमित्र रणांत पडला, असें ऐकतांच राम धरणीवर अंग टाकून अपार शोक करूं लागला. तेव्हां सुमंतानें त्याला सांवरून धरिलें आणि त्याचें शांतवन केलें. नंतर भरत आणि हनुमंत हे दोघे सेना सिद्ध करून पवनवेगानें रणांत आले. दोघेही आश्चर्यानें रण अवलोकन करीत आहेत, तों दोघेही सीतापुत्र त्यांच्यापुढें धांवत आले. त्यांस पाहतांच भरत हनुमंतास म्हणाला—हे दोघेही रामाप्रमाणें दिसतात. यावरून मला असें वाटतें कीं, हे सीतानंदन आहेत. ज्या वेळेस रामानें सीतेला वनांत नेऊन सोडविलें, त्या वेळेस ती गरोदर होती. असें ऐकतांच मारुतीनें ती गोष्ट मान्य केली. तो म्हणाला—हें रामाचेंच वीर्य म्हणून असे महापराक्रमी निपजले आहेत. याप्रमाणें भरत व हनुमंत भाषणें करीत आहेत, तों लव कुशाला म्हणाला—दादा, ते पहा नर आणि वानर मसलत करीत आहेत. त्यांच्या मनांत असें आहे कीं, आपणांस युद्धांत गुंतवावें आणि शामकर्ण सोडून न्यावा. असें ऐकतांच कुश म्हणाला—तूं अश्वाचें रक्षण कर आणि मी युद्ध करितों. इतकें बोलून तो धनुष्य चढवून पुढें सरसावला आणि भरतास म्हणाला— कायरे, तूं लक्ष्मणाहून वडील आहेस वाटतें, तुझी आंगलट मोठी दिसते. तुझें नांव काय? तुझा पिता कोणत्या ठिकाणचा नृपति आणि पूर्वी तूं कोणाबरोबर युद्ध केलें आहेस हें मला सांग. तूं जर माझें नांव विचारशील, तर मला कुशेंद्र चूडामणि असें म्हणतात.

याप्रमाणें कुशाचीं गंभीर भाषणें ऐकतांच भरत म्हणाला—वत्सा, तुला मी जीवदान देतों. आपल्या घरीं जा आणि मला भरतानें सो-

कळें असें आपल्या मातेला सांग. असें ऐकतांच कुश हसून म्हणाला- तुझे दोघे बंधु रणांत पडले, त्यांचा सूड घेण्यासाठीं तुला रामानें पाठविलें; असें असतां तूं गोष्टी बोलत उभा राहिलास, यावरून तुझ्या अंगांत शक्ति नाहीं असें मला वाटतें. तर रणांतून पाठ दाखवून अयोध्येस पळून जा. मी पाठमोऱ्याला कधींही मारणार नाहीं. तुला अभय आहे. जा आणि तुझा रघुनंदन राम कोण आहे त्याला पाठवून दे. असें ऐकतांच भरतानें चापाला बाण लाविला आणि कुशावर सोडून दिला; पण सीतात्मजानें त्याचें निवारण करून शरवर्षाव आरंभिला आणि बहुत सैन्याचा संहार केला. भरतानें जें जें अस्त्र सोडावें तें तें सीतापुत्रानें तोडावें. युद्धविद्याबलानें तो कुश कांहीं भरताला आटपेना. तेव्हां भरतानें कार्तवीर्यास्त्र सोडलें तो बाण सुटतांच शतावधि सहस्रकरांचें कार्तवीर्य उत्पन्न होऊन कुशावर बाण सोडूं लागले. असें पाहतांच कुशानें परशुरामास्त्र सोडलें व त्या कार्तवीर्यांचा लोप केला. नंतर भरतानें कालरात्रीचा जप करून बाण सोडतांच अंधार झाला. तेव्हां कुशानें द्वादश सूर्य प्रगट केले. भरतानें महिषासुरास्त्र सोडतांच कुशानें शक्ति सोडली. भरतानें त्र्यंबकास्त्र सोडतांच कुशानें त्यावर भस्मासुरास्त्र योजलें. शेवटीं कुशानें एक सूर्यमुख शर सोडला आणि तो भरताच्या हृदयांत लागतांच तो मूर्च्छा येऊन रथांत पडला. भरत पडण्याचे आधींच पुष्कळ सैन्य पडलें होतें, म्हणून मारुती एक पर्वत घेऊन कुशावर धांवला. त्याला पाहतांच कुशानें एक वज्रमुख बाण सोडून त्याच्या हातांतील पर्वताचें पीठ केलें आणि दुसराही एक अति तीक्ष्ण बाण सोडून त्या बलवंत मारुतीलाही त्यानें मूर्च्छित करून रथांत पाडलें

इकडे बिभीषण आणि राम तीं मुलें कोणाचीं असावीत, म्हणून विचार करीत आहेत; तों भरत व हनुमंत पडल्याची बातमी आली. तेव्हां बिभीषण रामास म्हणाला—प्रभो, आतां यज्ञ कसला करणार? तिकडे काय प्रकार आहे तो जाऊन अवलोकन तरी करावा. असें म्हणतांच रामानें हातांतील यज्ञकंकण तोडून टाकलें आणि अयोध्येंतील सर्व सैन्य बरोबर घेऊन तो युद्धाला निघाला. त्या वेळेस सगळी अयोध्या हडबडून गेली. बिभीषण, सुग्रीव, जांबुवंत इत्यादि सर्व वीर बाहेर निघाले. वर्षाकाळीं गंगेचा पूर जसा सागराकडे धांवतो, तशी ती सेनानदी रणसिंधूकडे धांवूं लागली. राम रणांत येऊन पाहूं लागला तों तिघेही बंधू ' तुझ्या कन्येला गांजलें ' म्हणून पृथ्वीला नमस्कार करीत आहेत, असें त्याला दिसलें. बंधूंचीं प्रेतें पाहतांच रामाला फार कोप आला. इतक्यांत तीं शामसुंदर व सुकुमार बालकें एकमेकांकडे पाहून गोष्टी सांगत असलेलीं त्याच्या दृष्टीस पडलीं, तों वानर शिळा व वृक्ष घेऊन त्यांजवर धांवले; तेव्हां दोघांनींही धनुष्यें ओढून असंख्यात् शर सोडले आणि सर्व वानर खिळून टाकले. त्यांचें हस्तलाघव पाहतांच रामाला आश्चर्य वाटलें. सर्व वानरांपैकीं कोणी पडले व कोणी पळाले. इतक्यांत मारुतीच्या मनांत आलें कीं, अकस्मात् दोघांलाही पुच्छानें बांधून रामाजवळ न्यावें. असें इच्छून तो [illegible] करीत आहे, तों कुशानें एक सबळ बाण त्याच्या हृदयावर मारला आणि गर्जना करून त्याला म्हणाला—मर्कटा, क्षणभर स्थिर रहा. त्वां अशोकवनाचा विध्वंस केलास; तसें येथें वाकुमार नाहीं. [illegible] टाकणारा हें राक्षसी युद्ध नव्हे, किंवा उचलून नेऊं शकशील तर हा द्रोणाचल नव्हे. त्वां [illegible] [illegible]

करून व रावणाचें नगर जाळून मोठा पुरुषार्थ मिळविला आहेस; पण तें येथें चालणार नाहीं. माझ्या मातेचें तुजवर प्रेम आहे, ह्मणून तुला तसाच ठेवतों. असें ऐकतांच मारुती स्वस्थ राहिला. इतक्यांत हातांत महा वृक्ष घेऊन सुग्रीव पुढें आला, तों लवानें त्याच्या हातांतील वृक्ष छेदून पाडला व त्याला सांगितलें—हे मित्रपुत्रा, तुमचा मागील काळ आतां राहिला नाहीं. तुह्मां पतितांस शिक्षा करण्याचाच हा काळ आहे. त्वां आपला ज्येष्ठबंधु मारवून त्याच्या स्त्रीबरोबर व्यवहार मांडलास. माकडच तूं. तुला ज्ञान कसलें? त्यांतून तुला गुरु मिळाला तो तर पूर्ण न्यायी. असो. त्याबद्दल आतां शिक्षा भोग. गुरूच दुर्मार्गानें चालल्यावर शिष्याला सन्मार्ग कसा कळावा? असें बोलून त्यानें सहस्रबाण सोडले आणि सुग्रीवास मूर्च्छित केलें. नंतर जांबुवंत आला, त्याला कुश ह्मणाला—रे वृद्धा दृष्टिहीना अस्वला, का आला येथें आलास? असें बोलून त्यावरही त्यानें हजार बाण सोडून त्यास भूमीवर पाडलें; तों नळ आला. त्याला हें सेतुबंधन नव्हे, असें सांगून लवानें पांचबाणांनींच खिळलें. नंतर अंगद आला, त्याला कुश ह्मणाला— अरे, येथें, उचलून नेण्याला रावणाचा सभामंडप नाहीं. तुझ्या मातेनें व्यभिचार केला त्याचें प्रायश्चित्त तुला देतों; असें बोलून पांच बाणांनीं त्यालाही त्यानें खिळलें.

याप्रमाणें हनुमंतासह अष्ट उत्पति रणांत पडतांच रामानें कोदंड चढवून त्यावर बाण लाविला; इतक्यांत कुशानें त्याजवर दहा बाण सोडले रामानें ते बाण येतात असें पाहिल्याबरोबर सहस्र सोडले; पण कुशानें एक लक्ष बाण सोडून बाणांचा मंडप केला. रामाहूनही कुशाचें हस्तलाघव [illegible]. तो त्याला युद्धांत हार जाईना. तेव्हां राम बाण सोडून

द करून त्या दोन्ही बालकांस हांक मारून ह्मणाला—हे विप्रबालकहो, ह्मांवर मी प्रसन्न आहें, तुह्मांला दूध पिण्यासाठीं अपार धेनु देईन ‌किंवा गजवाजींसह अपार संपत्ती देऊन मी तुमचें दरिद्र दूर करीन. असें ऐकतांच कुश ह्मणाला—हे राघवा, तुझ्या संपत्तीची आह्मांला गरज नाहीं. ती तुझी तूंच भोग. तुझा न्याय आणि दया आह्मांला पूर्ण ठाऊक आहे. त्वां अन्यायानें वालीला मारलें आणि अपराध नसतां जानकीला वनांत घालवून दिलेंस; यावरून तुझें महत्व आमच्या ध्यानांत येत आहे. बरें, तें पूर्वीचें न आठवितां तुला दयासिंधु जरी ह्मटलें, तरी भागीरथीप्रमाणें निष्पाप जी सीता, तिचा विनाकारण त्याग केलास, हें तुला शोभलें काय? याप्रमाणें ते दोघे बालभावानें भाषण करीत असतां रामचंद्राच्या मनांत फारच मोह उत्पन्न झाला आणि त्या दोघांसही हृदयाजवळ धरून आलिंगन द्यावें, असें त्याला वाटूं लागलें. त्या दोघांत रामाला सीतेची प्रतिमा स्पष्ट दिसूं लागली आणि तो प्रीतीनें त्यांजकडे पहातच उभा राहिला. तेव्हां ते दोघे त्याला ह्मणाले—अरे राघवा, बाण सोड. तूं सूर्यवंशी क्षत्रिय ह्मणवितोस आणि युद्ध सोडून गोष्टी सांगत कां उभा राहतोस? असें ऐकतांच राम त्यांना ह्मणाला—तुह्मीं दोघे कोण आहां? कोणाच्या वंशांत निर्माण झालेत? तुमचीं माता पिता कोण? तुम्हां दोघांला समान विद्या कोणत्या गुरूनें शिकविली? धनुर्वेद, मंत्रास्त्रें, युद्ध, कलाकौशल्यें आणि चित्रविचित्र कला शिकविणारा तुमचा सद्गुरु कोण आहे, त्याचें नांव सांगा बरें? असें ऐकतांच ते दोघे गदगदां हंसून ह्मणाले—

"राघवा, तुझे तीन बंधु रणांत पडले आहेत; त्याविषयींचा खेद सोडून तूं सोयरिकीची चौकशी करूं लागलास; यावरून तुझी विद्या

संपली, किंवा बंधु पडले या गोष्टीचा तुझ्या मनाला धक्का बसला, असें आम्हांला वाटतें. तुला चौकशी करण्याचें कारण काय ? बंधूंचा सूड घेण्यासाठीं निर्वाण बाण सोड. तुला लोक महापराक्रमी समजतात, तूं अयोध्येचा राजा आणि दशाननाचा वध करणारा आहेस; ह्मणून तुझी कीर्ति आहे. तर त्या कीर्तिप्रमाणें सर्व विद्या आज आम्हांला दाखीव. आह्मीं तर अत्यल्प किशोर; पण तूं पूर्वीचा जुना महायोद्धा आहेस, तरी आह्मी युद्ध केल्याशिवाय तुला कधींही सोडणार नाहीं. भयच वाटत असेल तर अयोध्येस पळून जा. तूं एकपत्नीव्रती असतां विशुद्ध जानकीला विनाकारण टाकून अपकीर्ति कां बरें वरलीस ? तसें केल्या कारणानें तुला दारा, कुटुंब, कांहीं एक राहिलें नाहीं आणि व्यर्थ दूषण मात्र लागलें. यासाठीं आतां संन्यास घेऊन हरि हरि ह्मणत सुखानें कोठें तरी रहा."

याप्रमाणें कुश आणि लव हे दोघे रामचंद्राला जरी अनेक प्रकारें टाकून बोलले; तरी त्या भाषणावर लक्ष्य न देतां तो दाशरथी त्या दोघांस ह्मणाला—मुलांनो, पहिल्यानें तुह्मीं तुमची नामकुलगोत्रादि सर्व माहिती सांगा ? ती ऐकल्यानंतर मी तुह्मांबरोबर युद्ध करीन. असें ऐकतांच कुश हंसून ह्मणाला—रामा, ऐक तर—जानकीच्या शुद्ध उदरकमलांत उत्पन्न झालेले आह्मीं आवळे जावळे मिलिंद आहों. आह्मीं शत्रुकाष्टें कोरीत असतों. वाल्मिकतात आमचा गुरु, त्यानेंच मौंजीबंधन करून आह्मांला सर्व विद्या पढविल्या आहेत. तो आमच्या जननीचा जनक होय. मातेच्या कैवारानें भार्गवानें जशी पृथ्वी निःक्षत्रिया केली, तसेंच आमच्याही मनांत आहे. ज्या वेळेस त्वां वनांत सीतेचा त्याग केलास, त्याच वेळेस तुझी शक्ति नाहींशी झाली. तुला अविवेक आवरेनासा झाला.

याप्रमाणें त्या बालकांचीं भाषणें ऐकतांच सीतेला आठवून राम
दय पिटीत धरणीवर मूर्च्छित पडला आणि कांहीं वेळानें सावध झाला,
ां बिभीषण व मारुती जवळ आले. त्यांस रामानें विचारलें—हे को-
ाचे पुत्र असावेत बरें ? असें ऐकतांच ते ह्मणाले—प्रभो, हीं दोन्हीं
ापलींच प्रतिबिंबें जानकी उदरोत्पन्न आहेत, असें आह्मांला वाटतें.
ाप्रमाणें बिभीषण व मारुती यांनीं सांगतांच रामानें निवांत राहून
ीता सोडल्यापासून दिवस मोजले, ते बारा वर्षें व तीन मास इतके
रले. इतक्यांत लव आणि कुश आपसांत ह्मणूं लागले—राम वृक्षाआड
सून कसला विचार करीत आहे बरें ? कांहीं असो. आपण तो वृक्षच
डवून द्यावा. असा विचार करून कुशानें एक बाण सोडला आणि राम
या वृक्षाखालीं बसला होता, तो वृक्ष मुळापासून आकाशांत उडविला.
ाम त्यांचें तें अद्भुत हस्तकौशल्य पाहून आश्चर्य पावला आणि हे आ-
ांबरोबर युद्ध केल्याशिवाय वश होणार नाहींत, असें ह्मणून उठला.
ंतर राम धनुष्यावर जो बाण लावून सोडीत असे, तो आकाशांत
 व्यर्थ जात असे. युद्धचमत्कार पाहणारे विमानचारी देव असा चमत्कार
अवलोकन करीत असतां आश्चर्य पावले आणि आज रामाचें सामर्थ्य
कोठें गेलें ? असें ह्मणूं लागले. इतक्यांत कुशानें बाणाग्रीं मोहनास्त्र
स्थापन करून तो बाण रामावर इतक्या चापल्यानें सोडला कीं, राम
मोहानें पुत्रवदन पहात असतां तें मोहनास्त्र येऊन त्याच्या हृदयांत भर-
ले व तो एकदम मूर्च्छित पडला. राम पडतांच सर्व सेनेंत हाहाःकार
झाला आणि मारुती एक पर्वत घेऊन क्रोधानें कुशावर आला, तों
त्याजवर वज्रबाण सोडून त्याला सीतापुत्रानें मूर्च्छित केलें. इतक्यांत
बिभीषण गदा घेऊन हांक देत पुढें आला. त्यालाही कुशानें एकाच
बाणानें मूर्च्छित पाडलें.

शेवटीं कोणीही योद्धा उरला नाहीं; असें झाल्यावर लव आणि कुश हे दोघे धांवून रामाजवळ आले. त्यांनीं आपल्या पित्याला पाहून प्रेम-भावानें वंदन केलें. नंतर रामाच्या मस्तकावरील मुगुट काढून कुशानें आपल्या मस्तकीं घातला त्याचप्रमाणें कुंडलें, कौस्तुभ, कटिमेखला, इत्यादि सर्व अलंकार त्यानें धारण केले. लवानें लक्ष्मणाचीं सर्व भूषणें काढून आपल्या अंगावर चढविलीं आणि शामकर्ण बरोबर घेऊन एका दिव्य रथावर बसते वेळीं तो कुशास ह्मणाला—दादा, आपण आईला दाखविण्यासाठीं वानर नेऊंया. पुढें ते आपल्याला खेळायालाही होतील. हें भाषण कुशानेंही मान्य केलें आणि दोघांनीं मिळून नळ, नीळ, सुग्रीव, मारुती, अंगद आणि जांबुवंत, या सहा असामींचीं पुच्छें धरून त्यांस ओढीत ओढीत आश्रमाचा मार्ग धरिला. तेव्हां जांबुवंत हळूच ह्मणाला—सख्या मारुती, अंगें खरडताहेत, ऊठरे; आपण यांच्याशीं युद्ध करूं. मारुती ह्मणाला—अरे बाबा युद्धाची गोष्ट बोलूंच नको. त्रिभुवननाथ रामही मूर्च्छित पडलेला आहे, तर तुह्मीही मेल्याचें सोंग करा. ही शक्तीची अतर्क्य करणी बरें! आतां क्षणभर असेच रहा ह्मणजे सीतेचें दर्शन होईल.

याप्रमाणें ते बोलत आहेत तों दोघेही आश्रमासन्निध येतांच रथाखालीं उतरले. ते दोघेही वस्त्रालंकार मंडित होते. कुशाला समोर येतांना पाहून रामच आला असें जानकीला वाटलें व तिनें झटकन पदर सांवरला. इतक्यांत दोघांनींही सीतेला साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां तिला गहिंवर आला व तिनें दोघांसही हृदयाजवळ धरिलें. नंतर त्या जगन्मातेच्या कंठाला मिठी घालून दोघेही युद्धकथा सांगत असतां ह्मणाले—माते, ज्यानें तुला दुःख दिलें; त्याच्या

सह त्याला रणांत निजविलें. असें ऐकतांच सीता शोकानें ऊर वीत भूमीवर पडली आणि विलाप करीत असतां म्हणाली- नो, तो त्रिभुवनेश्वर तुम्हीं रणांत पाडून पितृवध कसा केलात? हर हर! काय हें! याप्रमाणें जेव्हां जानकी फारच शोक करूं गली; तेव्हां कुश म्हणाला-माते, तूं असा शोक करूं नको. ते मूर्च्छित आहेत. कांहीं वेळानें सावध होतील. असें ऐकतांच सी- डोळे पुसले, तों लव म्हणाला-आई आम्हीं वानर आणले आहेत. कशा चक्राकार उड्या मारतात. बाहेर झाडा जवळ बांधून ठेवले हेत, ते पहा बरें! असें ऐकतांच सीतेनें बाहेर येऊन नळ, नीळ, बुवंत, हनुमंतादिकांस पाहून आश्चर्य केलें आणि मनांत म्हणाली- इया बाळांचें सामर्थ्य अद्भुत आहे, म्हणून हे महा वीर यांनीं धरून णले. आतां जर यांना ओळख दिली तर लाजतील; यासाठीं यांना डवावें म्हणजे झालें. असा विचार करून ती पुत्रांस म्हणाली- ळांनो, अरे हे वानर घरांत ठेवूं नयेत, सोडा त्यांना; आपापल्या काणीं जाऊंद्या. याप्रमाणें मातेचें वचन ऐकतांच दोघांनीही त्यांच्या पट्या धरून त्यास गरगर फिरवून दूर भुगारून दिलें. तेव्हां ते हावीर उठून रामाकडे पळून गेले.

इकडे रणांत राम सावध झाला तों मारुती आदिकरून सर्व धांवत ले व वाल्मिकाश्रमींचा वृत्तांत सांगूं लागले-आम्हीं मुलांचें सोंग ऊन तेथें जाऊन पाहिलें. त्यांनीं शामकर्ण आश्रमाच्या अंगणात धून ठेवला आहे. तुमचा मुगुट, कुंडलें इत्यादि सर्व अलंकार ते घे कुमार घेऊन गेले. मारुती म्हणाला-प्रभो, देवीनें आपण वैकुं- ह पडलां, असें ऐकतांच शोकारंभ केला होता; पण आपलेच पुत्र

ते. त्यांनीं आपण मूर्च्छित आहां, असें सांगितल्यावर तिनें बाहेर ये-ऊन अह्मांला सोडविलें; पण आपणांस आपल्या पुत्रांनीं जिंकलें, याला मी उपमा कसली बरें देऊं? जसा आपल्याच फळभारानें वृक्ष मोडून जावा, तसें हें झालें असें ह्मणावें लागतें. याप्रमाणें मारुतीचें भाषण ऐकून रामचंद्र क्षणभर स्तब्ध झाला.

वाल्मिकमुनीनें पाताळीं वर्तमान ऐकलें कीं, आपल्या उपवनाजवळ कोण्या राजाच्या सैन्याबरोबर आपल्या मुलांनीं महा युद्ध केलें; तेव्हां तो धांवत आपल्या आश्रमीं आला. तेव्हां लवकुशांसह सीतेनें त्याला नमस्कार करून सर्व वर्तमान सांगितलें आणि शामकर्णही दाखविला. तेव्हां आश्चर्यानें हंसून वाल्मिकमुनि रणांत आले आणि त्यांनीं आपल्या कमंडलूंतील उदक शिंपडून वाहनांसह सर्व सैन्य जिवंत केलें. लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न आदिकरून लहान थोर सर्व नि-द्रिस्त जसे जागृत होतात त्याप्रमाणें उठून उभे राहिले. नंतर वाल्मि-कानें जाऊन रामाला आलिंगन दिलें आणि सांगितलें—हे परात्पर रामा, हें सर्व तुझेंच कर्तृत्व, सर्व तूं जाणतच आहेस. सर्वांच्या गर्वाचा झाडा व्हावा, ह्मणून ही लीला तुझी तूंच केलीस ! नाहींतर सीता तुजपासून दूर कोठें गेली ? जो अनंत ब्रह्मांडांचा कर्ता तो तूं आहेस. रामा, हें बाह्यात्कारीं लटकेंच नेणतपण मात्र धरलें आहेस. याप्रमाणें वाल्मिकमुनि बोलत असतां राम ह्मणाला—महाराज, मी युद्ध करून त्या दोघांसही जिंकीन; अजून मी आपली निर्वाण करणी त्यांना दाखविली नाहीं. असें ऐकतांच वाल्मीक हंसून ह्मणाला—अरे पण रामा, हाताचा धक्का जर चुकून नेत्राला लागला, तर काय हात तोडून टाकावयाचा आहे ? भोजन करीत असतां जर जिभेला दांत लागला, तर रागवावें

.ोणावर ? हे जगदात्मा रामा " आत्मावैपुत्रः " या वाक्याप्रमाणें तुझ्याच ोषीनें तुला जिंकलें, किंवा मोहविलें असें ह्मणावें लागतें. याप्रमाणें ाल्मिकाचीं भाषणें ऐकतांच राम आनंदानें डोलूं लागला व सहपरिवार या दिवशीं तेथेंच राहिला.

सपुत्र सीता रामाला भेटणार; तो आनंदोत्सव पाहण्यासाठीं सर्व ाजे सैन्यासह त्या ठिकाणीं धांवत आले. शत्रुघ्न व सुमंत यांनीं धां-ाधांव करून हेममय शिबिरें तयार केलीं. अयोध्येंतील सर्व प्रजा ापल्या राजपुत्रांस पाहण्यासाठीं त्या ठिकाणीं धांवत आली. वसि-ादि सर्व मुनीश्वरही तें कौतुक पाहण्यासाठीं आले असतां त्यां स-ांस घेऊन नित्यनियम सारून राम हेमांबर सभेंत येऊन बसला. ाल्मिकानें आश्रमांत जाऊन लव कुश आणि शामकर्ण यांस हातीं ्रून राघवासन्निध आणून उभें केलें. त्या दोन्ही बालकांस पाहतांच ्द्रादि देवगण, मनुष्य, राक्षस आणि वानरादि सर्व ह्या दोन्ही रा-ववाच्याच मूर्ती आहेत असें ह्मणूं लागले. इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, रामा सीता निर्दोषी असून हे पुत्रही तुझेच आहेत. या-प्रमाणें नभवाणी ऐकतांक्षणीं एकच जयजयकार झाला. वस्त्रालंकार ् चापशरमंडित लवकुशांनीं रामापुढें लोटांगणें घालतांच रामानें अति प्रेमानें उठून त्यांस हृदयाजवळ धरिलें आणि त्यांचीं मस्तकें अ-वघ्राण केलीं. वेद, शास्त्रें, पुराणें, विद्या, कला, इत्यादिकांबद्दल लवकुशांनीं परीक्षा देऊन वाल्मिकरचित शतकोटि रामचरित्राचें असें सुस्वर गायन केलें कीं, त्या वेळेस रामासह सर्व सभाजन आनंदानें डोलत राहिले. नंतर राम वाल्मिकाला ह्मणाला–मुनिवर्य, धन्य आपल्या गुरुत्वाची ! आपण बालकांस उपदेश करून त्यांजक-

डून इतका दिव्य अभ्यास करविला; तर मी आपली धन्यता किती वर्णन करावी ? वाल्मिक ह्मणाला–रामा, तुझें वीर्य परम तीव्र; त्याची धारणाशक्तीच गहन नाहीं तर नुसत्या उपदेशानें काय होणार होतें? आणि मी गुरु कसला ? याप्रमाणें भाषणें चालली आहेत तों लक्ष्मणानें जानकीला आणविण्याविषयीं रामाची आज्ञा घेतली आणि भरत, शत्रुघ्न, सुमंत, सुग्रीव,मारुती, बिभीषण, इत्यादिकांसह सर्व सैन्य बरोबर घेतलें व तो अत्यानंदानें आश्रमाजवळ आला व लोटांगण घालूं लागला. नंतर वाल्मिकानें बहुत प्रकारें प्रार्थना करून सीतेला बाहेर आणलें. तेव्हां सर्वांनीं सद्गदित होऊन त्या जगन्मातेचे चरण धरिले आणि तिनें बसून चलावें अशी प्रार्थना करून सुखासन पुढें ठेविलें.

नंतर सर्व ऋषिपत्न्यांची पूजा करून सीता सुखासनारूढ रामाकडे आली आणि त्या परात्पर पतीला पाहतांच वाहनाखालीं उतरून त्याच्या जवळ आली. इतक्यांत वाल्मिक पुढें होऊन रामास ह्मणाला–हे रामचंद्रा, पंचभूतें, रवि, चंद्र आणि हृदयस्थ जो तूं आत्माराम, त्या सर्वांच्या साक्षीनें मी सांगतों कीं, ही जानकी आदिमध्यावसानीं निष्पाप आहे. मी आजपर्यंत माझी धर्मकन्या ह्मणून पालन केलें. आतां तुझ्या दर्शनानें धन्य झालों. त्याचप्रमाणें ह्या आपल्या सत्वशील धर्मपत्नीला अर्धांगी धारण करून पुत्रांसह अंकावर घे, ह्मणजे जनकनंदिनी सीता धन्य होईल व आमचे नेत्रही धन्य होतील.

याप्रमाणें वाल्मिक बोलत आहे, तों पुनः आकाशवाणी झाली कीं, ही जनकतनया सत्य सती व अगदीं निर्दोष आहे. असें ऐकतांच रामानें तिला आलिंगन देऊन वामांकीं धारण केलें. त्यावेळेस मंगल-

द्यांचा गजर होऊं लागला. लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न आणि सुमंत आनंदानें सर्व सेनेचीं तोंडें गोड करूं लागले आणि जो तो रामपुत्रांस उचलून त्यांचीं परम प्रीतीनें चुंबनें घेऊं लागला.

नंतर रामानें वाल्मिकाची प्रार्थना केली कीं, महाराज, आतां आपण सर्व ऋषींसह अयोध्येस चलावें आणि आरंभिलेला महा यज्ञ पूर्ण करून परत यावें. हें वचन वाल्मिकादि ऋषींनीं मान्य करितांच सर्वांस यथायोग्य सुखासनें देववून सीतेसह राम रथांत बसला. त्याच्या दोन्ही बाजूस लव कुश बसले. नंतर सर्वांच्या मस्तकांवर छत्रें धरिलीं. अतिविचित्र मित्रपत्रें ( अब्दागिऱ्या ) शोभूं लागल्या. भक्त चामरें ढाळूं लागले आणि भाट सूर्यवंश वाखाणीत पुढें चालले असतां मंगलवाद्यांच्या गजरांत अत्यानंदानें सर्वांसह रामानें अयोध्येंत प्रवेश केला.

कौसल्या व सुमित्रा यांनीं येऊन सीतेला आलिंगनें दिलीं. कौसल्येनें नातवांवरून मृद ओंवाळून टाकली. नंतर पूर्वींचीच सामग्री सिद्ध होती, ती घेऊन रामानें सर्व ऋषींकडून अश्वमेधयज्ञ पूर्ण करविला आणि अपार दक्षणा वस्त्रालंकारासह देऊन ऋषींच्या पाठवण्या केल्या. ते रामचरित्र वर्णन करीत आपापल्या आश्रमास गेले. यज्ञावलोकनासाठीं सर्व राजे आलेले होते; त्यांसही वस्त्रें व भूषणें देऊन गौरविलें. ते सीतेचा महिमा वर्णन करीत आपापल्या राजधानीस गेले. नंतर सुग्रीव, बिभीषणादि मित्रमंडळीचाही रामलक्ष्मणांनीं योग्य सत्कार करून त्यांस निरोप दिले आणि जानकी व पुत्र लव कुश यांसह राम अयोध्येचें राज्य करीत आनंदानें राहिला.

---

# अध्याय ४० वा.

एके दिवशीं राम सिंहासनावर बसला आहे आणि त्याचे बांधव अष्टप्रधानांसह हात जोडून उभे आहेत; तों यमुनातीरवासी प्रजा गाऱ्हाणें सांगण्यासाठीं रामाकडे आली. दूतांनीं प्रजा कांहीं गाऱ्हाणें घेऊन येत आहे, असें येऊन सांगतांच रामानें त्या प्रजाजनांस मुक्तमंडपांत आपल्यासमोर आणलें आणि तुह्मांला कोणी त्रास दिला ? असें स्वतः विचारलें. तेव्हां ते प्रजाजन सांगतात—रामा, क्रूर लवणासुर नामक दैत्यानें सगळ्या यमुनातीराला पीडा केली आहे. तो मरुदैत्याचा पुत्र, सदोदित यमुनेच्या पैलतीरीं वास्तव्य करीत असतो. तो चांडाळ नित्य गाई, ब्राह्मण आणि दीनप्रजा मारून भक्षण करीत असतो; तर त्याचा वध करून दीन प्रजेला सुखी कर. असें ऐकतांच रामाला क्रोध आला व त्यानें कोदंड आणविलें. तों शत्रुघ्नानें पुढें होऊन श्रीरामचरणीं मस्तक ठेविलें आणि लवणासुरवधार्थ आज्ञा मागितली. तेव्हां मंत्र, शक्ति आणि दिव्यबाण देऊन रामानें चतुरंग दळासह त्याला लवणासुरावर पाठविलें. संग्रामसंकेतभेरी वाजवितांच तीन अक्षौहिणी सैन्य बाहेर पडलें आणि वायुवेगानें यमुनातीरावर आलें. नंतर असंख्य नौका आणून तें सैन्य यमुनानदी उतरलें, तों असंख्य ऋषिजन शत्रुघ्नाकडे धांवत येऊन सांगूं लागले—

शत्रुघ्ना, याच दुष्ट दैत्यानें पूर्वीं मांधाताराजा मारिला. हा महाबलाढ्य कोणासही आटपत नाहीं. यानें पूर्वीं तप करून शिवाच्या हस्तांतील शूल संपादन केला आहे, त्यामुळें हा सर्वांना पीडा देत [illegible] आहे. यासाठीं पहिल्यानें

अध्याय ४०वा



शूल हरण करून घे. तो असुर त्या शूलाची पूजा करून त्याला
रांत जतन करून ठेवित असतो व आहार मिळविण्यासाठीं
र संचार करतो. त्या प्रमत्ताच्या भयानें मथुरापट्टण ओस पडलें
हे; तर पहिल्यानें त्याची बाहेर जाण्याची वेळ साधून तूं त्याच्या
नावर घाला घाल आणि शूल हस्तगत करून घे; ह्मणजे तो
गबल होईल.

याप्रमाणें ऋषींचें वाक्य ऐकून शत्रुघ्नानें त्या लवणासुराचा बाहेर
पयाचाच वेळ साधला आणि त्याच्या सदनावर धाड घालून त्याचा
शिवदत्त शूल हरण करून घेतला. इतक्यांत गौ ब्राह्मणाला मारून
ंच्या प्रेतांचा भारा मस्तकावर घेऊन लवणासुरही तेथें आला आणि
पल्या सदनासभोंवती मानवसमुदाय पाहून आनंदानें कृतांतवत् हांका
डूं लागला; तों आपल्या सदनांतील पूजा करून ठेवलेला शूल श-
ाच्या हातांत असलेला त्याच्या दृष्टीस पडला आणि त्या क्रूराला
रच क्रोध आला. त्यानें मस्तकावरील भारा खालीं टाकला आणि
ल घेण्यासाठीं शत्रुघ्नाच्या अंगावर चाल करून ह्मणाला—मानवा, तुला
रून मी आतां अयोध्यापट्टणही ओस करीन. रावण माझा मातुल.
ाला तुझ्या भावानें कपटानें सहपरिवार मारलें. त्या रामाला सर्वां-
व मारून मी सीता आणणारच होतों; तों तूं पहिल्यानेंच सांपडलास,
ीक आहे. असें ऐकतांच धनुष्य चढवीत असतां शत्रुघ्न त्याला ह्मणाला-
शका, मत्कुण रगडून टाकण्याला जसा वेळ लागत नाहीं, तसा तुझा
ध करण्यालाही मला मुळींच वेळ लागणार नाहीं. याप्रमाणें शत्रुघ्न भा-
ण करीत आहे, तों एक महा वृक्ष उपटून लवणासुरानें शत्रुघ्नावर टा-
ला, तो शत्रुघ्नानें एका बाणानें उडवून देतांच यानें पर्वत भिरकाविला.

तांही शत्रुघ्नानें फोडून त्या असुरावर कोट्यावधि बाण सोडले; पण त्यानें ते सर्व तृणवत् मानले. नंतर लवणासुर असंख्य वृक्ष, पाषाण व पर्वत शत्रुघ्नावर टाकूं लागला; पण त्या सर्वांचें निवारण करून शत्रुघ्नानें विचार करून एक बाण काढला. तो बाण कमलासनानें मधुकैटभ-वधाचेवेळीं निर्माण केलेला, ब्रह्मदेवानेंच रामाला दिला होता, तो लवणासुरावर निघते वेळीं रामानें शत्रुघ्नाला दिला होता. त्या बाणाला शत्रुघ्नानें शरासनावर ठेवून आकर्ण ओढतांच भूमंडळ डळमळलें आणि जेव्हां तो चापापासून सुटला, तेव्हां सहस्र विजांचें रूप धरून कडाडत लवणासुरावर आला आणि त्याचा निःपात करून गुप्त झाला. शत्रुघ्न विजयी होतांच देवांनीं पुष्पवृष्टि केली.

लवणासुराचा वध झाला हें कळतांच मथुरापट्टण जें ओस झालें होतें, तें पुनः प्रजा येऊन वसलें आणि देशांतून भय, दुःख व दारिद्र्य नाहींसें झालें. हें वर्तमान अयोध्येस रामाला कळतांच त्यानें छत्रचामरादि सर्व राजचिन्हें पाठवून त्या शत्रुघ्नाची मथुरेंत स्थापना केली व तेथपासून समुद्रापर्यंत सर्व देश त्याच्या ताब्यांत दिला.

इतक्यांत अयोध्येंत एक चमत्कार झाला. रामानें अकरा हजार वर्षे राज्य केलें; पण त्याच्या राज्यांत कोणालाही अकालीं मरण आलें नाहीं; असें असतां एका ब्राह्मणाचा पुत्र मौंजीबंधन होतांच ह्मणजे अकालीं मरण पावला. तेव्हां पित्यानें त्याचें प्रेत उचलून राजद्वारीं आणलें आणि रामाला सांगितलें कीं, तूं कांहींतरी दोषाचरण केलेंस ह्मणून माझा पुत्र अकालीं मरण पावला; लौकर प्रयत्न कर. माझा पुत्र जिवंत झाला पाहिजे. असें ऐकतांच राम परम चिंताक्रांत झाला इतक्यांत ब्रह्मपुत्र नारद त्या ठिकाणीं आले, त्यांस पाहतांच

ानानें पूजा करून रामानें आसनावर बसविलें आणि ब्राह्मणपुत्र झाल्याचें वर्तमान सांगितलें. तेव्हां नारद ह्मणाले—कोणीतरी तपश्चर्या करीत आहे; ह्मणून ब्राह्मणपुत्र अकालीं मरण पावला. करणें हा द्विजांचा धर्म, मग अर्थात् तो इतरांस अधर्म होय. शूद्र परमतपाचें आचरण करूं लागले, तर अकालीं मरण येईल.

याप्रमाणें नारदाचें वाक्य ऐकतांच रामानें पुष्पकविमानाचें स्म· केलें, तों तें रामाज्ञा पाळण्यासाठीं तत्काळ आलें. तेव्हां प्रधान व हीं सेना बरोबर घेऊन राम त्या विमानांत बसला आणि पृथ्वीं- ळ गुहा, पर्वत, कठिण स्थानें शोधूं लागला. तपस्वी दिसतांच ोण याति?' ह्मणून रामानें प्रश्न करावा आणि ब्राह्मण, असें ानें उत्तर द्यावें व तें ऐकतांच रामानें त्याला नमस्कार करून पुढें ावें. याप्रमाणें सगळी पृथ्वी रामानें पाहिली आणि शेवटीं दक्षि- ंथ शोधूं लागला; तों गिरिकंदरीं एक किरात तपश्चर्या करीत सलेला रामाच्या दृष्टीस पडला. त्यानें धूम्रपान आरंभिलें होतें. ाला पाहतांच रामानें 'कोण याति आणि कशासाठीं तपारंभ?' असें न केलें. तेव्हां त्यानें मी किरात आहें व स्वर्गनिमित्त तपश्चर्या रितों, असें उत्तर दिलें. तें ऐकतांच रामाला कोप आला व हा परध- ाचरण करितो, असें ह्मणून त्यानें एक तीक्ष्ण बाण सोडला व त्या- ा शिरच्छेद केला. तो किरात उद्धरून स्वर्गास गेला. इतक्यांत द्र येऊन रामाला भेटला आणि ह्मणाला—हे सीतावल्लभा रामा, त्वां ा किराताचा वध केलास, ह्यामुळें देवांलाही परम संतोष झाला आहे; र हे भूदेवा, रामा, तूं आतां मला कांहीं आज्ञा कर. ती मी सिद्धीस ावीन. राम ह्मणाला—अयोध्येंत ऋषिकुमार मरण पावला आहे, त्या-

ला जीवदान दे. असें ऐकतांच इंद्रानें ठीक आहे ह्मणून सांगि
नंतर इंद्राज्ञेवरून अयोध्येंत द्विजपुत्राचा प्राण परतला.

नंतर रामानें पुष्पक अगस्त्याश्रमाकडे वळविलें. तों उलूक व
गृध्र हे दोन पक्षी रामासमोर येऊन न्याय मागूं लागले. तेव्हां रा
विमान स्थिर केलें आणि काय आहे? असें विचारिलें-तेव्हां दि
भीत बोलूं लागला- देवा, पूर्वीपासून हें माझें घर असें असतां हा
बळेंच येथें नांदूं लागला. असें ऐकतांच गृध्र ह्मणाला-महार
हा दिवाभीत व्यर्थ कलह करून मला पीडा करीत आहे. मी अन
काळापासून येथचाच रहिवासी आहें. याप्रमाणें दोघांचा
ऐकून रामानें प्रधानास सांगितलें कीं, यांचा न्याय करा आणि
निवडून, सदन ज्याचें असेल त्याला द्या. असें ऐकतांच गृध्र ह्मणा
महाराज, ज्यावेळेस ही पृथ्वी उत्पन्न झाली नव्हती, त्या वेळेप
मी या वृक्षावर हें घर बांधलें आहे. दिवाभीत ह्मणाला-देवा, हा
बोलतो. ईश्वरानें पृथ्वी निर्माण केल्यावर वृक्ष वाढला आणि मग
स्वतः हें घर या वृक्षावर बांधलें. याप्रमाणें दोघांची तक्रार ऐकल्य
गृध्र बहुत काळच्या गोष्टी सांगतो, ह्मणून प्रधान त्याला सत्य
लागला. तें ऐकतांच राम हंसून ह्मणाला-प्रधानजी, हा न्याय
आपण बरोबर निवडलात बरें! पृथ्वी वृक्षाला आधार आणि पृथ्वी
आश्रयानें सर्व तरुवर, हें आपल्या ध्यानांत कां न यावें बरें! त
हा दुरात्मा गृध्र दंडार्ह आहे, याचा मी वध करितों. असें बोलून क्रो
राम बाण काढूं लागला, तों आकाशवाणी झाली-हे कोदंडपाणी रा
याला मारूं नको. पूर्वीं हा ब्रह्मदत्त नामा भूपति, गौतमऋषीचा शि
एके दिवशीं गौतम याजकडे भोजनास आले असतां यानें त्यांस भ

हलें, तें पाहतांच गौतमाला कोप आला व त्यांनीं याला गृध्र हो, शा शाप दिला. नंतर जेव्हां हा गुरुचरणीं लीन झाला व उःशाप गूं लागला, तेव्हां रामदर्शन होतांच उद्धरून स्वर्गास जाशील, असें तम मुनि म्हणाले.

याप्रमाणें आकाशवाणी होत आहे, तों दिव्यविमानें आलें आणि ब्रह्मदत्तराजा दिव्यदेह पावला व रामचंद्राला नमस्कार करून स्वर्गास गेला. नंतर राम अगस्तीच्या आश्रमांत आला व त्याची पूजा करून वार्थानें हात जोडून त्याच्यापुढें उभा राहिला, तेव्हां अगस्तीनेंही चा उत्तमप्रकारें आदरसत्कार करून रामाला एक अमूल्य मणिमय कण दिलें. तें कंकण फारच शोभायमान असून त्यावर एकेक मणि थ्वीच्या मोलाचा जडविलेला होता. असें तें दिव्यकंकण पाहतांच मानें अगस्त्यमुनीला विचारलें—महाराज, ही प्रभायुक्त विधिनिर्मित स्वर्गवस्तु आपणांस कोणी दिली? असें ऐकतांच अगस्तिमुनि कथा सांगूं लागले—

त्या पलीकडच्या सरोवरांत पुण्यवंत आणि तपोराशि विदर्भराजाचें प्रेत पडलें आहे तें पहा. त्यानें पुष्कळ दान व तप केलें; परंतु त्याच्या हातून किंचित्‌ही अन्नदान झालें नाहीं. तो राजा पंचत्व पावल्यावर स्वर्गास गेला आणि क्षुधेनें व्याकुळ झाला; परंतु ब्रह्मदेवानें त्याला सांगितलें कीं, तुझ्या भक्षणार्थ येथें कांहीं नाहीं. तूं पूर्वी अन्नदान मुळींच केलें नाहींस आणि येथें तर दिल्याशिवाय कांहीं मिळत नाहीं. यासाठीं मृत्युलोकास जाऊन तूं आपलें प्रेत भक्षण कर. तूं नित्य प्रेत भक्षण करूं लागलास म्हणजे त्याचें मांस वाढेल. अगस्ति म्हणतात—रामा, त्या दिवसापासून तो राजा नित्य विमानांत

बसून आपलें प्रेत भक्षण करण्यासाठीं येत असे. त्या राजाला क सनानें सांगितलें होतें कीं, तुला अगस्तीचें दर्शन झालें म्हणजे कर्माचें खंडण होईल. त्याप्रमाणें एके दिवशीं तो राजा प्रेत करीत असतां मी त्याला पाहिलें आणि मला त्याची दया मी त्याला वरदानें देतांच त्याच्या कर्माचें खंडण झालें आणि नित्य स्वर्गी राहूनच अमृतपान करूं लागला. त्या राजानें गुरु करितेसमयीं हें कंकण मला दिलें होतें. या कंकणाला जीं रत्नें डविलेलीं आहेत, त्या प्रत्येक रत्नावर देवांचे अंश असल्यामुळें कंकण हातांत असलें म्हणजे इच्छित मनोरथ पूर्ण होतात. ऐकतांच रामानें तें कंकण आपल्या हातांत घातलें. नंतर रा अगस्त्यऋषीला प्रश्न केला कीं–या वनाला दंडकारण्य म्हण. याचें कारण काय? असें ऐकतांच अगस्त्यमुनि सांगूं लागले–

सूर्यकुळांतील मनुचा पुत्र इक्ष्वाकु व त्या इक्ष्वाकूचा पुत्र दं राजा. तो दंडक राजा एके दिवशीं मृगयेसाठीं अरण्यांत आला ऋषींचे आश्रम पहात पहात भृगुऋषीच्या सुशोभित आश्रमांत क्ष भर विश्रांतीस्तव बसला. त्यावेळेस भृगुऋषि आश्रमांत नसून त्या अरजानामक कन्यका होती. एकांत पाहून राजा कामातुर झा परंतु ती अल्पवयस्क दश वर्षांची कुमारी. दंडकानें तिला ध बलात्कारानें भोगिली, त्यामुळें ती त्या ठिकाणीं अचेतन पडली दंडक तेथून निघून गेला. नंतर ऋषीनें आश्रमांत येऊन कन्ये स्थिति पाहिल्यावर चौकशी केली, तेव्हां हा अनर्थ करून दंड राजा निघून गेला, असें ऋषीला समजतांच त्यानें त्याला शाप दि कीं- चांडाळा, तूं, तुझी सेना, प्रजा, देश, वनें, पट्टणें, वृक्ष, चौप

न, धान्य आणि तुझा वंश तुझ्या प्रधानांसह सातदिवसांत जळून जाईल. त्याप्रमाणें त्या विप्रोत्तमानें शाप दिल्यामुळें सर्व जळून गेलें आणि बहुत काळपर्यंत हा देश ओस पडला होता. पुढें नारदानें पर्वतांत कलह लाविला, त्यामुळें मेरु आणि विंध्याचळ इतके उंचावले कीं, त्यामुळें सूर्यमंडळ अडलें आणि सर्व सृष्टींत हाहाःकार झाला. विंध्याद्रि आटपेना, तो अतिशय वाढल्यामुळें सर्व देव आणि ऋषी मजकडे आले व मला दक्षिणेकडील तीर्थयात्रा करण्याविषयीं आग्रह करूं लागले. तेव्हां मी वाराणशी सोडून ऋषींसह दक्षिणेंत आलों. मला पहातांच विंध्याचळ नमन करावें म्हणून आडवा पडला. तेव्हां त्याला मी सांगितलें कीं, यात्रा करून परत येईपर्यंत असाच रहा. उठशील तर शाप देईन. तेव्हांपासून तो तसाच पडलेला आहे मग मी ऋषींसह येथें वास केला आणि इंद्राला सांगून धान्य वनस्पतींच्या बीजासह मेघवृष्टि करविली. तेव्हां या देशांतील दोष व दुष्काळ नाहींसा झाला व हा देश पुनः वसला; परंतु याला दंडकारण्य म्हणून जें पूर्वींचें नांव आहे, तेंच चाललें आहे. याप्रमाणें कथा ऐकून रामानें ऋषीला वंदन केलें आणि त्याचा निरोप घेऊन अयोध्येचा मार्ग धरिला. राम अयोध्येस येतांच ज्या ब्राह्मणाचा पुत्र मरण पावून पुनः जिवंत झाला होता, तो ब्राह्मण असंख्य ब्राह्मणांस बरोबर घेऊन रामदर्शनास आला व त्या रामचंद्राचें यश वर्णन करूं लागला.

मुक्तमंडपांत जानकीसह सिंहासनस्थ राम बंधूंनीं वेष्टित शोभला आहे व वज्रदेही मारुती सदोदित हात जोडून उभा आहे. तो जन्ममरणातीत, अक्षय, अभंग व शाश्वत असल्यामुळें जरी उत्तरकांडीं त्याची निजधामास गेल्याची कथा आहे, तरी ती प्रेमळ वक्त्याला

कथन करवत नाहीं व भाविक श्रोत्यांला ऐकवतही नाहीं;
हाम सोडिली आहे. हा ग्रंथ मूळ वाल्मीकीचें काव्य,
आणि व्यासकृत रामायणाचें सार घेऊन लिहिला आहे.

यांतील चाळीस अध्ययांपैकीं आठ अध्याय बालकांड,
ध्याय अयोध्याकांड, चार अध्याय अरण्यकांड, दोन अध्य
ष्किंधाकांड, पांच अध्याय सुंदरकांड, दहा अध्याय युद्धकां
सात अध्यायपर्यंत उत्तरकांड आहे. असा हा सप्तकांडात्मक
रित्र नामक ग्रंथ येथपर्यंत पूर्ण झाला. याचे वाचक, पाठक
ब्रह्मानंदसुख भोगण्यास पात्र होतील.

---

# विक्रीस तयार.



| | कि. रु. आ. | ट. ख. आ. |
|---|---|---|
| [सा]र्थ–श्रीमद्भागवत श्रीधरीटीकेसहित.... .... .... | १२–० | २–४ |
| [उ]पयुक्त कथासंग्रह भाग १ ला. आ. १३ वी. .... | १–१२ | ०–४ |
| [उ]पयुक्त कथासंग्रह भाग २ रा.... .... .... .... | १–१२ | ०–४ |
| [श्र]ीकृष्णचरित्र .... .... .... .... .... .... | ५–० | ०–३ |
| [पां]डव चरित्र .... .... .... .... .... .... | २–८ | ०–६ |
| [जैमिनी अश्व]मेध अध्याय ७०.... .... .... .... .... | २–० | ०–६ |
| [भ]क्तिविजय.... .... .... .... .... .... .... | १–१२ | ०–८ |
| [पा]ंडवप्रताप .... .... .... .... .... .... | २–० | ०–८ |
| [दा]सबोध.... .... .... .... .... .... .... | २–० | ०–६ |
| [ग]णेश लीलामृत .... .... .... .... .... .... | ०–१२ | ०–२ |
| [स]रितामाहात्म्य .... .... .... .... .... .... | ०–८ | ०–२ |
| काशीखंड.... .... .... .... .... .... .... | २–० | ०–६ |
| सार्थ श्रीमद्भगवद्गीता .... .... .... .... .... | ०–१० | ०–२ |
| व्याख्यानमुक्तावली ( संस्कृत सुभाषित ग्रंथसंग्रह ) .... | ०–८ | ०–२ |

आह्मांकडे वेद, शास्त्र, पुराण, इतिहास, काव्य, नाटक, वैद्यक, ज्योतिष इत्यादि सर्व प्रकारचीं संस्कृत व प्राकृत पुस्तकें, सर्व ओंवीबद्ध ग्रंथ व शालोपयोगी पुस्तकें, नकाशे, चित्रें, मोडी, बाळबोध वगैरे सर्व जाती विक्रीस तयार आहेत.

माल रेल्वेपार्सलानें किंवा पोष्टानें [ व्ही. पी. नें ] पाठवूं.

**नारायण रामचंद्र सोहनी.**

